# नाट्यकवितासंग्रह.

त्रैगुण्योद्भवमत्र लोकचरितं नानारसं दृश्यते ।
नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनं ॥

मालविकाग्निमित्रे कालिदासः

हें पुस्तक

रसिक व विद्वज्जनमनोरंजनार्थ विष्णुदास ऊर्फ विष्णु अमृत भावे, आद्यमहाराष्ट्रनाटककर्ते यांनीं केलें.

तें

पुणें येथें

"श्री शिवाजी" छापखान्यांत छापिलें.

शके १८०६ तारणनामसंवत्सरे.

इ० स० १८८५

पहे

# प्रस्तावना.

जगामध्यें प्रापंचिक उद्योगपरिश्रमार्थ प्राणिमात्राला विश्रांतीची फार अवश्यकता आहे. मग तो राजा असो अथवा अगदीं रंक असो. निद्रेसच केवल विश्रांति मानणारा प्राणी फारच विरळा. पशु, पक्षी इत्यादिकांस मात्र निद्रा हीच विश्रांति आहे. मन हें फार चंचल व उत्सवप्रिय आहे. त्यास नित्य कांहीं नवें पाहिजे. सर्व दिवसभर कामकाज करून दमून भागून गेलेल्या मनुष्याचे मनास रंजवून उल्हसि करण्याचे नानातऱ्हेचे खेळ, सत्काव्यांचें वाचन, गायन, नृत्य वगैरे अनेक प्रकार आहेत; परंतु त्या सर्वांत नाटकासारखा मनोरंजक विषय दुसरा कोणताही नाहीं. एकतर नृत्य, गान, शृंगारवीरकरुणादि रसभरित प्रसंग, उत्तम भाषण व दुसरें नीतिपर ज्ञान, असे दोन फायदे एकसमयावच्छेदेंकरून विश्रांतीची विश्रांति होऊन अनायासें होतात. सुनीतीचा बोध जसा या कलेनें मनावर ठसतो तसा दुसऱ्या कोणत्या उपायानें ठसावयाचा नाहीं. एका नाट्यकलाविवेचक ग्रंथांत ह्मटले आहे कीं,:—'धर्मार्थकाममोक्षंच वैचक्षण्यं कलासुच ॥ करोति कीर्तिं प्रीतिंच साधुकाव्यनिषेवणं, ॥ शास्त्रोक्त लक्षणयुक्त काव्यापासून धर्म, अर्थ, काम, मोक्ष, यांचें ज्ञान, कलानैपुण्य, लोकप्रीति आणि कीर्ति हीं मनुष्यास प्राप्त होतात. नाटक ह्मणजे मानवी संसाराचें चित्र आहे. यांत मनुष्यावर घडणाऱ्या नानाविध प्रसंगाचें व तज्जन्य विविध मनोविकृतींचें वर्णन केलें असतें. नाट्यशास्त्रांत त्याचें लक्षण पुढीलप्रमाणें दिलें आहे; 'नृपतीनां यच्चरितं नानारसभावसंश्रितं बहुधा ॥ सुखदुःखोत्पत्तिकृतं भवति हि तन्नाटकं नाम ॥ सुखदुःखाद्यनेक मनोविकृतिजनित नानारस आणि नानाभाव यांहीं युक्त जें राजाचें चरित्र तें नाटक होय. ह्मणून जे फायदे सत्काव्यापासून आहेत त्यांपेक्षांही जास्त या कलेपासून आहेत. एकतर मनरंजन आहेच, याशिवाय आणखी पुष्कळ महत्वाच्या गोष्टी त्यापासून आपल्यास समजतात, ह्मणजे त्या वेळच्या लोकांच्या [illegible]संबंधी विचार, त्यांचें तत्वज्ञान वगैरे कळतें; [illegible] अंगीं काल्पक शक्ति कमी [illegible]हासाची संक्षिप्त माहिती मिळते. [illegible]

वघड

ही सुंदरकला या हिंदुस्थानदेशांतील लोकांस फार प्राचीन
पासून माहित आहे; आणि ती त्यांनीं कोणत्याही राष्ट्रापासून घे-
तलेली नसून, केवळ त्यांची स्वतःचीच आहे. अन्यदेशांत जो या
कलेचा प्रसार झाला तो येथूनच झाला. कारण, विद्या, कला, धर्म, इ-
त्यादिकांत प्रथम सुधारलेला देश हिंदुस्थानच होय. पूर्वींच्या इतिहास-
पुराणावरून पाहूं गेलें असतां हनुमान्, कृष्णपुत्र सांब वगैरेंनीं नाट्यप्र-
योग केल्याचें समजतें. तसेंच, प्रसिद्ध नाट्याचार्य भरत हा इंद्रसभेंत
गंधर्व आणि अप्सरा यांना वेष देऊन नाट्यप्रयोग करी. त्यानंतरचे
कालाची माहिती मिळण्यास कांहीं साधन नाहीं. पुढें ह्मणजे पांचव्या
ाव्या शतकांत शूद्रक, विक्रमादित्य, भोज, श्रीहर्ष वगैरे राजांच्या वेळीं
ालिदास, भवभूति, धावक इत्यादि अनेक कवींनीं सुरस नाटकें रचून
ांचे प्रयोग करून दाखविले आहेत, हें हल्लीं जीं नाटकें उपलब्ध
ाहेत त्यांवरून सिद्ध होतें. मात्र त्या वेळीं आतांसारखी नाटकी मंडळी
ासे. ते उत्सव, यात्रा, लग्नसमारंभ, पुत्रोत्साह इत्यादि विशेष प्रसंगीं
नाटकें रचून, तीं पात्रांकरवीं तयार करून प्रयोग करीत. ते
योग चिनीलोकांसारखे एकच दहादहा दिवस होत नसत. बहुतकरून
टकाचे अंक १० च्या आंत असावयाचे, व प्रयोगही ९ पासून ८
ाकासपर्यंत होत.

ही कला पुढें इतक्या भरभराटीस आली होती कीं, तिजवर
धनंजय, भोज, विश्वनाथकविराज, सारंगदेव, भानुभट्ट, अशा मोठमो-
ठ्या रसज्ञ पंडितांनीं दशरूपक, सरस्वतीकंठाभरण, साहित्यदर्पण,
संगीतरत्नाकर, रसमंजिरी, रसतरंगिणी इत्यादि अनेक ग्रंथ केले.
ाशी अजमासें अकराव्या शतकापर्यंतची तांत्रिक माहिती मिळते. पुढील
ाहिती मिळण्यास आमच्या देशांत इतिहासाचें साधन नसल्यामुळें
कठीण आहे.

संस्कृतभाषेंतील नाटकांचे नाटक, नाटिका, प्रकरण, भाण, त्रोटक
असे अनेक प्रकार आहेत. संस्कृतांत जीं नाटकें आहेत त्यांत शोक-
ाणामी नाटक मुळींच नाहीं. कारण, नाटकाचा शेवट दुःखकारक
नये, नायक आणि नायिका यांचे परिणाम रंग...
... नियम आहे. संस्कृतना...

मुळींच नाहीं; व जो कांहीं थोडा आहे तो अगदीं साध्या रूपानें आहे. तसेंच, आतांसारखीं नाटकगृहेंही त्या वेळीं नव्हतीं. हे नाटकप्रयोग बहूतकरून संगीतशाळेंत होत; आणि तेथें सर्व प्रकारच्या सोयीही असत. हें संगीतरत्नाकरादि ग्रंथांत रंगभूमींचीं वर्णनें व तेथील व्यवस्था वगैरे दिली आहे त्यावरून कळतें. देखावे दाखविण्याचा प्रचार प्राचीन काळापासूनच आहे. नाटकांत बायकांचीं सोंगें बायकाच करीत कांहीं पोक्त विचाराच्या स्त्रिया, कामंदकी, बुद्धरक्षिता इत्यादि मात्र पुरुष होत.

संस्कृतनाटकांत आणखी एक विशेष असा आहे कीं, त्याच्या कर्त्यांनीं नाटकांतिल मुख्य पात्रांच्या तोंडीं संस्कृत भाषा ठेविली आहे आणि कनिष्ठ पात्रांची मागधी, बाल, वीरसेनी अशा आहेत. यावरून असें एक अनुमान वाटतें कीं, ज्या वेळीं हीं नाटकें रचलीं गेलीं त्या वेळीं संस्कृत भाषा बोलण्याच्या प्रचारांत नसावी. कारण, एवढ्या मोठ्या राष्ट्रांत एकच भाषा असणें कठीण आहे. कोणत्याही देशांत पहा, प्रांताप्रांताची भाषा निराळी असावयाचीच. ज्या वेळीं आर्य लोक उत्तरेकडून हिंदुस्थानचे निरनिराळ्या भागांत पसरले, तेव्हां तेथील मूळभाषेशीं संस्कृताची भेसळ होऊन, निरनिराळ्या भाषा झाल्या असाव्या असें वाटतें; तरी पण विद्वान् लोकांची भाषा संस्कृतच असे. कारण पूर्वींचे जे ग्रंथ आहेत ते सर्व संस्कृतांतच आहेत. मिडल एजेस मध्यें (मधल्या काळीं) मध्यें सर्व पाश्चिमात्य लोकांचीसुद्धां अशीच स्थिति असे. प्रचारांतील भाषा जरी भिन्न भिन्न असत तरी कोणताही ग्रंथ लिहिणें झालें तर तो ल्याटिन भाषेंत लिहीत.

हिंदुस्थानांतिल उपलब्ध नाटकग्रंथांची संख्या इतर देशांतील नाट्यग्रंथांशीं तोलून पाहतां फारच कमी आहे. एकंदर नाटकग्रंथ काय ते ४०।५०च आहेत. प्रत्येकाचे नांवावर एकाद दुसरें. फक्त कालिदास आणि भवभूति यांचे नांवावर काय तीं तीन तीन नाटकें आहेत. आर्टिफेनिस म्हणून कोणी पाश्चिमात्य कवि होऊन गेला, त्यानें ३६५ नाटकें रचिलीं आहेत; व लोपाडिव्हेगा यानें २००० रचिलीं. त्याप्रमाणेंच शेक्सपीयरनें ३५।३६ नाटकें लिहिलीं आहेत. यावरून कित्येक विद्वान् पाश्चिमात्यांचा आमच्यावर असा आक्षेप आहे ... अंगीं काल्पक शक्ति कमी आहे; परं...

...घडे

नाहीं. हें अनेक महत्वाच्या विषयावरील आमचे शेंकडों ग्रंथ व शाकुंतला, उत्तररामचरित्र विक्रमोर्वशी इत्यादि नाटकें ( जीं अगदीं थोडींच उपलब्ध आहेत, परंतु केवळ जगमान्य आहेत ) पाहिल्यानें खात्री होणार आहे. कोणतीही विद्या घ्या, कला घ्या, त्या सर्वांचें मूळ येथूनच आहे. वरील स्थितीचें एक कारण असें दिसतें कीं, नाट्यप्रयोग वारंवार करून दाखविण्याची चाल आमच्यामध्यें नव्हती. विद्वान् असे जे लोक असत त्यांचें ह्या कलेकडे लक्ष नव्हतें. ते तत्वज्ञानाचा विचार करण्याचे पाठीस लागले होते. ज्यांचें लक्ष परमार्थाकडे गुंतलें व ज्यांनीं इंद्रियनिग्रह केला आहे, अशांस ही इंद्रियसृष्टि व लोकव्यवहार तुच्छ असावयाचेच. मग त्यांचे या प्रापंचिक विषयांविषयीं औदासिन्य असणें बरोबरच आहे. दुसरें, कांहीं लोक न्याय, मीमांसा, व्याकरण इत्यादि विषयांत गढले होते. कांहीं तरी एकादा शब्द अथवा कोटी घेऊन वाग्वाद करून त्याची ते भवति न भवति करीत बसत. ते या काव्य, नाटक, अलंकार इत्यादि ग्रंथांची अरसिकपणें “ रंडागीतानि काव्यानि” अशी विडंबना करीत. येणेंकरून या लोकरंजनकलेंत पुढें भर पडली नाहीं. अथवा हा आमचा देश धर्म, ज्ञान, विद्या, कला, द्रव्य इत्यादिकेंकरून सुधारणुकीच्या शिखरास पूर्वीपासून जाऊन पोहोचला असल्यामुळें, सर्वत्र अन्य राष्ट्रास त्याचे प्राप्तीचा लोभ उत्पन्न होऊन, अजमासें २००० वर्षांपासून यवन, ग्रीक, वगैरे लोकांच्या स्वाऱ्यांनीं अगदीं जर्जरतेस आणिला, व तेणेंकरून अनेक उलटापालटीही झाल्या. क्रूर व हिंसक यवनांनीं या देशांत काय काय उत्पात केले, हें सर्व इतिहासज्ञांस विदितच आहे. राज्यक्रांतीच्या संबंधानें या देशांत जी पुष्कळ नासधूस झाली, त्यांत दुर्दैवानें पुष्कळ सर्वमान्य ग्रंथांवरही धाड आली असावी असें वाटतें. त्याशिवाय पूर्वींपासून जो जैन आणि ब्राह्मण यांमध्यें धर्मसंबंधानें वैमनस्य पडून वाद चालला होता, त्या वेळीं जैनांचे हजारों ग्रंथ ब्राह्मणांनीं व ब्राह्मणांचे जैनांनीं बुडवून टाकिले त्यांत याही ग्रंथांची वाट लागली असावी.

यापुढील ३।४ शें वर्षें जो काल गेला त्यांत मराठे, पेशवे व [illegible] यांची धुमाकूळ चालली होती. जिकडे तिकडे हाणा, मारा, [illegible] नये, [illegible] कांहीं नव्हतें. शेवटीं शेवटीं मात्र लखनौच्या एका

नबाबानें इंद्रसभा या नांवाचें एक संगीत नाटक ( जें हल्लीं ।-
लोक करितात) मोठमोठे गवई व कवि ठेऊन, लक्षावधि रुपये खर्चून
करविलें. त्यांत राजेसाहेब आपल्या राण्यांसह स्वतः वेष घेऊन गात
चत. त्याचप्रमाणें यात्रा वगैरे प्रसंगीं गुजराथ, मारवाड व हिंदुस्थान
कांहींजण राधा आणि कृष्ण वगैरेंचीं सोंगें घेऊन अभिनययुक्त गात व
त. या खेळास ते रासा ह्मणत. कर्नाटकांतही कांहीं नाटकें करीत;
त्यांत मनोरंजन कांहींच नसे. सोंगाचे वेष तर फारच खराब असत.
पात्रांनीं गाऊन नाचावयाचें, मग त्यांस गातां येवो अगर न येवो हे
पाहून गांवढळ लोकांचें मन रिझे; परंतु विद्वानांस त्यांपासून आनंद
तां उलटा त्रास मात्र येई. महाराष्ट्रदेशांत उत्साहांत ललितप्रसं-
व तमाशांत मात्र सोंगें घेऊन कांहीं हास्यकारक बीभत्स प्रहसनें होत.
हीं नाट्यकला त्यांस माहीत नव्हती.

वर सांगितलेल्या प्रकारची कर्नाटकी उत्तरकानडा प्रांतांतील भाग-
या नांवाची मंडळी इ. स. १८४२ मध्यें सांगलीस आली होती. त्यांचे
प्रयोग श्री० कैलासवासी चिंतामणराव अप्पासाहेब यांनीं करविले. हे
त हे रसज्ञ, गुणाचे चहाते असल्यानें त्यांचें तसल्या ओबडधोबड-
भित्स कृतीनें मन रिझलें नाहीं. मग त्यांनीं या कृत्यांत चांगली सुधारणा
करून, नवीन मराठी नाटक तयार करण्याविषयीं मला आज्ञा केली;
णे परोपरीनें मी साह्य करीन असें बोलले. मी त्या वेळीं त्यांच्या खासगीक
नोकरीस होतों. मला पूर्वींपासून चित्रें करणें, कविता करणें, गोष्टी
गें वगैरेंचा नाद होताच; आणि मूळ मला जी श्रीमंताकडे नोकरी
झाली ती वर सांगितलेल्या गोष्टींवरच मिळाली. माझे आजे हे श्रीमं-
ताशीं मोठ्या कामावर होते व वडीलही एका हुद्याच्या कामावर होते.
मंतांकडे मला आमच्या वडिलांनींच प्रथम जोडून दिलें होतें. माझें
त्या वेळीं जरी १८।१९ वर्षांचें होतें तरी दृढ निश्चयानें श्रीमंतांचें
श्वसनावरून मी त्या उद्योगास लागलों. त्या वेळची विद्येची स्थिति
रच वाईट असे. गृहस्थाचे मुलास साधारण मोडीचें लिहितां वाचतां व
शेब ठिशेब करितां येऊं लागलें कीं झालें. फार तर ... त्या
ीं बहुतेकांस बाळबोध लिहितां वाचतां येण्याची ...
त व इतक्या लहान वयांत असें अवघड

करणें किती कठीण आहे, याचा वाचकांनीं विचार करावा. मला लहा णापासूनच गाण्यावाजविण्याचा छंद होता. पुढें या कृत्यास लागण्या पूर्वी बरेच महाराष्ट्रग्रंथ मीं वाचले; व पौराणिक इतिहास समजून घेत नंतर सर्व साहित्याच्या व मंडळीच्या मिळवामिळवीस लागलों.

जगांत अशी एक चमत्कारिक चाल आहे कीं, कोणीं कांहीं नव कृत्य आरंभिलें कीं, लोकांनीं त्यास उत्तेजन न देतां तुच्छ कर टाकावें व त्यास नानातऱ्हेचे आडथळे आणावे. हें सर्व न जुमानतां निश्चय केला कीं, कांहीं होवो, धरलेलें काम शेवटास न्यावयाचेंच.

नंतर बरीच मंडळी अनुकूल करून घेऊन, रामायणापैकीं प्रथम सी तास्वयंवराख्यान तयार करावें असें मनांत आणिलें. त्यास कांहीं संगी पाहिजे त्याकरितां पुष्कळ हरिदास वगैरे लोकांकडून कविता मिळवि ण्याच्या उद्योगास लागलों. प्रथम ती कविता मिळविण्यास मला फा खटपट पडली व पहातों तों ती आर्या श्लोकबद्धच फार. संगीता उपयोगीं पडणारी व शृंगार, वीर, करुणा, इत्यादि त्या त्या रसाला अनुकूल रागांत कविता बिलकूल नाहीं. मग स्वतः तें आख्यान रसाला अनुकूल असें रागांत तयार केलें. तसेंच, पात्रें व किरीट कुंडलादि लागणारें सामान तयार करून, इ० स० १८४३ प्रथम प्रयोग श्रीमंतांपुढें केला. तें पाहून ते फार खुष झाले. आपल्या पदरच्या माणसांचा त्यांस इतका अभिमान असे कीं, भरसभेंत त्यांनीं त्या दिवशीं माझी फार वाहवा केली व तेव्हांपासून ते मला फार चाहूं लागले.

इत्यादि घेऊन काव्य,

याप्रमाणें आमच्या प्रतिपक्षी वर्गांचे दांत पडून हें कार्य चांगले तऱ्हेनें शेवटास गेलें असें पाहून, त्यांनीं कांहीं ग्रामकीटकांशीं व कांहीं अरसिक गृहस्थांशीं सामील होऊन, नटवेष घेणारांस अपंक्त करण्याचें कूष्मांड काढिलें; व दोन तीन प्रसंगीं भरपंक्तींतूनही आमची मंडळी उठविली; परंतु श्रीमंतांचें साह्य मला चांगलें असल्यामुळें, त्यांनीं सभा केली व तेथें श्रीमंतांच्या पदरचे वे० शा० गोपीनाथ शास्त्री अगाशे यांनीं मागील पुष्कळ आधार दाखवून नटवेष घेणें हा दोष नाहीं असें प्रतिपादन केलें.

पुढें एक वर्षामध्यें रामायणापैकींच दहा नाटकें तयार करून, त्यांचे [illegible] श्रीमंतांस दाखविले. त्यांनीं फार खुष होऊन मला सांगितले [illegible] कांहीं नव्हत.

कीं, जी जी मंडळीं नाटकांत वेष घेतात त्यांस येथें मी जमीनी इनाम देतों व त्यांनीं आपले कुलस्वामी श्री गणपतीची सेवा करून येथेंच सदा असावें, त्याप्रमाणें या सर्व कृत्याच्या खटपटीबद्दल तुह्मासही मी मोठें इनाम देतें.

या प्रमाणें सर्व गोष्टी ठरून फक्त इनामपत्रें मात्र देण्याचीं राहिलीं. होतीं; तों आमचे दुर्दैवानें सर्व विपरीत झालें. इ० स० १८५१ सालीं, श्री० चिंतामणराव आपासाहेब थोडे दिवस आजारी पडून निवर्तले !! व पुढें सर्व बेत तसाच राहिला. या प्रमाणें माझी आशा विफळ होऊन मी या कामीं बराच पैशाचे पेचांत आलों.

पुढें श्रीमंत धुंडिराव हे लहान असल्या कारणानें संस्थानचे व्यवस्थेस रा० बाळाजीपंत माटे यांस इंग्रेजतर्फे कारभारी नेमिलें. त्यांस मीं कै.वा. श्रीमंतांचा हेतु कळविला. ते ह्मणाले आतां श्री. धुंडिराव लहान असल्या कारणानें ते वयांत येईपर्यंत त्याप्रमाणें होण्यास मार्ग नाहीं; परंतु मी तुह्मास पगारी व जे जे सरकारी नोकर तुमचे नाटकांत आहेत त्या सर्वांस बदली चार वर्षांची रजा देतों. तुह्मीं इतर गांवीं हें नाटक घेऊन जाऊन आपलें कर्ज फेडावें. निरुपाय होऊन त्या गोष्टीस मी मान्य झालों व सर्व तयारी करून करवीरावरून खेळ करीत करीत पुण्यास आलों.

त्या वेळीं कीर्तन, तमाशे वगैरे जसे एकानें बिदीवर करावे व रावांनीं ते पहावे त्याप्रमाणेंच आमचे खेळ रस्त्यावर होत. पुण्यांत मीं बरेच खेळ केले व तेथें आमची वाहवा झाली. त्या वेळीं तेथील प्रख्यात गृहस्थ रा. रा. केरूनाना छत्रे वे. रा. रा. कृष्णशास्त्री चिपळूणकर, रा. रा. केशवराव भोंवाळकर वगैरे मंडळींचा स्नेह होऊन, त्यांनीं आह्मास फार मदत केली. पुढें खेळ करीत करीत मुंबईस गेलों. तेथें महिन्यांतून चार पांच खेळ होत. प्रत्येक खेळास १५०।२०० रुपये मिळत; परंतु तेथील खर्चाचे मानानें उत्पन्नाचा मेळ बसत नसे. येणेंकरून आजमासें ३०० रुपये कर्ज झालें. माझे प्रयोग मात्र तेथील थोरथोर लोकांस पसंत पडून वाहवा झाली; आणि डा० भाऊदाजी, श्री० आबासाहेब शास्त्री, नाना शंकरशेट, सरजमशेटजी अशा थोर थोर लोकांशीं माझा स्नेह झाला.

त्याच संधीस तेथें एक युरोपियन नाटक आलें होतें, तें पाहण्यास मी आपले मित्राबरोबर गेलों. तेथील सर्व टापटीप, बसण्याची सोय, पडदे, देखावे वगैरे पाहून मनाला फार संतोष झाला; व वाटलें कीं, आम्हांस जर प्रयोग करण्यास ती जागा मिळेल तर बरें होईल, परंतु तें घडणार कसें ? शोध केला तों एका रात्रिचें दिवाबत्तीसुद्धां त्या जाग्याचें भाडें ५०० रुपये होतें. हें ऐकून आपलें नाटक येथें होणें ह्मणजे दुरापस्त गोष्ट आहे असें वाटलें. पुढें प्रथमच तिकीट लावून मंडळींचे साह्यानें गिरगांवांत आत्माराम शिंपी यांचे बंगल्यांत खेळ केला. त्यांत आह्मास फायदाही बराच झाला व जागा प्रतिबंदींत असल्यानें नाटक चांगलें झालें. माझे मित्र डा० भाऊदाजी, नाना शंकरशेट वगैरेंच्या मदतीनें इकडे थिएटर आह्मांस मिळण्याबद्दल प्रयत्न चाललाच होता. त्या वेळीं थिएटर एका युरोपियन नाटकवाल्याकडे होतें. तें शेवटीं एक महिन्यानें माझ्या मित्र मंडळीच्या खटपटीनें आह्मास मिळालें व तेथील सर्व व्यवस्था थिएटरच्या व्यवस्थापकानें आह्मास समजून दिली. मीं एक नवीनच नाटक बसवून तेथें प्रयोग केला. त्या दिवशीं मुंबईंतील शेटसावकार, सरकारी नोकर, युरोपियन, पार्शी वगैरे बहुतेक बडी बडी मंडळी आली होती. खेळ संपल्यानंतर गव्हरनर साहेबांचे सेक्रेटरी यांस डा० भाऊंनीं आमचे रंगाचे जागीं आणिलें. आमची सर्व व्यवस्था व टापटीप पाहून ते खुष झाले. ते ह्मणाले तुमचा हा प्रयोग पाहून मला फार आनंद झाला, हा खेळ घेऊन तुह्मी विलायतेस जाल तर तुम्हास फायदाही बराच होऊन कीर्ति होईल परंतु धर्माच्या अटीमुळें तें मीं नाकबूल केलें. पुढें मी सर्व हकीकत विलायतेस लिहीन, असें ते बोलले. ते दिवशींचा खेळ चांगला झाला, व सर्व इंग्रजी व मराठी वर्तमानपत्रांतून वाहवा झाली. पुढें तेथें सुमारें १०।१२ खेळ करून आह्मी सांगलीकडे परतलों. अशा चार पांच मुंबई, पुणें, नगर वगैरे ठिकाणीं खेपा आह्मी इसवी सन १८६१ पर्यंत केल्या, व कीर्ति आणि पैसा पुष्कळ मिळविला.

पुढें मीं नाटक मोडल्यानंतर माझ्या नाटकांतील मुख्य मुख्य पात्रांनीं नाटकें केलीं; त्यापासून दुसऱ्यांनीं अशी परंपरा होतां होतां जिकडे तिकडे नाटकेंच होऊन गेलीं. पुढें पुढें तर ह्या कलेकडे विद्वान् लो.

ांचें लक्ष लागून पुष्कळ लोकांनीं नवीं नवीं नाटकें रचून छापलीं कालेजें, हायस्कुलें वगैरेंतलि मंडळींनींही नाटकें केलीं. पार्शी लोतिही याचा प्रसार झाला व त्यांनीं कंपन्या उभारल्या. शेवटीं इसवी न १८८० मध्यें इंग्रज लोक ज्यास आपेरा म्हणतात, त्या पद्धतीवर गीत कंपनी निघाली. अशी ही फार दिवसांपासून राष्ट्रीयकर्मणूक पडली होती तिचें उज्वलन झालें.

याच्या पूर्वींच माझी कविता सर्व लोकांस पसंत पडून, ती छापण्याबद्दल कळ लोकांनीं आग्रह केला होता ; परंतु कांहीं कारणामुळें तें काम ंच लांबणीवर पडलें होतें, तें माझा वडील मुलगा विठ्ठल विष्णु ऊर्फ बजी विष्णु याणें मनावर घेऊन तडीस नेलें.

या पुस्तकांत जीं तऱ्हतऱ्हेच्या रागांत पदें आहेत, त्यांच्या बहुतेक ली नव्या असल्या कारणानें, त्या समजण्यास अन्य कवींच्या ांचा हवाला देतां आला नाहीं ; यामुळें प्रत्येक पदावर फक्त ल व राग मात्र दिले आहेत. त्यांतसुद्धां शुद्ध रागीयतींतील अशीं पदें डीं आहेत. मिश्र रागांतच फार आहेत. एक एक पदांत तर अस्ताा राग एक व अंतऱ्याचा राग दुसरा, असें झालें आहे; व कित्येकपदें चार र पांच पांच रागीयतींचे स्वर, रसानुकूलता व गोडी उत्पन्न करण्या रेतां मिश्र करून करणें भाग पडलें आहे. अशा पदांचे राग साधारण ांच्या वर्जावर्जावरून दिले आहेत. कांहीं पदें कर्नाटकी रागांतही हेत. माझी कविता बहुतेक नाटकांत कांहींना कांहीं आहेच, व ऐकें पाहिलीं नाहींत असा हिंदुस्थानचा एकही भाग उरला नाहीं, न चाली समजण्यास आतां फारसें अवघड पडणार नाहीं असें तें. ही कविता केवळ नाटकांतील पात्रांस बोलण्याच्या सूचनेकरिकेलीं आहे ; याकरितां विशेष पाल्हाळ न करितां कवितेंत तांत्रिक कूर मात्र घेतला आहे. येणेंकरून प्रांप्टर (सूचका)चें काम होऊन मध्ये कांत जो खंड पडतो तो या कवितेनें भरून दिसतो. जेथें जेथें च्या आरंभीं मा० प० असें म्हटलें आहे, तेथें तेथें ज्या पदाचें गडवें त्याचें मूळ त्याजवर दिलें आहे, त्या चालीप्रमाणें तें पद म्हणावें.

सदरहू पुस्तक गायनप्रिय जनांला कर्मणूक करण्यासारखें आहे;

व भाविक लोकांनाही संग्रह करण्यासारखें आहे. या सर्वांपेक्षां नाटककार लोकांना तर याचा उपयोग फारच आहे.

शेवटीं विद्वज्जनांस माझी एवढी प्रार्थना आहे, कीं, ज्या वेळीं हीं कविता केली त्या कालाकडे व त्या वेळच्या विद्येच्या स्थितीकडे लक्ष देऊन, सर्व दोषांचा त्याग करून गुणलेश ग्रहण करावा.

आतां जगच्चालक जो अनंतकोटिब्रम्हांडनायक त्याची अनन्यभावें प्रार्थना करून, ही फार लांबलेली प्रस्तावना आटोपतों.

**सांगली.**
ता० १ जानेवारी,
इ० स० १८८९.

**ग्रंथकर्ता**
**विष्णुदास ऊर्फ विष्णु अमृत भावे.**

# अनुक्रमणिका.

# नाट्यकवितासंग्रह.

## मंगलाचरण.

### श्लोक.

सृष्टि:स्रष्टुराद्या वहति विधिहुतं या हविर्याच होत्री । ये द्वेकालं वि-
ाति विषयगुणा या स्थिता व्याप्य विश्वं ॥ यामाहु: सर्वभूतप्रकृतीरीति-
ाणिन: प्राणवंत: ॥ प्रत्यक्षाभि: प्रपन्नस्तनुभिरवतु वस्ताभिरष्टा
॥ १ ॥

शाकुंतल.

### पद राग यमन ताल त्रिवट.

रंभीं स्मरितों पाय तुझे श्रीगजवदना ॥ १ ॥ तुज वाचोनी अ-
त्राता मूषकवहाना ॥ २ ॥ दीनानाथ जगीं बृद गाजे पुरवी
॥ ३ ॥ श्रमसी देवा भक्ताचीये काजीं संकटिं नाना ॥ ४ ॥
विघ्ने दूर पळती द्या वरदाना ॥ ५ ॥ विष्णुदास ध्यायी
तारी दीना ॥ ६ ॥

## नाटकारंभीं ह्मणावयाचे अभंग.

### ॥ अभंग १ ॥

ाची लीला गातां ॥ हरति पाप दोष चिंता ॥ १ ॥ जरी केलें
तरी पातक हो दहन ॥ २ ॥ नामस्मरणीं निघे अंश पुसावा
ाकास ॥३॥ ऐसा राममहिमा थोर ॥ विष्णुदास सांगे सार ॥४॥

### ॥ अभंग २ ॥

वांतून पार ॥ करी देवा आह्मा तार ॥ १ ॥ नाहीं केलें तुझें

ध्यान ॥ आजवरी आह्मीं जाण ॥ २ ॥ भवबंधनें तुटाया ॥ ध्यान तुझें देवराया ॥ ३ ॥ नटवुनी नाना वेष ॥ गाऊं तुझ्यारे लीलेस ॥ ४ ॥ विष्णुदास ह्मणे देवा ॥ हेतु माझा पूर्ण व्हावा ॥ ५ ॥

॥ अभंग ३ ॥

सत्यसत्व पाहूं छळी भगवान ॥ अंतीं त्यां लागून सुख देत ॥ १ ॥ शुद्धभावें ज्यांणीं हरी आकळीला ॥ स्वयें दास्य त्यांचें अंगीकारी ॥२॥ आहे सत्यहरी भावाचा भूकेला ॥ कदां अंतर त्यां न तो देयी ॥ ३ ॥ विष्णूदास ह्मणे स्मरा हरीपाय ॥ तेणें सत्य होय दास तुमचा ॥ ४ ॥

॥ अभंग ४ ॥

देवादीकांहीं भवाब्धीं ॥ न सूटती हो उपाधी ॥ १ ॥ जगपालक तो हरी ॥ त्रासे उपाधीनें भारी ॥ २ ॥ करोनीया हें चरित्र ॥ दाखवी तुम्हा पात्र ॥ ३ ॥ विष्णुदास जनहो एका ॥ उपाधीच्या वाटा ॥ ४ ॥

॥ अभंग ५ ॥

सत्यसंकल्प हा न चुके ब्रह्मादी कोणास ॥ हरीइच्छें घडतें अघटवां करितां न सायास ॥ १ ॥

---

## शंकर, गणपती आगमनांचीं पदें.

### पद राग मुलतानी ताल धुमाळी.

भाललोचना पिनाकपाणी त्रिशुलधरा परमेश्वरा ॥ ध्रु० ॥ नंदिवाहना मदनदहना पार्वतिरमणा श्रीशंकरा ॥ १ ॥ भूतपते कैलासपते कपाल हातीं हे सर्वेश्वरा ॥ २ ॥ हे शशीधर गजचर्मांबर स्मशानविहारी महेश्वरा ॥ ३ ॥ अर्धनारिनटेश दिगंबर विष्णुदास लीन या तारा ॥ ४ ॥

### पद राग भैरव ताल त्रिवट.

येइ त्वरें हेरंभ कृपाघन ॥धु०॥ होवो निर्विघ्न ही कार्य सिद्धी लीन तव

दीं दास शरण ॥ १ ॥ फार सुरसहीं ईश चरित्रें दाऊन करितों स- राजनरंजन ॥ २ ॥ दास विष्णु हा अनन्यभावें करित तवपदीं काव्य समर्पण ॥ ३ ॥

**पद राग यमन ताल धुमाळी.**

श्रीगजवदना दे मति दीना करावया नूतन कवना ॥ ध्रु० ॥ अष्ट- दश पुराणें सुरस हीं गाउं करूं कैंचें जनरंजना ॥ १ ॥ सुरस कथानकें वेचक घेऊन करूं इच्छित नाटकें नाना ॥ २ ॥ ईश चरित काय पा- मर वर्णिल जेथें थकली अहिरसना ॥ ३ ॥ नाहिं ज्ञान हा दास विष्णु तव लीन पदीं करि सज्ञाना ॥ ४ ॥

**पद राग गौरी ताल त्रिवट .**

मम स्तवना देउनि माना सभेसि यावें गजानना ॥ ध्रु० ॥ पाशां- कुशधृत हे अंबासुत द्यावें वरदाना ॥ १ ॥ सभाजनरंजन नाटकें करुन करूं द्या धी रचना २ ॥ ऐकुनि स्तवन येउनि गजवदन बैसति सुखासना ॥ ३ ॥ विष्णुदासा देत पात्रांसहित सुबुद्धिवर्णना ॥ ४ ॥

**पद राग यमनकल्याण. ताल त्रिवट.**

बिघ्नेस आइये गजानन सभामो ॥ ध्रु० ॥ संकटरहित करो आप यह काज सुबुद्धी देवो सब मनमो ॥१॥ आप करुनाकर बिनति सूनके मान्य करवो यह जनमो ॥ २ ॥ रातदीन बिष्णुदास स्मरत है चरन धरे हिरदेमो ॥ ३ ॥

**पद राग काफी ताल धुमाळी.**

दे गणराया भेटी लवकरी लोळे चिंतामणिचरणावरी ॥ ध्रु० ॥ सद्गदीत तव भक्ति सदा करी कृपा असो तयावरी ॥ १ ॥ सर्व विघ्नें या कार्यीं नीवारी हे भक्तकैवारी ॥ २ ॥ विष्णुदास तव लीन पदावरी भवपाश निवारी ॥ ३ ॥

**पद राग यमनकल्याण ताल त्रिवट.**

विघ्नेशा येई त्वरेनें ॥ ध्रु० ॥ सुजनसभारंजनहेतूस्तव इच्छित नाटक करणें ॥१॥ अमंगल निरसुनि हें मंगल कार्य सिद्धी नेणें ॥२॥ सूत्रधार हेरंभ आतां या दास अंत न पाहणें ॥ ३ ॥ विष्णुदास ह्मणे सभेसि येणें केलें मग गजवदनें ॥ ४ ॥

### पद राग कल्याण ताल चौताल कडवीं एका.

सूत्रधार नमुनी वहातसे गजानन रंगणीं ॥ ध्रु० ॥ येउनि वर या दासास देउनी करी निर्विघ्नास ॥ द्यावी मती या पात्रांस ॥ कृपा क-रोनी ॥ १ ॥ सुजनसभामनरंजन होइल कैंचे पात्रांहातुन ॥ ही चिंता असे बहुत दासाचे मनीं ॥ २ ॥ नविन नाटकरचना दास विष्णु स्तउनि आपणा ॥ करित अनन्यभावें करून ॥ शरण येउनी॥३॥

### पद राग सूधकल्याण ताल त्रिवट.

करनाटकि नाटक करी अशी ईशआज्ञा वाटे मम मना गजानना ॥ ध्रु० ॥ सकलारंभीं तुझें स्तवन करितां जाती विघ्नें पळुन ॥ धाव पाव बा गूणज्ञा ॥ १ ॥ कैंचे होइल हें निर्विघ्न आणिक अज्ञहस्तें जनरंज-न ॥ द्या सुमती याहो अज्ञा ॥ २ ॥ चिंतामणराव पटं वरधन देउनि करवि नाटक हें उत्पन्न ॥ विष्णुदासा देउन आज्ञा ॥ ३ ॥

### पद राग बिहाग ताल त्रिवट.

ये त्वरें दर्शन दे नमीत दास तुला मुकुंदा ॥ ध्रु० ॥ अनाथ नाथ तूं सनाथ करि मज ॥ दिनानाथ तव ब्रीदचि गाजे ॥ १ ॥ न घडे ध्यान तव पूजन आर्चन ॥ न नेणे कांहिं जपतपादि साधन ॥ पुरवि हेत माझे ॥ २ ॥ भवसागरिं हा पतित बुडत ॥ विष्णुदास प्रभो दीन किंकर ॥ दयाघना तारीजे ॥ ३ ॥

---

## सरस्वत्याऽऽवाहन.

---

### ॥ श्लोक ॥ शार्दूलविक्रीडित.

या कुंदेंदुतुषारहारधवला या शुभ्रवस्त्रावृता ॥ या वीणावरदंडमं-डितकरा या श्वेतपद्मासना ॥ या ब्रह्मच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैः सदा वंदिता ॥ सा मां पातु सरस्वती भगवती निःशेष जाड्यापहा ॥ १ ॥

### पद राग अरवी ताल त्रिवट.

सरस्वती ह्मणे तोषुनि स्तवनें मी आलें ॥ १ ॥ काय हेतुनें स्तोत्र माझें त्वां केलें ॥ २ ॥ ऐसें संकट काय कधी मज रे आलें ॥ ३ ॥

कां होउनि गणेश दर्शन मन खिन्न झालें ॥४॥ जनमन मम वरें रंजविविल हीं तव बालें ॥ ५ ॥ विष्णुदासाशिरिं कृपाहस्त म्यां ठेविले॥६॥ अंतर्धान देउनि भारतिनें वर केलें ॥ ९ ॥

---

२ पद राग हमीरकल्याण ताल त्रिवट.

सूत्रधार तव स्तवनें होउन मयूरारूढ आलें सभेस ॥ ध्रु० ॥ कां गणपति हे आले ॥ कां सभाजन जमले ॥ खिन्न तव मन कां झालें॥ ॥ चाल ॥ करि कथन मजसी त्वरित दास ॥ १ ॥

॥ आर्या ॥

निवारिलें विघ्नेशें विघ्नवेंरें ही आतां असे मजसी ॥ चिंता कीं हीं पात्रें रंजावितिल या जनांसि हो कैशी ॥ १ ॥

मा० प० सूत्रधार तव स्तवनें:—

कविनें आदी नमन ॥ गणपति मजला करून ॥ मग केलें हें कवन ॥ चाल ॥ कांहिं न्यून न तुज तयास ॥२॥ नाटकपात्रें सुमती ॥ गीष्पतिवत वदतिल तीं ॥ न धरी चिंता चित्तीं ॥ चाल ॥ सदा प्राप्त यश विष्णुदासास ॥ ३ ॥

---

३ पद राग धन्यश्री ताल धुमाळी.

स्थीर स्थीर हे सूत्रधारा परिसुनि तुझी स्तुती ॥ आले सभेप्रती काय चिंता ती कथी ॥ध्रु०॥ महत्संकटें मम वरदानें सत्यचि रे हरतीं ॥१॥ काय हेतुनें आले गणेश सभाजन सुमती ॥ २ ॥

॥ आर्या ॥

इच्छित नाटक दाउं परि पात्रें हीं आहेत हीनमती ॥ करतिल कैचें रंजन विद्वांसांचें असे मनीं भीति ॥ १ ॥

मा० प० स्थीर स्थीर हे सूत्र:—

मम वरदानें कुमति सुमतिनें मूकहि गुण गाती ॥ ३ ॥ बृहस्पतीवत मम वरें तव पात्रें वदतिल तीं ॥ ४ ॥ विष्णुदासकीर्तिचंद्र राहिल सदा या जगतीं ॥ ५ ॥

---

### ४ पद राग सोरट ताल एका.

कां मम स्मरण केलें सूत्रधारा मजसी बोले ॥ ध्रु० ॥ काय तुजप्रति संकट दासा अती सांग आजि रे आले ॥१॥ तव स्मरणें बैसुनि मयूरीं त्वरित रंगणीं आलें ॥ २ ॥ मम वरदें बृहस्पतिवत बोलतील तव बालें ॥ ३ ॥ विष्णुदासकृति मान्य जगातिं होइल मम बोलें ॥ ४ ॥

### ५ पद राग मुलतानी ताल धुमाळी.

झालें प्रसन्न आलें सूत्रधारा ऐकूनी तुझी स्तूती ॥ माग इच्छित देत तुज सरस्वती ॥ ध्रु० ॥ होतां माझें आगमन दूर पळतातीं विघ्नें सोडी सोडी मनीची भीती ॥ १ ॥ मम स्मरणें सिद्धी होती झालें दर्शन तूज-प्रती न धरी मनीं भ्रांती ॥ २ ॥ वरदी विष्णूदासकृती पात्रें बोलतील सुमती आहे कृपाहस्त त्यावरती ॥ ३ ॥

### ६ पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

कमलासनतनये सरस्वती ॥ ध्रु० ॥ हीनमती नाटकपात्रांप्रति दे सुमती तूं त्वरित गती ॥ १ ॥ मी अज्ञान करूं सभारंजन सिद्धी पावे कैसी शंका चित्तीं ॥ २ ॥ दास विष्णु कवन मान्य करोत जन नमुनि सर्वांप्रति करि विनती ॥ ३ ॥

#### ॥ आर्या ॥

मम वरदें तव मतिहिन पात्रें करतील रंजन सभेचें ॥ विष्णुदास कृतीही रिझविल विद्वांसमन बरें साचें ॥

### ७ पद राग सोरट ताल धुमाळी.

क्यौं मेरे ध्यान तुम कीया सूत्रधारा ॥ ध्रु० ॥ क्यौं सभा मिलगये बिघनेस आये ॥ क्यौं चिंतित दिल तेरा ॥ कहो कहो बालका प्यारा ॥ १॥ मेरे वरदसे तुमारा निर्बिघ्न काज ॥ और सुमति सब पात्रा ॥ कहो० ॥ २ ॥ विष्णुदासकृत सुरस नाटक यह ॥ बहुत होवेगा प्यारा ॥ कहो० ॥ ३ ॥

# बालगोपाल गंधर्वांचें गायन.

## १ पद राग पिलू ताल धुमाळी.

आदि नमोस्तु ते गजानना ॥ जय बुद्धीदायक गजा० ॥ जय शिव वरदायक गजा० ॥ जय पार्वतीतनया गजा० ॥ जय सिंदुरचर्चन गजा० ॥ जयश्री लंबोदर गजा० ॥ दीन दास वंदित चरणा ॥ विष्णुदास शरण आपणा ॥ १ ॥

## २ पद राग झिंझोटी ताल त्रिवट.

बालगोपाल गंधर्व गाती विनायका नमुनी ॥ ध्रु० ॥ दर्शन आपुलें घेउनि गाननृत्यें हो तोषीत करावें ॥ ह्मणुनि आलों रंगणीं ॥ १ ॥ असावें अवधान आपुलें परोपरींचें नर्तन गान ॥ आरंभिती नमुनी॥२॥ सुरस हरीचरिताचें नाटक होत एथें आलों आम्हि उभय ॥ हें आजी ऐकोनी ॥ ३ ॥ होउनि प्रसन्न श्रीगणनायक देत वरातें बुद्धीदायक ॥ दास विष्णु लागोनी ॥ ४ ॥

## ३ पद राग झिंझोटी ताल त्रिवट.

आह्मी गंधर्व सुरलोकींचे बालगोपाल ह्मणती हो आह्मां लागोनी ॥ ॥ ध्रु० ॥ भ्रमतां त्रिभुवनां माझारीं ऐकुन एथें नवलपरी ॥ दर्शनातें आलों ईशमोदें करूनी ॥ १ ॥ बुद्धीदायक जो ईश्वर सर्व विद्यांचा सागर ॥ दासां जो रक्षीत अभयकर ठेऊनी ॥ २ ॥ परोपरीच्या गानें नृत्यें तोषीत करोनी त्यातें ॥ मागती ते वर लीन हस्त जोडूनी ॥ ३ ॥ पाहुनि विष्णुदास लीन मस्तकिं अभय कर ठेऊन ॥ ह्मणती होइल तुमची कीर्ती सर्व जनीं ॥ ४ ॥

## ४ पद राग मुलतानी ताल धुमाळी.

गणराया दर्शन घ्याया आलों या स्थानाप्रती ॥ बाळगोपाळ गंधर्व आम्ही गाऊं तव कीर्ती ॥ ध्रु० ॥ पाशांकुशधृत मूढसुबुद्धित ॥ कारितां कांहिं न आपणा अघटित ॥ करी दीनां भवसागरपार विबुधजन स्तविती ॥ १ ॥ एकमुखें वर्णू कीर्ती तें ॥ अशक्य आहे हें शेषातें ॥

गुणगणित नोहे ते अगणित परी दीन हे हो स्तविती ॥२॥ पतीतपावन बृद हें ऐकुन ॥ आलों धाउन विनवित नमुन ॥ दीन विनंती हि मान्य करून वर द्या आह्मांप्रती ॥ ३ ॥ स्तवनें होउन तुष्ट गजानन ॥ देती उभया अशिर्वचन ॥ मानासिं बहु आनंदीत होउन विष्णुदास जाती ॥४॥

## गणपतिजन्माख्यान.

### पद राग यमन ताल त्रिवट.

कोणे एके दिनिं चतुरानन ॥ सत्य लोकीं सावित्रीसह बसले असतां काय झालें वर्तमान ऐका करीतों कथन ॥ ध्रु. ॥ ब्रम्ह्याचे भ्रकुटिंतून असुर होत उत्पन्न ॥ करीत तो स्तवन झाला विधी प्रसन्न ॥ माग ह्मणे इच्छित वरदान ॥ १ ॥

### ओवी.

असुर वदे विधीसी ॥ करावें नाम करणासी ॥ तैसीं अस्त्रे देऊनि मसी ॥ अमर करावें त्रिभुवनीं ॥ १ ॥

### मा. प. कोणे एके दिनिं चतुः—

सिंदूर तुज लागोन ह्मणतील सर्व जन ॥ भस्म होतील सकल करीतां तूं आलिंगन ॥ राहे मही राज्य करून ॥ २ ॥ गंधर्व देव जिंकीसी परी भय आहे तुजसी ॥ जरारूपी देव तूसी मारील या स्मरणासी ॥ ठेउनीया वागे निशींदिन ॥ ३ ॥

### घनाक्षरी.

असुर प्रमत्त होऊन ॥ जिंकि राजे गंधर्वगण ॥ मग वदत गर्वैकरून ॥ काय दुष्ट परीयसा ॥ १ ॥

### पद राग नाट्य ताल अर्धधमार.

महीतल जिंकोनि पादाक्रांत सिंदूरें ॥ केला या जाऊनि देव जिंकितों त्वरें ॥ १ ॥ पाहुनि मार्गीं नारदासी भेटुं धावला ॥ निवारुनि असुरासि नारद काय बोलला ॥ २ ॥

**पद राग नाट्य ताल धुमाळी.**

भेटूं नको मजसी स्थीर वीरा ॥ नारद वदे निशाचरा ॥ ध्रु० ॥ तुझें नाम काय सांग वाटे मज बहू भय ॥ बोल वृतांत खरा ॥ १ ॥

**मा. प. महीतल जिंकोनि:—**

ब्रह्मसुत सिंदूर सांग मी किती स्वर्ग दूर ॥ दावि मार्ग सांग कोणा जिंकु सत्वर ॥ २ ॥

**मा. प. भेटूं नको मज:—**

आहे मीही ब्रह्मपुत्र ॥ तूंहि माझा बंधु पात्र ॥ मारि न मज असुरा॥२॥

**मा. प. महीतल जिंकोनि:—**

कोठें वैकुंठ तें कोठें विष्णु सांग मला ॥ आलिंगनें मारीतों त्यांसी सिंदुर वदला ॥ ४ ॥

**मा. प. भेटूं नको मज:—**

दावी नारद दूरोनी ॥ विष्णुदूता तों मारोनी ॥ जाय वैकुंठपुरा॥३॥

**मा. प. महीतल जिंकोनि:—**

वृत्त तें ऐकोनी विष्णू स्थान सोडोनी ॥ जाय कैलासीं तो असुर येत धावोनी ॥ ५ ॥

**ओवी.**

तों शिव असती ध्यानस्थ ॥ गण विष्णू लागी पुसत ॥ त्यास विष्णू सांगे वृत्त ॥ पुढें काय वर्तलें ॥ १ ॥

**मा. प. महीतल जिंकोनि:—**

विष्णु लागी असूर गाठी येउनि कैलासीं ॥ आलिंगाया वदे येतां काय हरि त्यासी ॥ ६ ॥

**आर्या.**

मजसी आलिंगिसी तरि अर्थ तुला प्राप्त काय मज बोल ॥ हरअंकीं स्थित गिरिजे नेशी तरि अर्थ सर्व साधेल ॥ १ ॥

**मा. प. महीतल जिंकोनि:--**

मानउनि असुरासि स्कंदीं गौरि घेऊन ॥ जात वेगें मत्त धाउन मनिं आनंदोन ॥ ७ ॥

**घनाक्षरी.**

असुर पार्वतीस नेत ॥ पाहुनि दंगा शिवगणांत ॥ हर ध्यानाविसर्जीत ॥ होउनि पहात चहूंकडे ॥ १ ॥

**पद राग भूप कल्याण ताल त्रिवट.**

कोलाहलें झालें ध्यानविसर्जन सदाशिवाचें ॥ गणमुखें कळलें दुष्टकर्म सिंदुरासूराचें ॥ ध्रु० ॥ वृषभीं आरूढोन धनुष्यबाणांत घेऊन ॥ त्रिशूल करीं लागे युद्ध मग शीवसिंदूराचें ॥ १ ॥

**मा. प्र. महितल जिंकोनि:—**

शीव आला पाहुनि असुरें ठेउनि पार्वतिला ॥ शस्त्रें अस्त्रें घेउनीय करित युद्धाला ॥ ८ ॥

**मा. प. कोलाहलें झालें:—**

तुंबळ युद्धें जर्जर झाले दोघेही फार थकले ॥ इतुक्या माजी गणेश आले वृद्ध रूप ज्याचें ॥ २ ॥

**पद राग सोनी ताल त्रिवट.**

बोले दोघांलागीं विघ्नेश ॥ स्वयें धृतवृद्धवेश ॥ १ ॥ नोहे ही मर्यादा युद्धाची ॥ रे तुह्मां उभयांची ॥ २ ॥ उभय मानुनि त्याच्या वचनासी ॥ वद ह्मणती नियमासी ॥ ३ ॥ उभयांमध्यें माझा दंड हा ॥ त्या मर्यादें रहा ॥४॥ युद्धीं कदा न ऊलंघा यासी ॥ ऐका मर्यादेसी॥५॥

**मा. प. महीतल जिंकोनि:—**

मानुनीया नियम युद्ध करी असूर ॥ शीव न आटोपे जाणुन पळे सत्वर ॥ ९ ॥ त्यजुनिया गिरिजेस असुर वरप्राप्तीसी ॥ तप आचरायासि गेला बिरंचीपाशीं ॥ १० ॥

**॥ गीत ॥**

शंकर गिरजेलागि भेटले ॥ प्रेमाश्रू उभयांना आले ॥ मरण कोणाचे हातुन बोले ॥ गिरिजा असुराचें ॥ १ ॥ वधिता यासी आदि

गणपती ॥ करी व्रत निष्ठेनें चित्तीं ॥ येउनि उदरीं तव व्रतांतीं ॥ मारिल असुरातें ॥ २ ॥

**पद राग भीमपलासी ताल दीपचंदी.**

मग प्रार्थीतसे गौरी ॥ विघ्नेशा यावेंसी मम उदरीं ॥ध्रु०॥ सिंदुरासूरासी मारी ॥ दीनभक्त जन तारी ॥ मनोरथ पूर्ण करी ॥१ ॥ असे त्यासी वरप्रदान ॥ तव हस्तें म्हणुनि मरण ॥ संकट नीवारी ॥ २ ॥ स्वप्न पडलें पार्वतीस ॥ तव उदरीं येतों खास ॥ आनंद गिरिजा करी ॥ ३ ॥ पुढें जातां कांहिं मास ॥ गर्भ राहे पार्वतीस ॥ विष्णुदास कथन करी ॥ ४ ॥

**॥ आर्या ॥**

तों हो आकाशवाणी गिरिजाउदरीं वसे तुझा वैरी ॥ सावध होयी असुरा सत्वर यातें उपाय कांहिं करी ॥ १ ॥

**घनाक्षरी.**

सूरवाणी ऐकोन ॥ क्रोधें धावे सिंदुरवदन ॥ ह्मणे असुरमायेंकरून ॥ वधितों त्यातें त्वरीत ॥ १ ॥ कपाटि उदकरूपेंकरुन ॥ अंबे उदरीं प्रवेशून ॥ गर्भमस्तक छेदून ॥ घेउनि येत बाहेरी ॥ २ ॥ पुढें जाय नर्मदातीरीं ॥ मस्तक आपटि चूर्ण करी ॥ शत्रुअंत केल्यावरी ॥ मोदें जात स्वस्थाना ॥ ३ ॥

**॥ ओवी ॥**

इकडे भरतां नव मास ॥ गिरिजा प्रसवे कबंधास ॥ देवगंधर्व दर्शनास ॥ येते झाले कैलासीं ॥ १ ॥

**॥ कटाव ॥**

पाहुनिया विपरित बाळा अंबा करि बहु शोकातें ॥ ध्रु० ॥ सुरगंधर्व दर्शना पातले ॥ पाहुनि कबंधजन्मा आले ॥ चाकित मानसिं सर्वांहि भ्याले ॥ बृहस्पतीसह धडा प्रार्थिलें ॥ तों त्यामधुनी शब्द निघाले॥ गजासुराचें प्रचंड रुंड ॥ आणावें बहु त्वरें प्रचंड ॥ धडास लावा होय अखंड ॥ सुरवर ऐसें वचन ऐकुनी ॥ गजासुराचें तोंड आणोनी ॥ जुडतां एकचि होती दोन्ही ॥ आनंदती पाहूनि देवमुनी ॥ नाहीं चिंता असुरहननीं ॥चाल॥ आनंदे सर्व मिळोनी गजवदन देत नामातें ॥१॥

## पद राग पिलू ताल एका.

उटणि सुवासिनी लाउनि न्हाणीत ॥ मिळुनि गणनाथ मर्दन करूनि माखितात ॥ तैल घालिती कर्णीं ॥ ध्रु० ॥ पायीं ठेउनि उपाडि मूर्ति घालितात पाणि त्या सुवासिनीं ॥ १ ॥ त्यां त्यां शब्दें रूदत बाळकरणी प्रेमें करूनि दाखवीत करूनी ॥ २ ॥ सर्व सुवासिनी मिळुनि अलंकारें सजऊनि घालितात पाळणीं ॥ ३ ॥ नाम गुरुमतें ठेऊनि गणनाथ त्या लागोनि घालुनियां पाळणीं ॥ ४ ॥ गाउनि गीत नीजवितातीं जोजो शब्दें हलवितातीं खेळविती डोलउनी ॥ ५ ॥ धन्य हरभाग्य ह्मणति लोक गूण वर्णितातिं प्रेमें करूनी ॥ ६ ॥

## पाळणा.

जोजोजोजोरे गजवदना ॥ सुरवरमनरंजना ॥ निद्रा करी आतां सुखशयना ॥ गौरीहरनंदना ॥ ध्रु० ॥ पाळणा बांधुनिया जडिताचा ॥ खेळणा मुक्तांचा ॥ अंतरिं निजवोनी ॥ हराचा ॥ आणि नंदनगौरीचा ॥ १ ॥ निर्गुणसगुण तूं झालासी ॥ मम उदरीं आलासी ॥ भक्तकार्जी तूं श्रमलासी ॥ सुखें करी शयनासी ॥ २ ॥ निजवी पाजउनी बाळासी ॥ माता गात गितासी ॥ विष्णुदास तया पाहोनी ॥ होत आनंदित मनीं ॥ ३ ॥

## ॥ ओव्या ॥

पुढें कांहीं कालेंकरून ॥ थोर होत गजानन ॥ बाळलीलें करून॥ तोषवी मन उभयांचें ॥ १ ॥ शस्त्रीं अस्त्रीं झाला निपुण ॥ वृत्त मग हें ब्रह्मनंदन ॥ सत्यलोकीं त्वरें जाऊन ॥ वदे काय सिंदुरा ॥ २ ॥ ह्मणे असुरा कां तूं स्वस्थ ॥ तव रिपू प्रबळ होत ॥ कैलासीं हरापाशीं त्वरीत ॥ पहा विचार आपुला ॥ ३ ॥

## मा० प० महीतल जिंकोनी:—

वृत्त ऐकुनि सिंदुरासुर बहू कोपला ॥ येउनी कैलासीं त्यासी बाहे युद्धाला ॥ १ ॥

## घनाक्षरी.

बोले हरा गजानन ॥ द्यावि आज्ञा मजलागून ॥ त्वरें असुर मारून॥ तुष्ट करिन सुरांते ॥ १ ॥ मग शस्त्रास्त्रें त्वरित ॥ समरांगणीं घेउनी

येत ॥ असुरासवें युद्ध करित ॥ मारित त्यासी प्रतापी ॥ २ ॥ देवगंधर्व आनंदीत ॥ सुमनवर्षाव करित ॥ मग महोत्साह करित ॥ सर्व मिळुनि कैलासीं ॥ ३ ॥

## मच्छावतार.

### पद राग मुलतानी ताल धुमाळी.

शुक कथी परिक्षिती रायासी काय तो ॥ मच्छरूप धरी कशास्तव केशव हो ॥ ध्रु० ॥ ब्रह्मादि भरत ते निद्रित हो जहाले ॥ चार वेद प्रलयीं ते मुखांतून आले ॥ हयग्रीवदानवें चोरुनिया नेले ॥ हो जागृत विधि हें कळवी श्रीपति हो ॥ १ ॥

### पद स्तुती. राग धनाश्री ताल अर्धधमार.

ये लोकारि हरि दिनांते उद्धारि तारी ॥ विधिसुरवरमुनि प्रार्थिति तुजासि त्वरें ॥ १ ॥

### ओवी.

ऐकोनिया ऐशी स्तुती ॥ भगवान मग काय करिती ॥ धुंडित दैत्या कारणें क्षिती ॥ परी तोही न सापडे ॥ ३ ॥

### पद राग यमन ताल एका.

क्रोधें श्रीधरें उदधिंत उडी टाकिली हो ॥ हयग्रीवदानवारा हुडकितो स्वयें हो ॥ ध्रु० ॥ विधिस वेद हरूनि त्रास ॥ देत तैसा तो द्विजांस ॥ पाहुनि त्या असुरास गाठि श्रीहरी हो ॥ १ ॥ क्रोध येउनी हरीस ॥ केश धरूनि संकासुरास ॥ निवाराया संकटास ॥ करीत काय मग हो ॥ २ ॥ होत प्रगट मच्छांतून मूर्ति ॥ चतुर्भुज सगुण ॥ गदाचक्र आयुधें पूर्ण ॥ बोधि दैत्यासी हो ॥ ३ ॥ न ऐके दैत्य जाणून ॥ मारी एक्या गदेकरून ॥ वेद घेत हिराऊन ॥ देत विधीसी हो ॥ ४ ॥

## मच्छावतार कथानक दुसरें.

### पद राग काफी ताल एका.

झालें काय काज हरिसि मच्छरूप धरायासी ॥ ऐका श्रोते सर्व तुम्ही

देउनि अवधानासी ॥ ध्रु० ॥ श्राद्धदेव स्नान करुनि अर्घ्य जों देत ॥ अकस्मात त्यांत एक लहान मच्छ येत ॥ दीन वदनें राक्षि नृपा ऐसें वीनवीत ॥ चा० ॥ कळवळुनी नृप कमंडलुंत ठेवि त्यासी ॥ १ ॥ कमंडलूभर होऊनि प्रार्थी तो नृपासी ॥ म्हणे नेउनि मजासि सोडि विस्तीर्ण सारसीं ॥ तेथें होतां पूर्ण ह्मणे नेई सागारासी ॥ चा० ॥ शत योजनें लांब होत नेतां उदधीं त्यासी ॥ २ ॥

### ओवी.

विराट स्वरूप पाहोनी ॥ आश्चर्य करी नृप मनीं ॥ विनयें करद्वय जोडुनी ॥ बोलें काय तयासी ॥ १ ॥

### साकी.

हे भगवंता अवतारा तूं इथें धरुनि कां येशी ॥ दीन प्रार्थितों कृपा-करुनिया सांगे नृप वदे त्यासी ॥ १ ॥

### श्लोक.

हरी मच्छरूपा धरोनी नृपाला ॥ ह्मणे ऐक जाईल पृथ्वी लयाला ॥ दिसांनींच साता तयांतूनि तूला ॥ उपाया तराया आलों सांगण्याला ॥ १ ॥

### आर्या.

पडतां नौका दृष्टी बीजें औषधि ऋषीस घेऊन ॥ वैसे बुडतां तिजला माझे शृंगासि टाक बांधून ॥

### ओवी.

इतक्यांत जगत्प्रलय झाला ॥ श्राद्धदेव औषधी मुनींला ॥ घेउनि नौके माजीं बसला ॥ हरीआज्ञेप्रमाणें ॥ १ ॥ तों विधीमुखांतून ॥ होती चार वेद उत्पन्न ॥ नेयी हयग्रीव ते चोरून ॥ ब्रह्मा कळवी हें हरीसी ॥ २ ॥

### मा. प. झाले काय काज हरि:—

ऐकोनीया विधीस्तवन मच्छरूपी हरी ॥ दैत्या लागी धुंडुनीया धरित त्या सागरीं ॥ न ऐके ह्मणुनि क्रोधें मारि त्यास हरी ॥ चा० ॥ चार वेद आणुनि परत देयी मग विधीसी ॥ ३ ॥

### ओवी.

श्राद्धदेवमनूसी ॥ करोनि तत्वोपदेशासी ॥ मनूस्थानीं स्थापी त्या- सी ॥ जाय मग तो निजधामा ॥ १ ॥

## कूर्मावतार.

### पद राग पिलु ताल त्रिवट.

कोणे एके काळीं देव दुर्वासाच्या शापें दैत्य युद्धीं जहाले ॥ तेज- हीन ॥ १ ॥ निर्जरमन होउनि भग्न विधीस घेउन सागरीं येऊन स्त- उनी घालीती ॥ लोटांगण ॥ २ ॥ ऐकुनि स्तवन मनिचें जाणुन क्षीरा- ब्धींतुन गंभिर वचनें काय बोलले ॥ भगवान ॥ ३ ॥ याहो कार्या सि- द्ध होण्या प्रबल दैत्यासह जोडा तुह्मी त्वरीत ॥ सख्य जाऊन ॥ ४ ॥ अमृत प्राप्ती त्यां हातून उदधीमंथनीं देइन घाला मंद्राचळासी ॥ उद- धीं आणून ॥ ५ ॥ औषधि घालुन करितां मंथन चतुर्दश अमुल्य रत्नें प्राप्त होतील ॥ उदधींतून ॥ ६ ॥ निर्जरीं स्तउनी कथितां बळीस मा- नऊनी तद्वचन बोलती काय ॥ तयां लागून ॥ ७ ॥

### आर्या.

उदधींत औषधीसह मंद्राचल घालुनी करूं मथन ॥ ह्मणजे अमृत लत्नें निघातिल बाळे राक्षसा करी कथन ॥ १ ॥ मानउनी असुरांना नग मंद्राचल अणावया त्वरित ॥ बलिशंबरादि अवघे निघती होऊ- न सज्ज वहु मुदित ॥ २ ॥

### घनाक्षरी.

मंद्राचल उपडून ॥ नेतां वाटेमाजिं पडून ॥ चिरडुनि दैत्य पावति म- रण ॥ हरि तों तेथें पातले ॥ १ ॥ कृपादृष्टीकरून ॥ करुनि त्यांस संजीवन ॥ गरुडावरी नग घालून ॥ सागर तीरिं आणित ॥ २ ॥ इ- कडें सुरदैत्य स्तउन ॥ गेले वासुकी घेऊन ॥ तेणें पर्वता वेष्टून ॥ सा- गरांत घालीत ॥ ३ ॥ औषधीही टाकुनि त्यांत ॥ मंथन देवदैत्य क- रित ॥ अहीमुखां देव होत ॥ न मानवे हें दैत्यांसी ॥ ४ ॥ मग दैत्य

ते प्रबल ॥ मुखाकडे होत सकल ॥ पुच्छीं देव ते तेजाल ॥ मंथन घाइ करीती. ॥ ९ ॥

### पद राग बसंत ताल त्रिवट.

ओढा हो राक्षसहो ओढा देवहो ओढावें॥ध्रु.॥दरदर ओढिति कडकड वाजति वासुकीची मोडुनी हाडें ॥ विषज्वाला टाकि भयंकर दैत्य ह्मणाति सोडुनि जावें ॥ १ ॥

### पद राग सोरट ताल धुमाळी.

मुखाकडे निर्जर झाले ॥ पुच्छ सकल दैत्यीं धरिलें ॥ सबळें मंथन करितां लागे बुडावया नग तो ॥ १ ॥ देव दैत्य चकित होती ॥ जाणुनिया मग श्रीपती ॥ कूर्म होउनी पृष्ठी देती मंद्राचलतळीं ॥ २ ॥ देव दैत्य गेले श्रमुनी ॥ अमृत न ये उदधी मधुनी ॥ स्वयें मग भगवान येउनी मंथनिं मिसळती ॥ ३ ॥

### पद राग कालंगडा ताल त्रिवट.

करिती ते मग धिंगाना दैत्य शब्द करिती नाना ह्मणती कांहो अमृत तें अजुनि निघेना वरकड रत्नां देवहो तुह्मी कां घ्याना ॥ ध्रु. ॥ विष निपजतां सकल ते त्रासले सुरीं शिवा प्रार्थीलें ॥ संकटीं मग गौरि मतें ते विष प्याले ॥ सुरसंकट नाशना ॥ १ ॥ धेनु निघाली ब्रह्मवादि ऋषीस दिली ॥ उच्चैःश्रवा देत भानुला ॥ ऐरावत इंद्र तया घेत ॥ हरि कौस्तूभाला ॥ पारीजात रंभा नाकीं करिती स्थापना ॥ २ ॥ विष्णु लक्ष्मी वरी शिव चंद्रा धरी ॥ सुरा दैत्य प्राशिती ॥ शंख धनु हरि धन्वंतरी अमृत ॥ झालें हें कलहा कारण सुरदैत्य यांना ॥ ३ ॥

### ओवी.

मग सुरासुर अमृता कारणें ॥ करिती पाहोनिया भांडणें ॥ जगच्चालक त्या श्रीहरीनें ॥ करणी केली विचित्र ॥ १ ॥

### पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

मोहनीरूपीं भगवान स्वयें नटला हो ॥ देवकाजा श्रीपती ॥ ध्रु० ॥

मुखचंद्रासभोंवती आभरणें दीप्ति तेणें बहु पडती ॥ सौंदर्याची सिमा न वर्णवे ईश्वरची नटमूर्ती ॥ विसरूनि भांडण चकित दैत्यजन ॥ वेडे पिसे मग पहाती ॥ चा० ॥ मूर्च्छित सर्व होती सोडुनिया लाजा ॥१॥ गोलबाहु कर कंकणमंडित ॥ हावभाव बहू करिती ॥ कांठिं आभरणें पीन वक्षस्थळ पदरानें सावरिती ॥ गजगतीगमनें वाजत पैंजण निऱ्या करें वर धरिती ॥चा०॥ असूरसूर भुलुनि पहात ती मजा ॥ २ ॥ क्षणोक्षणीं वर खालीं पहात मदें डाव्या गालीं स्मित हसती ॥ शोभे कुंकुमतीलक भालीं अलक करें सावरिती ॥ विष्णुदास ह्मणें वर्णु किती स्वरुपा न कोठें दुजी सरी ती ॥चा०॥ उभा भगवान देवाचिये काजा ॥३॥

ओवी.

रूपें मोहून दैत्यजन ॥ देवकपट त्यां न कळुन ॥ कामशरें हत होऊन ॥ ह्मणती काय तिजसी ॥ १ ॥

पद राग देश ताल धुमाळी.

वाटी अमृत मोहनी आहे तव विश्वास ॥ ध्रु० ॥ कांहीं भुलुनी कांहीं मदिरापानी ह्मणती तव दास ॥ १ ॥

पद राग भूप कल्याण ताल त्रिवट.

दैत्य हो जन न धरिती मम विश्वास ॥ ध्रु० ॥ अनृत शिरोमणी वेश्या मानीती जनीं ॥ विचारें वदा मज खास ॥ १ ॥

मा. प. वाटी अमृत:—

वेश्या ऐस वा कुलस्त्री परि आहे तुजवरि विश्वास ॥ २ ॥ तव दासानूदास लीन पदिं येतों आलिंगायास ॥ ३ ॥

मा. प. दैत्य हो जन न धरि:—

मम मानसापरी कराल मान्य जरी वाढिन अमृतास ॥ २ ॥

मा. प. वाटी अमृत:—

भुलुनि दैत्यांनीं अमृतघट तो दिला वदे विष्णुदास ॥ ३ ॥

मा. प. दैत्य हो जन न धरि:—

देवदैत्य स्नानें करिती मोहनीआज्ञे पंक्तिस बसती ॥ पाजी ती अमृतास ॥ ३ ॥

### कटाव.

फसऊनि दैत्यजनांसी देवांसी अमृत पाजी ॥ ध्रु० ॥ हंस गामिनी सभेत चमकत ॥ वाटी कलशें करूनि अमृत ॥ इतुक्यामाजी राहू त्वरित ॥ येउनि मिसळे सुरपंक्तींत ॥ अमृत पानाते जों करित ॥ चंद्र मोहनिस कपट सांगत ॥ रागें ती शिर त्याचें उडवित ॥ घडशीर परि स्पर्शें अमृत ॥ राहे पीडावया जिवंत ॥ सुरां वाटितां सरलें अमृत ॥ सर्व कपट हें दैत्यां समजत ॥ मोहनी हो तों गुप्त त्वरीत ॥ सुरदैत्यां मधिं युद्ध जुंपत ॥ नाटोपुनि ते दैत्यां पीडित ॥ इतुक्यामाजी नारद येत ॥ शांतवोनि दैत्यांस बोलत ॥ अमृतपानें ते बलिवंत ॥ उपाय यासी करा त्वरीत ॥ चा० ॥ घाडित दोघां स्वथानीं घालुनिया ऐशी समजी ॥ १ ॥

---

## वराहाऽऽवतार.

### पद राग झिंझोटी ताल धुमाळी.

हिरण्याक्ष हिरण्यकश्यपु उत्पत्ती,विक्रम त्यांनीं ऐका काय केले ॥ध्रु०॥ सनत्कुमार सनकसनंदन ॥ घेऊं जातां भगवतदर्शन ॥ आडविती त्य जयविजय येउन ॥ शापिती ते उभयांलागुन ॥ असुरयोनी पावाल म्हणून ॥ ऐकूनी ते उभय धरिती चरण ॥ चा० ॥ त्रयजन्मानंतर मुक्ति मिळेल ऐसा उःशाप मुनि देउनि गेले ॥ १ ॥

### ओवी.

पुढें कांहीं काल गेल्यावरी ॥ काय झालें जगांतरी ॥ जेणें दुःखें सुरांसुरी ॥ फार लागति भोगण्या ॥ १ ॥

### मा० प० हिरण्याक्ष हिरण्यः—

कोणे एके काळीं कश्यपालागून ॥ मागे दिती होमकाळीं भोगदान ॥ राक्षस वेळ ही निवारी ह्मणून ॥ परी तिच्या अत्याग्रहा पाहोन ॥ पाप भेणें भोग तीस देऊन ॥ होतील असुर उदरीं शापून ॥ चा०॥ लागतांचि भयें पदीं मुनी वदले ॥ २ ॥ तव सुतउदरीं हरीभक्त ॥ होयील ऐसा उःशाप देत ॥ दितीपोटीं गर्भ तो प्रबल होत ॥ प्रजा दुःश्चिन्हें

बहू पीडीत ॥ ठेवि शतवर्षें ती गर्भ आंत ॥ पुढें दैत्यातें द्वय प्रसवत ॥ चा०॥ हिरंण्याक्ष हिरण्यकश्यपु नामकरण केलें ॥ २ ॥ पुढें त्यांनीं बाहूबलेंकरून ॥ देवस्थानें घेतलीं हिराऊन ॥ पिडीती मुनी आणिक जन ॥ झाले विजयी त्रैलोक्य जिंकोन ॥ उन्मत्त नाटोपती कोणालागून ॥ सर्व देव मुनी एकत्र होऊन ॥ चा० ॥ जाऊनीया विधीलागी स्तविते झाले ॥ ३ ॥

### ओवी.

प्रलय झाला कूर्म अवतारीं ॥ मनु ब्रम्ह्याचें स्तवन करी ॥ ह्मणे तव मानसांतरीं ॥ काय आज्ञा मज कथी ॥ १ ॥ विधी ह्मणे पुण्यवान अशी ॥ प्रजा निर्मी करी त्वरेंसी ॥ तंव तो वदे रसातलासी ॥ हिरण्याक्षें धरा नेली ॥ २ ॥

### पद राग पिलु ताल दीपचंदी.

संकटीं विधी प्रार्थितसे विष्णूसी ॥ ध्रु० ॥ विधीनासीकांतूनी प्रसन्न विष्णू निघे धरूनि रूपासी ॥ १ ॥ अंगुष्ठमात्र प्रथम जन्मुनिया धरित प्रचंड देहासी ॥ २ ॥ जाणुनिया हरी स्तउनि तयाते सांगत संकटासीं ॥ ३ ॥ ऐकुनि माधव निघत वराहरूपें शोधित निशाचरासीं ॥४॥ ब्रह्मसुतें त्वरें सांगे जाऊनीया वृत्त सर्व असुरांसी ॥ ५ ॥ ऐकूनी वार्ता निघे हिरण्याक्ष करावया समर त्यांशीं ॥ ६ ॥

### घनाक्षरी.

वराहरूपें भगवंत ॥ हिरण्याक्षाते वधीत ॥ पृथ्वी स्वस्थळीं ठेवीत ॥ आनंदीत विधि मनु ॥१॥ हिरण्यकश्यपु जाय पळुन ॥ प्रजा मनू निरमोन ॥ चालवि क्रम आनंदोन ॥ गुप्त होती विष्णुही ॥ २ ॥

---

## नरहरीअवतार.

### पद राग पिलु ताल धुमाळी.

हिरण्याक्षनिधन ऐकोन ॥ हिरण्यकश्यपु बहु कोपोन ॥ मातें भागिनी शांतवोन ॥ मंद्राचली तपा वसे ॥ १ ॥ महा वर करोनी प्राप्त ॥

जिंकू त्रैलोक्या इच्छीत ॥ वल्मिक अंगावरि वाढत॥त्रास होत प्रजेसी॥२॥ देव गेले विधीस शरण ॥ मग ते त्या स्थानीं जाऊन ॥ सत्वर त्याते सावध करून ॥ मागे इच्छित बोलले ॥ ३ ॥ नमूनी त्याते दैत्य वदला ॥ अमर करावें देवा मजला॥तो वदे मरण आहे मजला॥तुज कोठोनी अमरत्व॥४॥

**घताक्षरी.**

नाग निशाचर देव ॥ भूत सजवि निर्जीव ॥ इतक्याहातुन सोडीव महीवरि स्वर्गी गृहीं ॥ १ ॥ विधी वर असा देऊन ॥ सत्यलोकीं करिति गमन ॥ दैत्य प्रमत्त होऊन ॥ देवस्थानें जिंकीत ॥ २ ॥ त्रासोनीया सुर समस्त ॥ जाउनि भगवंता स्तवीत ॥ अंतरिक्षवाणी होत ॥ एव्हां दैत्य नाटोपे ॥ ३ ॥ गोद्विजास होइल त्रास ॥ भक्त पुत्र होइल त्यास ॥ अवतार त्याच्या रक्षणास ॥ घेउनि मारिन तयातें ॥ ४ ॥

**॥ कटाव. ॥**

हिरण्यकश्यपूउदरीं विक्रमी चार सुत झाले ॥ ध्रु० ॥ ऱ्हादानुऱ्हाद संऱ्हाद सुत ॥ चवथा प्रऱ्हाद भगवत्‌भक्त ॥ ऐसे सुगुणी बुद्धीवंत ॥ हिरण्यकश्यपू काय करीत ॥ शंडामर्क गुरुपुत्रा आणित ॥ विद्यादान या करा म्हणत ॥ असुर विद्यीं तीन सूत ॥ होति प्रऱ्हादाविण निष्णात॥ प्रऱ्हादही ते कांहिं न शिकत ॥ नारायण हा ध्यास घेत ॥ बहुप्रकारें गुरू निवारित ॥ परी न त्यांचें तो ऐकत ॥ एके दिनिं प्रऱ्हादा घेत ॥ अंकीं पिता आणि काय पुसत ॥ कोण श्रेष्ठ सांग या क्षितींत ॥ प्रऱ्हाद एक वदे भगवंत ॥चा०॥ ऐकोनिया उत्तर ऐसें दानवमन बहु कोपलें॥१॥

**घनाक्षरी.**

कोपे दैत्य तो बहूत ॥ शंडामर्का रागें वदत ॥ झाली बाळधी विपरीत ॥ लाउनि शिक्षा सुधारा ॥ १ ॥ पुढें प्रऱ्हादा गृहिं आणोन ॥ पुसति गुरू जों दटाऊन ॥ परि तो नाम नारायण ॥ सदा मुखें वदत ॥ २ ॥ पुन्हा एकदां सभेंत ॥ पिता शीकला काय पुसत ॥ बदे प्रऱ्हाद भगवंत ॥ नाम सगुण शीऊलों ॥ ३ ॥

**पद राग कालंगडा ताल धुमाळी.**

हिरण्यकश्यपु कोपला त्वरें प्रऱ्हादा मारा मारा दैत्यांसी वदला ॥ १ ॥ दैत्य बहू मारीती कडेलोट करीती ॥ कोपे पाहोनिया तो न

मेला ॥२॥ हत्तीपायीं बांधीती शिरीं घेत त्या हत्ती ॥ न मरतां जिवंत राहिला ॥ ३ ॥ सर्पासीत बाधा करा ह्मणतां दैत्य करिती त्वरा ॥ वैश्वानरा लावितां न मेला ॥ ४ ॥ सागरीं त्या लोटीती न मरतां पर्वतीं ॥ नेऊनिया लोटिती त्याला ॥ ५ ॥ सर्वोपाय थकत घेउनि दैत्य सुत ॥ येती त्वरें मग राजसभेला ॥ ६ ॥

### पद राग मल्हार ताल धुमाळी.

हिरण्यकश्यपु क्रोधें कयाधु आणून ॥ वदे कोपोन विषेंकरून ॥ मारी दुष्ट प्रल्हादा न लावी क्षण ॥ १ ॥

### पद राग भीमपलासी ताल एका.

कयाधु माय काय बोलली ॥ ऐकुनी क्षिति थरथरली ॥ १ ॥ बाळबोल मनि न आणणें ॥ मारणें न योग्य, सोडणें ॥ २ ॥ नावडे तरि त्याग वनिं करा ॥ मम वरा दीन पामरा ॥ ३ ॥

### मा. प. हिरण्यकश्यपु क्रोधें:—

मारि विषें नातरी तुजसी वधितों ॥ पोर दिसतो काळ भासतो मारि यासि नातरि मुकसी प्राणाला ॥ १ ॥

### मा. प. कयाधु माय:—

न चले यत्न घेउनि मुल करीं ॥ आलि घरीं शोक बहु करी ॥ ४ ॥ करूं तरि कसें बाळहनन ॥ वचन योग्य न उल्लंघन ॥ ५ ॥

### पद राग पिलू ताल त्रिवट.

कैसें मारविशी जगदीशा मम बाळाते॥माझे हातें विष यातें घालित मी राक्षि अनंता ॥ तूं यातें धाव आतां लवकर येई ॥ ध्रु० ॥ आजवरी करऊनी स्तनपानातें ॥ या हातें कैचें विष पाजूं यातें ॥ किति तरि केलेत यत्न मारायाते ॥ विष यातें घालित ॥ १ ॥

### पद राग पिलु ताल धुमाळी.

प्रारब्ध आहा ! विपरीत घडवीतें ॥ मातेच्या हातें बाळ मारवीतें ॥ ध्रु० ॥ न केला कधीं श्रेष्टमानभंग ॥ अथवा विघडीला देवार्चनरंग ॥ काय पतिमनीं उठला हा तरंग ॥ चा० ॥ देवा धावोनी रक्षी

अनाथाते ॥ १ ॥ ऐसी दुष्ट कां माते निर्मीयेली ॥ मातेच्या उदरीं का न दग्ध झाली ॥ पूर्वकर्माचीं फलें प्राप्त झालीं ॥ चा० ॥ बरवें होतें जन्मतांची मी मरते ॥ २ ॥ नाहीं मजजवळी लेश हो पुण्याचा ॥ पतिनें संग्रह केलाही पापाचा ॥ हरि न निरशिता दुष्टाचे तापाचा ॥ खिन्न दीन मी तूजला आळवीतें ॥ ३ ॥ चित्तीं हरिपाय माऊली आठवीत ॥ शोकें जोडोनी दीन दोन्हीं हात ॥ बाळा पाहोनी स्तनिं पान्हा दाटत ॥ चा० ॥ ये ह्मणे विष्णुदास कृपा हरितें ॥ ४ ॥

**मा० प० कैसें मारविशी:—**

पूर्वदुष्टकर्म आजि फळा आलें ॥ स्रायोगें पतिनें ऐसें कथिलें ॥ अनाथनाथें आजवरि पाळीलें ॥ देत विषातें ॥ २ पाजून विष माय कारि चिंतेला परि तो न मरतां खेळूं लागला ॥ विष्णूदासा जगदीशें रक्षीला ॥ हर्ष माते ॥ ३ ॥

**॥ अभंग ॥**

शंडामर्क गुरू कळविती नृपासी ॥ विषें नाहीं यासी कांहीं झालें ॥ १ ॥ कोपे पुत्रावरी नृप तो बहुत ॥ गुरू शांतवीते तया झाले ॥२॥ ह्मणती शुक्राचार्य येई तोंपर्यंत ॥ रक्षूं मारूं पुढें अन्योपायें ॥ ३ ॥ मानऊनी नृपा पाशीं बांधोनीया ॥ गुरुपुत्र जात स्वकाजासी ॥४॥ ह्शकृपें सर्व बंधनें तूटती ॥ तत्वज्ञान दैत्य सुता सांगे ॥ ५ ॥ म्हणती ते तयासी कोणी बा तुजसी ॥ तत्वोपदेशासी शिकवीलें ॥ ६ ॥

**पद राग खमाज ताल झुमरा.**

बोले प्र्ल्हाद दैत्य बालकांसी ॥ तत्वउपदेशाचें ज्ञान कैसें झालें कथितों तुम्हांसी ॥ ध्रु० ॥ मम पितु पूर्वीं तपासि बसला असतांना बलि देवांनीं ॥ हरुनी दैत्यसंपत्ति इंद्र कयाधु जाई घेऊनी ॥ नारदें प्रार्थूनि तयासी नेली तिज असतां गर्भीणी ॥ नारदें कथिलें तिजप्रति तें गर्भिंच धरिले मीं मानसीं ॥ १ ॥

**ओवी.**

सोडोनि दैत्यकुलाचार ॥ दैत्यसुत हरीचरित्र ॥ गाती पाहोनी गुरूपुत्र ॥ भिऊनी कळविती नृपासी ॥ १ ॥

### पद राग भैरव ताल धुमाळी.

हिरण्यकश्यपु कोपोन ॥ पुसे पुत्रालागोन ॥ कोणी दुष्टा तूज बि-
घडीला ॥ १ ॥ कोण तव रक्षीता ॥ मारीतों तूज आतां ॥ राक्षिल
देव प्ऱ्हाद वदला ॥ २ ॥ सांग कोठें देव तो ॥ ह्मणतां काय वदे
तो ॥ जलीं स्थलीं आहे स्तंबीं व्यापीला ॥ ३ ॥ कोपे दैत्य तो फार॥
स्तंबीं कारितां प्रहार नरहरी तेथें प्रगटला ॥ ४ ॥ कडकड शब्द हो
खांबीं ॥ हडबडली पृथ्वी ॥ प्रगटुनि धरी क्रोधें दैत्याला ॥५॥ क्रोधें
धरी मांडीवरी ॥ नखें पोट विदारी ॥ आंतडी काढितांची दैत्य मेला॥६॥

### घनाक्षरी.

देव झाले आनंदीत ॥ क्रोध शांत करा ह्मणत ॥ रमा शांतवाया
जात ॥ परि न शांत होत ते ॥ १ ॥ मग प्ऱ्हादा आणोन ॥ क्रोध
शांतवी स्तऊन ॥ ह्मणाति भयाभीत होऊन ॥ प्ऱ्हाद करीत स्तुती ॥२॥

### पद राग बिभास ताल झंपा.

हे नरहरी दीन चरणीं तुझ्या लीन ॥ क्रोध हा शांतउन ॥ आह्मा
तारी ॥ १ ॥ या पामरास्तव स्तंबीं हो उद्भव ॥ श्रमला रमाधव आपण
फारी ॥ २ ॥ झाला असुरअंत व्हावें आतां शांत ॥ व्हावें कृपावंत
आम्हावरी ॥ ३ ॥

### ॥ ओवी ॥

मग नरहरी शांतवून ॥ दैत्याधीप प्ऱ्हादा करुन ॥ स्वयें पावले
अंतर्धान ॥ कृपा दासावरी सदा ॥ १ ॥

---

# रामायण.

## दशरथविवाह, श्रावणवध आणि रामजन्म आख्यान.

### पद राग देस ताल धुमाळी.

रामकथामृत रूचीर ॥ ऐका श्रोते साचार ॥ ध्रु० ॥ गोद्विजांस हो

असुरांनीं ॥ पीडीलें त्रास देऊनी ॥ तैसे मुनियज्ञयाग ॥ न होती यथा सांग ॥ चाल ॥ गांजले सूरगोद्वीज हो धरेस पापभार ॥ १ ॥ क्षिर-सागरिं सर्व जाऊनी ॥ कथिती विष्णू स्तवोनी ॥ तीं झाली गंभिर वाणी ॥ सोडवितों तुह्मा लागोनी ॥ चाल ॥ परि ऐका हो सर्वत्र मम आज्ञा ही सुरवर ॥ २ ॥ जागें व्हा तुम्ही निर्जर ॥ बलिवंत हो वानर॥ येतों मी दशरथवीर ॥ उदरीं नामें रघुवीर ॥ निर्दाळिन दुष्टांलागी विष्णुदासा सांगे सार ॥ ३ ॥

### सारिकाछंद ताल धुमाळी.

चोहींकडे दैत्य मातले ॥ पुण्यमार्ग ते बंद जाहले ॥ पापभारें धरा हाले ॥ पुढें काय तों वर्तत ॥ १ ॥ रावण पौलस्तीचा सूत ॥ बलीवंत बहु क्रूर मत्त ॥ अमरत्वास्तव हरा स्तवीत ॥ वदे काय तों ब्रम्हा त्या॥२॥ नाहीं अमरत्व कोणाला ॥ परी सुरासुरगंधर्वाला ॥ अजिंक होशिल तूं सर्वाला ॥ एक मनुजावांचोनी ॥ ३ ॥ आनंद झाला रावणासी ॥ ह्मणे मनुज हे तृणसम मजसी ॥ मग घेउनिया असुरदळासी ॥ जिंकी सर्व त्रैलोक्य ॥ ४ ॥ इंद्रादिक सकल सुरवर ॥ लावी सेवेसी साचार ॥ पुसे विरंची मत्त असूर ॥ सभेंत एकेसमयीं ॥ ५ ॥

### पद राग सोरट ताल धुमाळी.

रे ब्रम्ह्या रावणें जिंकिलें सर्वहि या ब्रह्मांडाला ॥ पराक्रमें सेवेसि लाविलें देवासह देवेंद्राला ॥ ध्रु० ॥ अमरत्व म्यां असें मिळविलें स्त-उनि शंकराला ॥ मज हंता कोणिच न जगतीं असल्या सांग मला ॥ काळाहि असला मारून टाकिन क्षणमात्रें त्याला ॥ चाल ॥ असुरसुरा जिंकिता याजला काय अशक्य सांग मला ॥ १ ॥

### पद राग सिंधकाफी ताल त्रिवट.

व्यर्थ व्यर्थ ही नको बढाई बोले विधि तो दशवदनासी ॥ ध्रु०॥ अ-जपाळसुत वीर दशरथ ॥ तत्सुतहातें मृत्यू तुजसी ॥ १ ॥ ठरुनी विवाह दश-रथ कौसल्या जात वऱ्हाड सागरिं लग्नासी ॥ २ ॥ आतांची ते नौके-माजीं बसुन जात आहेत पूर्वेसी ॥ ३ ॥ कौसल्यासुत भावी रघुविरहातें तूं पावासि मृत्यूसी ॥ ४ ॥ विष्णुदास ह्मणे परिसुनि ऐसें क्रोधें रावण जात शोधासी ॥ ५ ॥

### सा० प० रे ब्रम्ह्या रावणें:—

सागरिं वऱ्हाड पाहुन गाठी दळसह त्या रावण ॥ फोडुनि नौका बुडवित सर्वा करीत दाणादाण ॥ घालुन पेटिंत कौसल्येते मच्छहातीं देऊन ॥ चा० ॥ गुप्तद्वीपिं ठेवऊन तिजला गर्वे कथि येउन वि-धिला ॥ १ ॥

### सारिका छंद ताल धुमाळी.

इकडे सागरीं दशरथ ॥ बुडतां हातीं फळी सांपडत ॥ पोहत ये-उनि द्वीपा लागत ॥ कौसल्या होती जेथें ॥ १ ॥ दृष्टिस पडतां पेटी तेथें ॥ उघडी दशरथ कौतुकें ते ॥ तों कौसल्या पडे दृष्टिते ॥ राजा मोदें तिज भेटे ॥ २ ॥ अवचित तेथें नारदमूनी ॥ येउन त्यांचें लग्न लाउनी ॥ अशिर्वाद तयास देउनी ॥ रावणा येउन कथि वृत्त ॥ ३ ॥ रावण मनीं क्रोधाऊन ॥ आणवी उभयांते धरून ॥ मारूं धावे ज्यां त्यांलागुन ॥ मंदोदरि तों काय करी ॥ ४ ॥

### पद राग झिंझोटी ताल त्रिवट.

रावणासी विनवी पट्टराणी मंडोदरी प्रीया क्रोध आवरी ॥ ध्रु० ॥ इह दूरीच्या हो दूरीता आजच कां बोलावीतां ॥ सोडावें या उभयतां अनर्थकारी ॥ १ ॥ न चुके भवितव्य वीधीशी सोडी नाथा कूबुद्धीसी ॥ भोगा दारासंपत्तीसी आनंदकारी ॥ २ ॥ सूज्ञें वाईट त्यागावें आडमार्गें कां हो जावें ॥ दासें विष्णूसी भजावें हें सूखकारी ॥ ३ ॥

### ॥ आर्या ॥

विधिनें हि बोध करूनी कौसल्या दशरथास सोडउन ॥ देवाचित आयोध्ये येती दोघे बहू आनंदोन ॥ १ ॥ सूमुहुर्तानें त्याते राज्यीं स्थापीतसे वासिष्ठमुनी॥देयी सुख सर्वां तो नीतीनें शांत राज्य चालउनी ॥ २ ॥

### ॥ अभंग ॥

इकडे एके दीनीं विमानीं बैसोनी ॥ फिरतां रावण पाहे रंभे॥ १ ॥
धरीतां तीजसी रडे अनीवार ॥ पाहोनी असूर सोडी तीज ॥ २ ॥
नलकुबरासी सांगे दुःखें वृत्त ॥ कोपोनी तो देत शाप त्यासी ॥ ३ ॥
परस्त्रीयेवरी करितां बलात्कार ॥ मरशील सत्वर जळोनीया ॥ ४ ॥

शापें क्रोधावूनी प्रलय मांडीत ॥ होत हो अकांत त्रीभूवनीं ॥ ५ ॥
करुणा येवोनीया वैकुंठीचा राणा ॥ भक्तांच्या कामना पूरवीत ॥ ६ ॥

॥ कटाव ॥

तों अयोध्या नगरींत अघटीत काय वर्तलें ॥ ध्रु० ॥ पराक्रमी तो वीर दशरथ ॥ सूनीतीनें राज्य करीत ॥ त्रिभुवनामाधिं कीर्ति गाजत ॥ परी संततीस्तव मनांत ॥ रात्रंदिवस चिंताक्रांत ॥ एके दिनि असतां निद्रिस्त ॥ स्वप्न रायालागी प्रडत ॥ एक स्त्री द्विजद्वयासहीत ॥ यांचा केला आपण घात ॥ जागृत होउनि मनीं दुःखित ॥ गुरू वसिष्टा सर्व कथीत ॥ मुनी ह्मणे न भी हो शांत ॥ कथितों तुजला प्रायश्चित्त ॥ मृगमांसाचें करी हवन ॥ राय जात मृगये तें ऐकुन ॥ बसे वनीं जाळींत दडून ॥ तों इकडे कावडींत घालुन ॥ मायबाप अंध वृद्ध श्रावण ॥ ऊष्णतेस्तव रात्रीं चालुन ॥ नेत असे यात्रे त्यांलागुन ॥ मार्गी वधां लागे तहान ॥ उदक मागती सुतालागुन ॥ झारी घेउन निघे श्रावण [illegible] ॥ बसला होता दशरथ येउन ॥ बुडबुड झारी स्वच्छ करून ॥ बुडबुड ऐसा शब्द ऐकून ॥ पारध समजुनी मारी बाण ॥ लागुन धरणी पडे श्रावण ॥ आर्तस्वर तों त्याचा ऐकुन ॥ गेला राजा तेथें धाउन ॥ भयाभीत मनिं विप्रा पाहुन ॥ चाल ॥ जोडुनेया हस्त वदत क्षमा करा कोण तुम्हि कुठले ॥ १ ॥

पद राग रामकली ताल धुमाळी.

अधमाधम दुष्टा रे क्रूर ॥ केला त्वां अविचार ॥ ध्रु० ॥ बाणें भेदूनी हृदयाला ॥ पाडिलें अनाथाला ॥ कोण पाजील उदक आतां ॥ माझ्या मातापीत्या ॥ तृषाक्रांत रे ते वृद्ध ॥ तळमळती संनीध ॥ पाजी उदक त्वरें त्यांजला ॥ मुकातिल ते प्राणाला ॥ जा जा राजा रे नेनीर ॥ पाजावे त्यां सत्वर ॥ ओळख तुझी न दे त्यांला ॥ न सेवितिल उदकाला ॥ उदक त्यांसी पाजील्यावर ॥ सांगे हा प्रकार ॥ राजा भयाभीत नीघाला ॥ उदकासहीत आला ॥ मौन्यें रायानें मुखाला ॥ लावितांचि झारीला ॥ शंका येउनिया उभयांला ॥ ह्मणती काय तयाला ॥ १ ॥

पद राग यमन ताल धुमाळी.

तूं बोलल्याविना न करूं उदकपाना श्रावणा ॥ ध्रु० ॥ शोधीतां

बा उदकाला श्रम झाले फार तुला ॥ बहु वनिं धुंडतांना ॥ १ ॥ कधीं तुज राग आला उभयीं न पाहीला ॥ झाले जरि कष्ट नाना ॥ २ ॥ विष्णुदास सूपुत्र सदा संतोषीतचित्त ॥ बोल प्रिया सुगुणा ॥ ३ ॥

॥ दिंडी ॥

ऐकुनी हें दशरथें वृद्धवचन ॥ कापे थरथर तो बहू भयेंकरून ॥ क्षमा करा अपराधि मी बहूत ॥ चरणिं लागुन जाहलें वृत्त कथित॥ १॥

पद राग कालंगडा ताल त्रिवट.

आज झालें हें चुकोन देवा या दीन दशरथा हातोन ॥ ध्रु० ॥ सरोवर तीरा या पारधी म्हणून म्यां मारीला श्रावण बाणेंकरून ॥ १ ॥ क्षमा करावी मजला न चुके आपूल्या सेवेला आहा तुम्ही वंद्य मजला मम मातापीत्याहून ॥ २ ॥

पद राग मुलतानी ताल धुमाळी.

आम्ही अंध पंगू दीन अशक्त वृद्ध शक्तीहीन ॥ पुत्र न हा उभय प्राण दुष्टा हारीलासी ॥ १ ॥ क्रूरा तूज न वीचार काय केला अवीचार ॥ प्राणांतीं पुत्राते दूर केलेंसी अम्हांसी ॥ २ ॥ न करूं आम्हि उदकपान न ठेऊं हा प्राण जाण ॥ तूं ही पुत्र पुत्र म्हणुन सोडसील प्राणांसी ॥ ३ ॥ देउन शाप दशरथाला पीटित शोकें ह्रदयाला ॥ त्यांणीं सोडीलें प्राणाला दुःख हो रायासी ॥ ४ ॥ तीघांचेंहि उत्तरकार्य संपादुनि येउनिया राय ॥ धरुनी विष्णुदास पाय सांगे वसिष्ठासी ॥५॥

॥ आर्या ॥

बोले वासिष्ट राया या शापीं लाभ जाहला तुजला ॥ होवो या शापें तरि कुलभूषण पुत्र तुज धरापाला ॥ १ ॥

॥ गीत ॥

कवीबळें तों अमरपुरींत ॥ वृषपर्व्यादी देवां गांजित ॥ अवर्षणें दुष्काळपाडित ॥ शुक्राचार्य गुरू ॥ १ ॥ मग घेउनिया असुरदळाते ॥ वृषपर्वा जायी स्वर्गाते ॥ जर्जर करीत देवेंद्राते ॥ सर्व सुरांसहित ॥२॥ निर्जर होती चिंताक्रांत ॥ बृहस्पतीसह विचार करित ॥ देवेंद्रा तों सुचोनि वदत ॥ काय सर्वांते ॥ ३ ॥

### पद राग भैरव ताल धुमाळी.

उपाय हाची हो खचीत करा तुम्ही त्वरीत ॥ ध्रुं० ॥ आणा दशरथ नृपाळा ॥ अजींक महिपाला ॥ तोची वधील या दैत्यांला ॥ धाडा मातूलीला ॥ आज्ञा करितांची मातुलीला ॥ येउन कथित नृपाला ॥ निरोप ऐकुनिया हर्षला निघत त्वरें जायाला ॥ १ ॥

### पद राग पिलु ताल त्रिवट

कैकयी वदे दशरथालागून प्रीया ऐका वचन ॥ दैत्ययुद्धीं न्यावें मज मी येईन ॥ध्रु०॥ आपण जवळ असतां मजसी भीती काय कांता ऐका हो तरि प्राणनाथा कां म्हणतां न न ॥ १ ॥ नेणो एकादें हो काज अवलाहतुन होतें सहज ॥ म्हणोन स्तवितें न्यावें मज कृपाकरून ॥२ ॥ पुढें जें जें होणार घडे करणी तदनूकार ॥ तीज घेत दशरथवीर शकुन हाची म्हणोन ॥ ३ ॥

### ॥ कटाव ॥

सुरासुरयुद्धामाजी दशरथ विजयी झाला ॥ ध्रु० ॥ प्रियेसह स्वर्गासी येत ॥ असुराशीं मग युद्ध आरंभित ॥ बाणें सर्वां जर्जर करित ॥ असुरगुरू तो शुक्र त्वरीत ॥ युद्धालागी उभा रहात ॥ बहु अस्त्रें राजावर टाकित ॥ सर्व निवारण राय करीत ॥ दिव्य अस्त्र मग गुरू फेकित ॥ रथआंसाते मध्यें तोडित ॥ हें पाहुन कैकयी त्वरीत ॥ विचित्र करणी काय करीत ॥ आंसामाजी हात घालित ॥ रणांगणीं रथ उभा ठेवित॥ दशरथ प्रखर शर काढित ॥ यमधामा कवि धाडुं इच्छित ॥ तो येउनिया इंद्र वदत ॥ ब्राह्मण हा या सोडिं पराभुत ॥ ऐसें ऐकुन किरीट तोडित ॥ मग दैत्यांसह शुक्र पळत ॥ पाहुनिया स्वस्त्रीचें कृत्य ॥ राय मनीं बहु चाकित होत ॥ माग ह्मणे वरद्वय त्वरीत ॥ वदे कैकयी रायालागुन ॥ वाटतलि तैं मी मागेन ॥ मान्य केलें रायें वचन॥चा०॥गौरवि वस्त्रेंभूषणें देवेंद्र तो उभयांला ॥ १ ॥

### घनाक्षरी.

सर्व देव संतोषोनी ॥ ह्मणाति राया तुजलागूनी ॥ होतिल पुत्र श्रेष्ट गुणी ॥ तरी यज्ञ तूं करी ॥१॥ घेउन जा या सुरूपखाण ॥ सुरांगना या

धाडून ॥ आणी शृंगिते भुलऊन ॥ कार्यसिद्धि होइल ॥ २ ॥ मग वंदुनि सर्वांस ॥ आला नृप अयोध्येस ॥ सांगुनि सर्व वासिष्ठास ॥ यज्ञसिद्धता करी ॥ ३ ॥

### पद राग सोनी ताल त्रिवट.

करवित दशरथराय सर्व सामग्री मिळवून पुत्रकामेष्टी यज्ञ ॥ ध्रु० ॥ देवांगनांसी कथीत ॥ घेउनि शृंगार साहित्य ॥ आणा शृंगऋषी भूलवोन वनीं जाऊन ॥ १ ॥ वीभांडकाचा कूमर ॥ वयें लहान चतूर ॥ कळवीतां न त्यास त्वरें या येथें घेऊन ॥ २ ॥ सजुनी मग त्या सुंदरी ॥ संगे विलास सामग्री ॥ येत्या झाल्या बहू आनंदें वनालागून ॥३॥ पाहुनि गुंफेत्तर ॥ शृंगी एकला कूमर ॥ आरंभीत अभिनयसह नृत्यगायन ॥ ४ ॥ चकित शृंगी तें पाहोन ॥ विभांडक तों स्नानाहून ॥ येतां पाहोनी जात देवांगना पळून ॥५॥ सूत पीत्या काय बोले ॥ आतां मूनी एथुन गेले ॥ बहू चतूर आनंदी आणि गुणवान ॥ ६ ॥ पिता ह्मणे ऐसे निधी ॥ पुजिले कां त्वां नाहीं आदीं ॥ काय केलासी तयांचा हा अपमान ॥ ७ ॥ पुन्हा पीता तो स्नानासी ॥ जातां गाठीत तयासी ॥ कुमर आनंदें मानसीं बहू त्यांते पाहोन ॥ ८ ॥ स्वताताविण अन्य ॥ न त्या मनुष्यदर्शन ॥ करी वीपरीत प्रश्न देवांगनांलागून ॥ ९ ॥ ऐकुन त्याचें वचन ॥ सुरांगना त्या हसून ॥ ह्मणती त्याते काय आलिंगून प्रेमें करून ॥ १० ॥

### पद राग यमन ताल त्रिवट.

तुला ठाऊक नाहींत कधीं ऋषीवर्या स्त्री मृद्गांगसंगरंग ॥ ध्रु० ॥ घालुनि गळा मिठी धरुनि हनुवटी ॥ चुंबित झटी कामीनी त्या निःसंग ॥ १ ॥ घालुनि पुष्पहार रति करीती चतूर ॥ शृंगारीक मनोहर उपांगसंग ॥ २ ॥ ऋषी मोहीत केला लागुन पाठीं तो आला ॥ विष्णुदास व्रत होवोनीया भंग ॥ ३ ॥

### ॥ ओवी ॥

रायें शृंगसि पाहोनी ॥ आनंदला बहूत मनीं ॥ तों ये विभांडक मागोनी ॥ क्रोधें पुत्रा शोधीत ॥ १ ॥ पाहोनि रायें त्या कुपीत ॥ विनवोनि बहू शांतवीत ॥ मग यज्ञ आरंभीत बहू आनंदें करोनी ॥ २ ॥

### पद राग सोनी ताल त्रिवट.

सांग होतां याग अग्नी झाला प्रसन्न ॥ पायस ताटीं अर्पुन वर दे राया लागोन ॥१॥ पायास वीभागून वसिष्ठे समसमान॥देता झाला कौसल्यादीं तीघीं वाटून ॥ २ ॥ तीं नेयी कैकयीपिंड घार उचलोन ॥ शोक करीत तीते पाहुन, दोघीं सगूण ॥३॥ देत्या झाल्या अर्धभाग आपल्यामधूनं ॥ सेवीती त्या तीघी मग आनंदोन ॥४॥ देत राय विप्रऋषी अमूप धन ॥ शृंगी लागी करी कन्या शांता आर्पण ॥ ५ ॥ बोळवीत सर्वांलागी आनंदोन ॥ कांहीं काल गेला तिघींस गर्भ राहून ॥ ६ ॥ कैकयी सुमित्रेचे दोहद पुरऊन ॥ येत आनंदें कौसल्या धामा लागून ॥ ७ ॥

### पद राग तोडी ताल त्रिवट.

दशरथ पुसूं येतां दोहद कौसल्येते ॥ तंव ती रामरूपीं मग्न वदे काय तयाते ॥ ध्रु० ॥ घालूनी वीरासन हातीं धनु घेउन ॥ करीन ह्मणे गाधीमखरक्षणाते ॥ १ ॥ पित्रृवचनपालना त्वरें जाऊनीया वना ॥ मारीन पंचटींत दुष्ट असुरांते ॥ २ ॥ प्रीय वानर सकळ मारीन घेऊनी दळ ॥ सुवेळे रावणासह बहु दनुजांतें ॥३॥ विष्णुदास मनीं शांकित होऊनी ॥ सांगे वसिष्ठा इते झडपिली भूतें ॥ ४ ॥

### ॥ आर्या ॥

बोले वसिष्ट राया उदरीं येणार तव रमाकांत ॥ करणी तदानुकारी कौसल्या ती सती असे करित ॥ १ ॥

### ओवी.

पूर्ण होतां नऊ मास ॥ कौसल्या कैकयी सुमित्रेस ॥ झाले सुत, रायमानस ॥ तेणें फार तोषलें ॥ १ ॥

### पद ताल सारंग ताल दीपचंदी.

चैत्रमासीं माध्यान्हीस प्रसवुली कौसल्या सूपुत्रास ॥ ध्रु०॥ वसंतऋतू नवमी रविवासरीं पुष्यनक्षत्र दिवसास ॥ १ ॥ अष्टवर्ष मूर्ती श्यामसुंदर सगुण न वर्णवे शेषास ॥ २ ॥ गर्भवेश्म भरलें जयाचे तेजें आनंद हो मातेस ॥ ३ ॥ नारायण स्वयें अवतरे दीन भक्तजनपालनास ॥ ४ ॥ विष्णूदास ह्मणे सती आलिंगुनी काय वदे पुत्रास ॥ ५ ॥

## ॥ अभंग १ ॥

बाळलीला माते दावी रे अनंता ॥ पुरवी हा माताहेत देवा ॥ १ ॥ आऐकोनिया ऐसें मातेचें वचन ॥ होवोनी लहान रडुं लागे ॥ २ ॥ आनंदोन माता घेत मांडीवरी ॥ धन्य ह्मणे भाग्य जगीं माझें ॥ ३ ॥ विष्णुदास ह्मणे पुढें वसिष्ठाचे ॥ मतानें ठेवीती नामें त्यांची ॥ ४ ॥

## पद राग पिलु ताल धुमाळी.

उठणि सुवासिनी लाउनि न्हाणित ॥ मिळुनि रघुनाथा मर्दन करुनि माखितात ॥ तैल घालुनि कर्णीं ॥ध्रु०॥ पायीं ठेउनि उपडि मूर्ति घालितात पाणि त्या सुवासिनी ॥ १ ॥ त्या त्या शब्दें रूदत बाळकरणि प्रेमेंकरुनि दाखवीत करुनी ॥ २ ॥ सुवासिनी सर्व मिळुनि अलंकारें सजऊनि घालितात पाळणीं ॥ ३ ॥ नाम गुरुमतें ठेऊनि रघुनाथा घालुनिया पाळणीं ॥ ४ ॥ गाउन गीत निजवितााति जो जो शब्दें हलवितााति खेळवीती डोलऊनी ॥ ५ ॥ धन्य दशरथास ह्मणाति लोक गूण वर्णिताति प्रेमेंकरुनी ॥ ६ ॥

## ॥ पाळणा ॥

निजरे निज बाळा रघुनंदा कां चाललासि कळेना ॥ ध्रु० ॥ बांधुनि जडिताचा पाळणा ॥ मुक्तांचा खेळणा ॥ निजवीलें आंत रघुनंदना ॥ सुखें करी बा शयना ॥ १ ॥ बागुल भयानक ॥ भयंकर तीन जयाला नेत्र ॥ संगे भूतें तीं आनिवार ॥ मुलें ग्रासिलीं फार ॥ २ ॥ निर्गुण सगूण तूं झालासी ॥ मम उदरीं आलासी ॥ भक्तकाजी तूं श्रमलासी ॥ सुखें करी शयनासी ॥३॥ निजवी पाजवुनी बाळासी ॥ माता गातगीतासी ॥ विष्णुदास तया पाहोनी ॥ होत आनंदित मनीं ॥ ४ ॥

## ॥ ओव्या ॥

पुढें कांहीं काळेंकरून ॥ रामलक्ष्मणभरतशत्रुघ्न ॥ नानाबाळक्रीडा करून ॥ आनंदविती मातां पित्या ॥ १ ॥ झाले धनुर्विद्येत निपुण ॥ मग केलें मौंजबंधन ॥ मनीं राजा सुखी होउन ॥ धन्य मानी आपणा॥२॥

# गाधिजमखरक्षण आणि ताटकावधाऽऽख्यान.

॥ अभंग ॥

कोणे एके दिनीं विश्वामित्रमुनी ॥ करी यज्ञ वनीं विप्रांसहित ॥१॥ येउनि तों त्या स्थानीं ताटीका राक्षसी ॥ विध्वंसी यागासी भक्षी द्वीजा ॥ २ ॥ श्रीहरीवांचोनी सिद्धी न जाणोनी ॥ विश्वामित्रमुनी अयोध्ये येत ॥ ३ ॥

ओवी.

द्वारीं पाहोनि मुनीस ॥ सेवक कळविती नृपास ॥ आणीत नृप त्या सभेस ॥ पुजोनि पुसे काय आज्ञा ॥ १ ॥

पद राग सोरट ताल धुमाळी.

देयी राया रघुवीरसौमित्रा पुत्रांते मते ॥ ध्रु० ॥ वनीं याग म्या आरंभीला ॥ कळुनि वृत्त हें ताटकेला ॥ येउनि मख हो विध्वंसीला वधिलें विप्रांते ॥ १ ॥ यालागीं दे तव पुत्रांस ॥ यज्ञरक्षण करायास ॥ कार्य जाहल्यावरी पोंचविन क्षेम त्यांते ॥ २ ॥ ऐकतां हें ऋपीवचन ॥ राय दुःखित दे उत्तर न ॥ विष्णुदास ह्मणे काय वदे ऋषीते ॥ ३ ॥

पद राग नीलांबरी ताल धुमाळी.

दशरथ सांगतसे मुनिला ॥ कैचा देऊं राघवाला ॥ ध्रु० ॥ नवसायासें हो मजला ॥ झाले पुत्र लहान त्यांला ॥ ठाउक कोठुनि युद्धकला ॥ येतों मी याग रक्षणाला ॥ चा० ॥ नेइन यज्ञ सिद्धीला ॥१॥

मा. प. देयी राया:—

प्रथम वचन देउनिया मजला ॥ आणिसि कालिमा तूं स्वकुलाला ॥ मोडुनि वचन वदूनि ऐसें निघती मूनी ते ॥ ४ ॥

मा. प. दशरथ सांगत:—

वृत्त कळे हें वसिष्ठाला ॥ येउनि सांगत रायाला ॥ न करा असत्य वचनाला ॥ द्यावें राम सौमित्राला ॥चा०॥ काय हें न उमजे तजला ...

### पद राग झिंझोटी ताल त्रिवट.

मायामोहें दशरथा भुललासी रे ॥ पूर्ण ब्रह्म त्यासी बाळ कां मानीसी रे ॥ ध्रु० ॥ कल्पांतींही न भय दे गाधीजा रे ॥ निमिषमात्रें त्रिभुवन तो निर्मीता रे ॥ १ ॥ ब्रह्मादीक सर्व ह्मणती त्यासी तात रे ॥ अंशभूत तो आला तव उदरीं रे ॥ २ ॥ जर कोपतीती मुनी सत्य राया रे ॥ होय हानि सर्वस्वी न कल्याण रे ॥ ३ ॥ मान्य करुनि गुरुवाक्य दिले प्रभूवरें ॥ विष्णुदास ह्मणे मुनी रामसौमित्रा रे ॥ ४ ॥

### पद राग झिंझोटी ताल दीपचंदी.

दशरथनृप सूत देत गाधितनयाला ॥ आनंदुनि मनिं बहु मुनि घेउनि चालला ॥ ध्रु० ॥ बैसोनीया रथीं मुनी, दाशरथी ॥ वायुवेगें राहिवर निघाला ॥ १ ॥ शस्त्रअस्त्रें सर्व पूर्ण विश्वामित्र ॥ मंत्रसह मग देत तयांला ॥ २ ॥ विष्णुदास ह्मणे निबीड भ्यासुर ॥ काननीं सत्वर रथ पातला ॥ ३ ॥

### पद राग धनासरी ताल धुमाळी.

येतां त्रय ताटिकावनाला ॥ मुनी मनीं बहु भ्याला हो ॥ ध्रु० ॥ वृक्ष सघन बहु दरे भयंकर देत आरोळ्या राक्षस हो ॥ येई तो ताटिका निशाचरि घेउनिया परिवारा हो ॥ सज्ज करोनी चाप उभयतां शरें निशाचरि मारित हो ॥ चा० ॥ परि वारांते तिच्या शरानें धाडित यमसदनातें हो ॥ १ ॥ आनंदुनि मुनि नेत उभयतां आश्रमिं मख रक्षाया हो ॥ यथासांग मख सिद्धिस नेउनि अशिर्वाद त्यां देती हो ॥ संतोषुनि गाधीजमुनि ह्मणे वरिल जनकजा तुजला हो ॥ चा० ॥ तों ये स्वयंवरपत्र मुनींते मिथिलेश्वर जनकाचें हो ॥ २ ॥

---

## अहिल्योद्धार आणि सीतास्वयंवराऽऽख्यान.

### पद राग पिलु ताल धुमाळी.

बोले मुनी राघवाला पहा हें जनकाचें [illegible] ॥ ध्रु० ॥ स्वयंवरासी जानकीचे बोलाविले राजानें ॥ उदयिक जा[illegible] मिथिला नगरा फाराच रे

जलदीनें ॥ १ ॥ भेटवीन मी तुह्मासि तेथें पिता दशरथ वीर ॥ आणिक तुला घालील रामा सिता माळ सुंदर ॥ २ ॥ आनंदे मग करूनि निद्रा येतां रवि उदयासी ॥ आटोपूनी नित्यकर्मे निघती ते मिथिलेसी ॥ ३ ॥

### पद राग पिलू ताल धुमाळी.

घेउनि रामसौमित्राला मुनी चालला स्वयंवराला ॥ ध्रु० ॥ घोर अरण्यीं चंड शिला बहु पडली दृष्टीला ॥ १ ॥ राघवपदरज पडतां तीबरि होय त्वरें अबला ॥ २ ॥ शापमुक्त अहिल्या वंदित मोदें पुण्यशिला ॥ ३ ॥ विष्णुदास ह्मणे पुढें मुनीसह येई मिथिलेला ॥ ४ ॥

### मा. प. बोले मुनी राध:—

कळुनि वृत्त मग हें जनकासी सामोरा तो आला ॥ वंदुनि मुनिपद पुसत तयाते सांगा कोण हे मजला ॥ ४ ॥ दशरथसुत मुनि ह्मणे स्वयंवरा आले हें तव भाग्य ॥ न उपमेला राय त्रिभुवनीं याशीं अन्य योग्य ॥ ५ ॥

### कटाव.

सभा बहू थाटली विस्तीर्ण मंडपापाजी ॥ ध्रु० ॥ बहू देशींचे आले नृपती ॥ ऋषी सर्व ही जमले असती ॥ रामलक्ष्मण मंडपिं येती ॥ राजसेवक चाप आणिती ॥ प्रचंड तें मग सभेंत ठेविति ॥ — सर्वांते जनक विनंती ॥ करी कीं, हें चाप दारुण॥सज्ज करोनी याला गुण ॥ लाविल त्या मम कन्या सुगुण ॥ घालिल माळ त्वरेंकरून ॥ पण ऐसा दुर्घट बहु पाहुन ॥ बसति सर्व नृप अधोवदन ॥ रायें ऐसें विपरित पाहुन ॥ जानकिचा मग हस्त धरोन ॥ चा० ॥ ह्मणे सांगे कोण मजला यांतिल आवडे तुज गाजी ॥ १ ॥

### पद राग पिलु ताल धुमाळी.

सांग सीते यांतिल नृपवर कोण आवडे तुजसी ॥ सुकुमार लाडके बाळे सांग त्वरें तें म[illegible] ॥ ध्रु० ॥ हे पहा देशोदेशिचे राजे तुज वराया आले ॥ रूपगुणें एकापरिस एक सज्ज मंडपीं बसले ॥ पण हराया शक्य न पाहुन खिन्न मनीं हे झाले ॥ लक्ष देउनी अवलोकी या बोले जनक सितेसी ॥ १ ॥ तैसे ऋषी हे महापुण्यासिल पाहे या अं-

गासी ॥ महाप्रतापी तपतेजानें लाजविती सूर्यासी ॥ योगयागादिक बहु साधनी आले तुज वरण्यासी ॥ सोडुनि लज्जा माळा घाली मानवेल जो त्यासी ॥ २ ॥

### पद राग जोगी ताल धुमाळी.

ताता सत्य राघवावीण अन्या मी न वरी ॥ ध्रु० शामसुंदर तनू सगूण स्कंदीं लटके चापतूण ॥ आर्पिला त्या चरणीं म्यां प्राण ॥ अन्य-मला ते तूजपरी ॥ १ ॥ हा हा ! किति हा पण कठीण ॥ जिंकणार या त्रिभुवनीं कोण ॥ त्यजुनी आग्रह मजलागोन॥आर्पा त्यातें सत्वरी॥२॥

### ॥ ओंव्या ॥

सीतास्वयंवरवृत्त कळून ॥ धावत आला दशानन ॥ जनका बोले दटाऊन ॥ मजसी कां न बाहिलें ॥ १ ॥ जनक वदे मी चिंतेंव्याप्त ॥ कांहीं न सुचे भ्रमीतचित्त ॥ तेणें विसर पडोनि खचीत ॥ झाला अपराध क्षमा करी ॥ २ ॥

### मा. प. ताता सत्यः—

पाहुनि असुरा मनिं दचकून ॥ चिंतें व्यापे सीतामन ॥ ह्मणे तात न वाटे पूर्ण ॥ जन्मांतरिचा मम वैरी ॥ ३ ॥

### पद राग कानडा ताल त्रिवट.

हरचाप दावा मजसी ॥ माळ देउनी वदे दशानन सज्जकरा नवरीसी ॥ ध्रु० ॥ दांत खात मग क्रोधें जाउनि उचालित त्या चापासी ॥ ॥ ॥ त्रिभुवन कापे थरथर तेणें भीतिपडे सकळांसी ॥ २ ॥ चंडचाप तीं उरीं पडोनी लोळे तो धरणीसी ॥ ३ ॥ दुःखें व्याकुळ होउनि विनवी काढा कोणी यासी ॥ ४ विष्णुदास ह्मणे श्रीहरिकरणी सकळें हो कोणासी ॥ ५ ॥

### घनाक्षरी.

ऐसें संकट पाहोन ॥ जनक बोले सर्वां नमुन ॥ कोणी चाप हें काढून ॥ दुःखमुक्त या करा ॥ १ ॥ कोणी न उठति सभेंतून ॥ जनक दुःखी हें पाहोन ॥ तंव ते मुनी जनांतून रामसौमित्र ऊठती ॥ २ ॥

॥ आर्या ॥

वंदुनि गुरुचरणासी येउनि मग राम रावणासमिप ॥ काढी पदअं-
गुष्ठें सहज त्वरें तें उरावरिल चाप ॥ १ ॥

गीत.

चाप निघतां भग्न होउन ॥ गेला रावण लंकेलागुन ॥ इकडे व-
र्णित सर्व जन ॥ रामा आनंदे ॥ १ ॥ सीता रामा घाली माळ ॥ देव-
गण आनंदित सकळ ॥ धाडि पत्र मग मिथिलापाळ ॥ दशरथाला-
गी ॥२॥ रामचंद्रें पण जिंकिला ॥ यावें त्वरित तुह्मी लग्नाला ॥ आ-
नंदानें करूं सोहळा ॥ मिथिला नगरींत ॥ ३ ॥

॥ ओव्या ॥

पत्र येतां दशरथ ॥ बहू आनंदें मिथिले येत ॥ जनक त्यांसी सा-
मोरा जात ॥ थाटमाटेंकरूनी ॥ १ ॥ सीमांतपूजन मग करोनी ॥
उतरवी वऱ्हाड सुस्थानीं ॥ तों भरतशत्रुघ्ना देखोनी ॥ पुसत दशरथा
कोण हे ॥ २ ॥ बोले जनका दशरथ ॥ हेही दोघे माझे सूत ॥ ऐकोनि
जनक आनंदीत ॥ वदे काय दशरथा ॥ ३ ॥

पद राग बिहाग ताल त्रिवट.

मान्य करा वचनाते ॥ हस्त जोडुनी तुह्मा मागतों ॥ ध्रु० ॥ मम-
बंधूच्या कन्या तीन ॥ देतों तुमच्या सुतांलागुन ॥ उर्मिळेस वर लक्ष्मं-
ण ॥ मांडवि भरताते सूंगूण ॥ श्रुतकीर्तेस तैसा शत्रुघ्न ॥ चा० ॥
ध्यां पदरीं माते ॥ १ ॥

॥ ओव्या ॥

जनकविनंती परिसोन ॥ दशरथ मान्य करी वचन ॥ बहू थाटमाटें
करून ॥ लग्नें होत चौघांचीं ॥ १ ॥ पुष्पवर्षाव आनंदोनी ॥ करिती
देवकिन्नरमुनी ॥ पुढें जनकाऽऽज्ञा घेऊनी ॥ जाते झाले अयोध्ये ॥ २ ॥

# भार्गवगर्वमोचनाऽऽख्यान.

पद राग कालंगडा ताल धुमाळी.

नारायणनाम स्मरा हो भवसागर पार तरा हो ॥ ध्रु० ॥ निशीदि-

॥ आर्या ॥

वंदुनि गुरुचरणासी येउनि मग राम रावणासमिप ॥ काढी पदअंगुष्ठें सहज त्वरें तें उरावरिल चाप ॥ १ ॥

गीत.

चाप निघतां भग्न होउन ॥ गेला रावण लंकेलागुन ॥ इकडे वर्णित सर्व जन ॥ रामा आनंदें ॥ १ ॥ सीता रामा घाली माळ ॥ देवगण आनंदित सकळ ॥ धाडि पत्र मग मिथिलापाळ ॥ दशरथालागी ॥२॥ रामचंद्रें पण जिंकिला ॥ यावें त्वरित तुह्मी लग्नाला ॥ आनंदानें करूं सोहळा ॥ मिथिला नगरींत ॥ ३ ॥

॥ ओव्या ॥

पत्र येतां दशरथ ॥ बहू आनंदें मिथिले येत ॥ जनक त्यांसी सामोरा जात ॥ थाटमाटेंकरूनी ॥ १ ॥ सीमांतपूजन मग करोनी ॥ उतरवी वऱ्हाड सुस्थानीं ॥ तों भरतशत्रुघ्ना देखोनी ॥ पुसत दशरथा कोण हे ॥ २ ॥ बोले जनका दशरथ ॥ हेही दोघे माझे सूत ॥ ऐकोनि जनक आनंदीत ॥ वदे काय दशरथा ॥ ३ ॥

पद राग बिहाग ताल त्रिवट.

मान्य करा वचनाते ॥ हस्त जोडुनी तुह्मा मागतों ॥ ध्रु० ॥ मम बंधूच्या कन्या तीन ॥ देतों तुमच्या सुतांलागुन ॥ उर्मिळेस वर लक्ष्मण ॥ मांडवि भरताते सूगूण ॥ श्रुतकीर्तीस तैसा शत्रुघ्न ॥ चा० ॥ घ्या पदरीं माते ॥ १ ॥

॥ ओव्या ॥

जनकविनंती परिसोन ॥ दशरथ मान्य करी वचन ॥ बहू थाटमाटें करून ॥ लग्नें होत चौघांचीं ॥ १ ॥ पुष्पवर्षाव आनंदोनी ॥ करिती देवकिन्नरमुनी ॥ पुढें जनकाऽऽज्ञा घेऊनी ॥ जाते झाले अयोध्ये ॥२॥

# भार्गवगर्वमोचनाऽऽख्यान.

पद राग कालंगडा ताल धुमाळी.

नारायणनाम स्मरा हो भवसागर पार तरा हो ॥ ध्रु० ॥ निशीदि-

नीं असनीं शयनीं॥नाम असोंदे हेंची स्मरणीं॥ तोडिल भवपाश झटादिनी॥ कथितों तुह्मासि ऐका हो ॥ १ ॥ ध्रुवप्रऱ्हादा उद्धरीले ॥ कोळि वाल्यास ऋषी ग्यां केलें ॥ असे कैकास मार्ग दाविले ॥ या नारदें ऐका हो ॥ २ ॥ आमुचें गमन त्रयलोकांत ॥ जोडिती ग्याते सर्वहि हस्त॥ चतुरानन तो आमुचा तात ॥ रमाकांता प्रिय जो हो ॥ ३ ॥ थोरामाजी माजउं कली ॥ वाजऊं आनंदानें टाळी ॥ करूं ऐसें वेळोवेळीं ॥ विष्णुदास सांगे हो ॥ ४ ॥

॥ ओवी ॥

नारद येऊनि अवनतळीं ॥ ह्मणे जावें भार्गवाजवळी ॥ दोघांमाजीं माजऊन कली ॥ मजा पाहूं बोलत ॥ १ ॥

॥ आर्या ॥

कलहप्रिय मग नारद लगबगिनें भार्गवाकडे आला ॥ बोले त्यासि रघुविरें केलें तव चाप भग्न ऱ्ही न तुला ॥ १ ॥

**पद राग काफीजिल्हा ताल धुमाळी.**

बोले भार्गव मुनिवर्या संपला अवतारचि आमुचा ॥ ध्रु० ॥ भंगियलें जरि चाप रघुविरें ॥ लाज कशाची मजसी ॥ काज सारुनी ठेवियले ॥ ग्यां होतें जनकापाशीं ॥ १ ॥ जोंवरि होतें हस्तीं माझ्या ॥ मजपुढें समरासी ॥ नाहीं टिकला कोणी जगतीं ॥ काय आतां मज कथिसी ॥ २ ॥

॥ ओवी ॥

नारद परोपरीनें कथून ॥ कोपवी भार्गवालागून ॥ मग तो जाय सज्ज होऊंन ॥ गाठून वदे रामाते ॥ १ ॥

**पद राग खमाजजिल्हा ताल एका.**

उभा रहा ह्मणे रामा भिउनि कां तूं पळसी ॥ स्वयंवरीं हरुनि पण गर्व झाला तुजसी ॥ ध्रु० ॥ वधुनि ताटिका पुरुषार्थ ॥ मानिशी तूं स्वमनांत ॥ अपकीर्ति जगीं निश्चित ॥ केलि तुंवा खाशी ॥ १ ॥

**पद राग काफीजिल्हा ताळ त्रिवट.**

वृद्धा उगा भार्गवा कां जल्पसी ॥ ह्मणे राम तपा जा स्वस्थानासी॥

॥ ध्रु० ॥ ताटीका पीडी नित्य गोद्विजांसी ॥ होमहवनादिक करूं न दे तयांसी ॥ ह्मणुनीच वधिली म्यां असे तिजसी ॥ चाल ॥ सांग काय कारण हें अपकीर्तीसी ॥ १ ॥ स्वजनानिलागी तूंवा वधिलें ॥ सांग कांय सत्कर्म हें असे केलें ॥ ब्राह्मण तूं ह्मणूनिया जाई सोडिलें ॥ ॥ चाल ॥ कशासाठीं युद्ध तूं करिसी मशीं ॥ २ ॥

**मा० प० उभारहा:—**

दोघे युद्ध अनीवार ॥ करितां भार्गव थकुनि फार ॥ होय विस्मित बहुत वीर ॥ पडे धरित्रीसी ॥ २ ॥

**मा० प० वृद्धा उगा भार्गवा:—**

भार्गवासि प्रेमें राम आलिंगीत ॥ चिरंजीव तयालागी जगीं करीत ॥ विष्णुदास ह्मणे राम अयोध्ये येत ॥ चाल ॥ होत आनंद तेणें पुरीं सर्वांसी ॥ ३ ॥

---

# राघववनप्रवेश.

**॥ अभंग ॥**

एकेदिनीं स्वस्वरूप ॥ पाहे आदर्शीं जों भूप ॥ शुभ्र केश हो दाढींत ॥ पाहोनीया काय करित ॥ बोलाऊनी वासिष्ठाते ॥ ह्मणे बसवावा रामाते ॥ राज्यीं, नंतर हो वनाते ॥ जावें वाटे मज तपाते ॥ घेउन रामानूमोदन ॥ गुरू सिद्धता संपूर्ण ॥ करावि, कळोनी हें देव ॥ पडति चिंतेमाजीं सर्व ॥ १ ॥

**पद राग कालंगडा ताल धुमाळी.**

राज्यीं बैसविती रामासी ॥ चिंतित कळुनि देव मानसीं ॥ ध्रु० ॥ ह्मणती राज्यसुखा त्यजोनी ॥ कासया राघव येइल वनीं ॥ सोडविल कोण आह्मा बंदांतूनी ॥ विचार सर्व मनीं करोनी ॥ चाल ॥ कथिती संकट जाउनि ब्रम्ह्यासी ॥१॥ मग तो ठरउनिया वीचार ॥ वनासि आणाया रघुवीर ॥ गृह कलि लाविल्याविणें सत्वर ॥ न हो सफल ह्मणती वीचार ॥ चाल ॥ प्रार्थुन पाठविलं कलिसी ॥ २ ॥ मंथरा-

चित्तीं कलि मग संचरला ॥ बोध करीत ती कैकयिला ॥ राज्यीं बसउं न दे रामाला ॥ मंथरावचन मानउनि तिजला ॥ चाल ॥ पडली रुष्ट होउनि ती धरणीसी ॥ ३ ॥ दशरथ पुसोनि ये जों सर्वांसी ॥ प्रिया कैकयीच्या सदनासी ॥ अस्ताव्यस्त पडलि पाहुन तीसी ॥ दचके राय बहुत मानसीं ॥ चाल ॥ विष्णूदास ह्मणे समजावि तिसी ॥ ४ ॥

## ॥ ओवी ॥

वदे राय कैकयीसी ॥ झालों वृद्ध मी, रामासी ॥ स्थापोनिया राज्य-पदासी ॥ तपार्थ जावें विचार हा ॥ १ ॥

## पद राग पिलु ताल धुमाळी.

ऐकुनि पतिच्या वचनाला ॥ कोप ये बहुत कैकयीला ॥ ध्रु० ॥ करा ह्मणे वचन मम पूर्ण ॥ दिलेलें पूर्वीं जें आपण ॥ चतुर्दश वर्षेपर्यंत ॥ बनाप्रति धाडा रघुनाथ ॥ राज्यीं बसवा मम भरत ॥ पूर्ण न कराल हा हेत ॥ वचनभ्रष्ट व्हाल खचित ॥ वदतां ऐसें विपरीत ॥ चाल दशरथ बहु दुःखित झाला ॥ १ ॥

## पद राग खमाज ताल एका.

ऐक कैकयी राघव वनीं पाठऊं नकोगे ॥ ध्रु० ॥ सुकुमार बाल लहान ॥ वनीं क्षुधा लागल्या तहान ॥ कोण देयील अन्नपान ॥ सांग तरि सखेगे ॥ १ ॥ न साहे सीतउष्ण ॥ कोमलतनु वय लहान ॥ मजसी प्रिय प्राणाहून ॥ आवडता प्रियेगे ॥ २ ॥ पुत्रविरहें जाइल प्राण ॥ आहे शाप मजलागून ॥ काय दुष्ट हेतु धरून ॥ सांगसी अ-सें गे ॥ ३ ॥ ह्मणे राय विष्णुदास ॥ गुंतुनिया वचनास ॥ मुर्छित पडे धरित्रीस ॥ दुःखें ह्रदय भंगे ॥ ४ ॥

## मा० प० ऐकुनि पतिच्याः—

हें श्रुत होउनि रामाला ॥ आला कैकयिसदनाला ॥ पाहुनि मूर्छित ताताला ॥ माते काय ह्मणे याला ॥ झालें सांग त्वरें मजला ॥ मग ती कथीत वृताला ॥ रायें स्वर्गीं त्रय मजला ॥ दिले वर एके सम-याला ॥ चाल ॥ ते म्यां मागितले त्याला ॥ २ ॥ वनाप्रति धाडा रघु-नाथा ॥ चतुर्दश वर्षें हो नाथा ॥ राज्यीं स्थापा मम भरता ॥ ऐसें त्या

बा मी वदतां ॥ शोकें मूर्छित हा झाला ॥ ऐकुनिया त्या वचनाला ॥ पुढिल कार्य तें रामाला ॥ अठवुनि वंदुनि कैकयिला ॥ ये कौसल्यासदनाला ॥ ३ ॥

### पद राग जोगी ताल धुमाळी.

जायी वनासि हो भक्त काजास्तव रघुविर हो ॥ ध्रु० ॥ बोले माते पितावचन मी सत्य कराया जातों ॥ वनीं चतुर्दश वर्षें भरतां तुज भेटाया येतों ॥ १ ॥ पुढिल कार्य जाणसी सर्व तूं माते ज्ञानखाणी ॥ तत्वसार मग राघव सांगे प्रियजननीचे कानीं ॥ २ ॥

### पद राग खमाज ताल एक्का.

कौसल्या [illegible] नको घोर वनीं जाऊं ॥ सुकुमार पाडसा मी तुजलागि को[illegible] ॥ ध्रु० ॥ कैकयीवचन पाळिसी, मोडिसी वचन माझें ॥ वनीं बाळा जासि तरि रे प्राण आह्मी देऊं ॥ १ ॥

### पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

कोमल श्यामा आत्मारामा जाउं नको बा वनासी ॥ ध्रु० ॥ तुजविण जाइल पल युगापरि दुःख हें सांगूं कोणासी ॥ बाळा एकलि सोडुन मजला कैसा वनिं तूं जातोसी ॥ १ ॥ कोणा मग मी बाळा ऐसें बाहूं सांगे रे मजसी॥तुजाविण जग मज सर्व शून्यवत करमेल कैंचे रे मजसी ॥ २ ॥ कैकायिआज्ञा प्रमाण मानुनि माझि अवज्ञा कां करिशी॥ गुप्त रहा या सदनीं कथीन गेला ह्मणुनी वनासी ॥ ३ ॥ पुढिल कार्य विस्तारें रामें कथितां मग कौसल्येसी ॥ स्फुंदत बहु दुःखानें देई आज्ञा वनासि जायासी ॥ ४ ॥ परोपरीनें करुनि शांतवन वंदुनि प्रेमानें तिजसी ॥ विष्णुदास ह्मणे राघव आला सूमित्रेच्या सदनासी ॥ ५ ॥

### मा० प० जायी वनासि हो:—

वंदुनि सूमित्रेस वदे मज आज्ञा वनिं जायासी ॥ द्यावी माते ऐकुनि सति मग काय कथित तयासी ॥ ३ ॥ जाउं नको दुःखित मज टाकुनि गुप्त रहा मम सदनीं ॥ न मानवे तुजलागि तरि हें कथिते बहु विनवोनी ॥ ४ ॥ वनिं तव सेवेलागि लक्ष्मण नेई तव बंधूते ॥ आज्ञा तीची मान्य करोनी भेटे जानकीते ॥ ५ ॥ वदे तीजला पितृवचन पा-

छाया काननिं जातों ॥ काल क्रमी आनंदें सदनीं परत पुन्हां येई तों ॥ ६ ॥

### पद राग सोनी ताल दीपचंदी.

ऐकोनी राघववचन सिता दुःखें बोलत काय तयासी हो ॥ध्रु०॥ तुह्माविणें एथें पल युगापरि जाईल सत्यची मजसी हो ॥ अन्नपान सु- सुखशयन विषवत तुह्माविणें भासे मजसी हो ॥१॥ त्यावें मजसी आ- पुल्यासहीत वनीं सेवा करुनि मी राहीन हो ॥ मजाविणें तुह्मा करमेल कैसें प्रिया तरी सांगा मजसी ही ॥ २ ॥ मीन जळाविण तेज दीपा- विण राहील काय तशी मी हो ॥ विरहदुःखें त्यागीन प्राणासी शपथ तु- ह्माला कथितें हो ॥ ३ ॥ जानकीसी मग बोलत राघव गुर्वाज्ञा मज सांगवी हो ॥ न्यावें तूंसी आपणासह ऐशी, जनापवाद टाळाया हो॥४॥ विष्णूदास ह्मणे गुरुमूखें सिता सांगवीत रामासी हो ॥ मान्य करुनिया तीघे येते झाले मग कैकयीसदनासी हो ॥ ५ ॥

### ॥ गीत ॥

कैकयीस बोलत रघुनाथ ॥ जातों माते आतां वनांत ॥ ठेवी मस्त- किं कृपाहस्त ॥ वत्सावरि आपुल्या ॥ १ ॥ बाळा सर्व मनीं जाणोनी॥ जावें बंधूप्रियेसह वनीं ॥ ह्रदयीं मग तीघांते धरुनी ॥ अशिर्वाद देत ॥ २ ॥ तिघे मग दशरथा वंदित ॥ चरण कधीं हे आपुले तात ॥ पडतिल दृष्टी ऐसें वदत ॥ गहिवरोनि फार ॥ ३ ॥

### ॥ साक्या ॥

गहिवरोनिया बोले दशरथ वत्सा मला त्यजोनी ॥ जातां कैचे प्राण न राहे माझा तुम्हांवांचोनी ॥१ ॥ त्वदीय वचना भक्तसंकटा पार करा- या जातों ॥ आज्ञा द्यावी काज संपतां तुज भेटाया येतों॥२॥बहु कष्टानें दशरथ देयी आज्ञा त्यां मग जाया ॥ निघे वंदुनी रथीं बसोनी बंधूसह आणि जाया ॥ ३ ॥ दुःखदवार्ता कळतांची ही सर्व नगरिजनांते॥ त्यजुनि अयोध्या वेष्टुनि सारे चालति रामरथाते ॥ ४ ॥ परोपरीनें परत जा असें विनवी राम तयांते ॥ न ऐकत ते श्रमित पाहुनी राहे वसतिस तेथें ॥ ५ ॥ निशिमाजी त्या निद्रित पाहुनि उडवी मधुनि रथाते ॥

मार्ग दाउनी अयोध्येकडे ये शरयूतीराते ॥ ६ ॥ बहु दुःखानें दशरथ इकडे शोक करुनि अपार ॥ सोडुनि दुर्घट मृत्युलोक तो जाई स्वर्गी स्वैर ॥ ॥ कैकायि वसिष्ठ धाडुन देती रथासह सूमंताते ॥ अयोध्येप्रति आणावयाते भरतशत्रुघ्नाते ॥ ८ ॥ इकडे रघुविर पाहुनि वदला गूह-क नाविकाला ॥ नौकेमाजीं बसउनि आह्मा न्यावें पैलतिराला ॥ ९ ॥

॥ आर्या ॥

बोले गूहक त्यांते कोण कुठिल सर्व वृत्त तें मजसी ॥ सांगा कोठें जाता अल्पवयीं त्यजुनिया स्वधामासी ॥ १ ॥

पद राग पिलु ताल धुमाळी.

रघुकुळीं परमश्रेष्ठ दशरथवीर॥त्याचा मी कुमर ॥१॥ मजलागी जन ह्मणती बा रघुवीर ॥ ही सीता, सौमित्र ॥२॥ पितृवचनास्तव सोडुनि नगर॥ सेवित कांतार ॥ ३ ॥ तुजसी व्हावया भवाब्धीपार ॥ नको दुजा आधार ॥ ४ ॥ या साठीं करि बा रे हा उपकार॥आम्हा करि पैलपार ॥५॥

पद राग काफीजिल्हा ताल धुमाळी.

काय वदे माता ती म्हातारी गूहकासि हितकारी ॥ ध्रु० ॥ ऐके पुत्रा रामपदाचा महिमा अगाध भारी ॥ ल्या जातां मार्गीं झाली शिलाच स्पर्शें नारी ॥ १ ॥ नौकेमध्यें बसऊं नको रामा तीही होइल नारी ॥ द्वय स्त्रियांचे पोषणदुःख हें कोण तुझें नीवारी ॥ २ ॥ विष्णुदास ह्मणे गुहकें माते परोपरी विस्तारी ॥ कथा सांगुनी धाडुन देयी मातेसी तो सारी ॥ ३ ॥

॥ आर्या ॥

बोले गूहक रामा धुऊनि चरण तव पुजोनि मग पार ॥ नेइन, मान्य करोनी गूहकवच पैल जाय रघुवीर ॥ १ ॥ समजुनि रामाते मग गूहक लोळे पदांबुजांवरती ॥ आलिंगुनि हृदयीं त्या जात पुढें मार्ग क्रमित त्वरित गती ॥ २ ॥

पद राग काफी ताल धुमाळी.

घेउनि सिता सौमित्राते रघुविर आक्रमि वनाते ॥ ध्रु० ॥ चालुनि

चरणीं बहु श्रमले ॥ तीर्थ पुष्करणीवर आले ॥ तिघांनीं स्नान तेथें केलें ॥ एक दिन राहुनिया आले ॥ चा० ॥ भारद्वाज आश्रमाते ॥१॥

॥ कटाव. ॥

भेटुनिया भारद्वाजा मग राघव काय करीत ॥ ध्रु० ॥ पाहुनि रामा ऋषी तोषला ॥ मम भाग्यें हो दर्शन मजला ॥ देउनि आश्रम पावन केला ॥ वेदशास्त्र वंदिती जयाला ॥ सदा मुखें हर जपी जयाला ॥ अनायासें गृहासि आला ॥ आळशावर सिंधूच लोटला ॥ काय वदे मग रघूत्तमाला ॥ वनीं चालतां फारचि श्रमला ॥ रहावें येथें वाटे मजला ॥ पुढिल कार्य सांगोनि ऋषीला ॥ राघव तेथुन पुढें निघाला ॥ चित्रकूटपर्वतीं पातला ॥ एक दिनीं सौमित्र वनाते ॥ जाय उतरुनी नगाखालते ॥ कंदफलें तीं आणावयातें ॥ इकडे राम बसे हवनाते ॥ पर्णकुटीं एकलि सीता ते ॥ सुदर्शनें पाहोनि अवचित ॥ होउनिया कामें बहु व्याप्त ॥ कागरूपें तिजसन्निध जात ॥ जानकिच्या तो स्तनीं मारित ॥ झडपें चंचू तों ती आरडत ॥ धाव प्रिया मज दुष्ट विटंबित ॥ ऐकुनिया स्वप्रिया रुदीत ॥ राम समंत्रक दर्भ प्रेरित ॥ शरापरी तो वेगें बहुत॥गंधर्वाचे पाठिं लागत ॥ पळतां त्रयलोकांतुन श्रमत ॥ ठाव न त्याते कोठें मिळत ॥ मग रघुविरा शरण येत॥राघव त्यावरि कृपा करीत ॥ त्रासनार्थ एक अक्ष फोडित ॥ चा० ॥ गंधर्वाते उद्धरिला तों पुढें काय वर्तत ॥ १ ॥

---

## भरतभाव.

### पद राग परज ताल त्रिवट.

पातला घेऊनी रथ सुमंत ॥ ध्रु० ॥ भरतशत्रुघ्ना न्यावयाते मातुलगृहिं त्वरीत ॥ १ ॥ पुसत भरत त्या राम सुखी कीं कांहिं न उत्तर देत ॥ २ ॥ बैसुनिया रथिं येत अयोध्ये पाहे बहु विपरीत ॥ ३ ॥ निर्जन देखुनि पूर वसिष्ठा काय पुसे वृत्तांत ॥ ४ ॥ मुनि कैकयी मग सांगत राघव धाडियेला वनांत ॥ ५ ॥ निष्कंटक राहूनि अयोध्ये राज्य करी निश्चीत ॥ ६ ॥ तात तुझा परलोकीं गेला दुःख करुनि अपरमीत ॥७॥

### पद राग मल्हार ताल त्रिवट.

ऐकोनीया भरत ऐसें विपरीत ॥ ध्रु० ॥ ह्मणे खास वैरीणी माते माझी निश्चीत ॥ १ ॥ धनतृष्णा धरूनी केलासी पितृघात ॥२॥ जाये सह रघुनाथ धाडीला त्वां वनांत ॥ ३ ॥ मनुष्यासी योग्य न करणी ही गे विपरीत ॥ ४ ॥ धिःकारूनी मातेसि निघे वनीं त्वरित ॥ ५ ॥

### मा० प० पातला घेउनीः—

निघत वनीं दळसह आणाया अयोध्ये रघुनाथ ॥ ८ ॥ विष्णुदास ह्मणे शर्युतिरातें आत्पांसह तो येत ॥ ९ ॥

### पद राग सारंग ताल त्रिवट.

बोले भरत गूहकालागोन ॥ ध्रु०॥ सैन्यसहित बंधू आणि माते शरयुपैल नेयी त्वरें उतरून ॥ १ ॥ काज निकडिचें ह्मणोनि सूज्ञा उशिर न लावी आज्ञा क्षण ॥ २ ॥

### पद राग जोगी ताल धुमाळी.

माझा राम बंधू पहातां एकला पाहुनि वनीं ॥ ध्रु० ॥ बोले गूहक भरता जाणी ॥ रामाकिंकर हा असोनी ॥ पहातों कैसें शरयुतरोनी ॥ जातां था समरा मजशीं ॥१॥ सज्ज करोनिया चापाते ॥ सोडित बाण भरता वरते ॥ तंव तो काय वदे तयाते ॥ दुःखित भरत मानसीं ॥ २ ॥

### मा० प० बोले भरत गुहकाः—

रामविरह मजसी न साहे तव बाणें हा प्राण जातां त्यातें भेटेन ॥ ३ ॥

### मा० प० माझा राम बधूंः—

अंतर जाणुनिया भरताचे ॥ गूहक, बंधू तुह्मि रामाचे ॥ ह्मणे वैरि न प्रियकर त्याचे ॥ जावें भेटीलागोनी ॥ ३ ॥ विष्णुदास ह्मणे मग तयाते ॥ पोहोंचऊनी पैल थडीते ॥ प्रेमें भेटुनिया तयाते ॥ येता झाला स्वगृहा ॥ ४ ॥

### पद राग पिलु ताल एका.

भरतबंधु सैन्यसहित येत पाहुनी ॥ ह्मणे येत सौमित्र दुष्ट हेतु धरोनी ॥ ध्रु० ॥ खचित नीच कैकयीचें वचन ऐकुनी ॥ आम्हा बधूं कपटें येत सज्ज होउनी ॥ बाणवृष्टि अमुप करी वेगें करोनी ॥ चा०॥

शत्रुघ्न आणि लक्ष्मण झगडती वनीं ॥ १ ॥ उभयशर सुटतां निघे राम ही ध्वनी ॥ऐकुनिया राघव साशंक बहु मनीं ॥ येउनिया लक्ष्मणाते मग नीवारुनी ॥ चा० ॥ ह्मणे देइ सोडुनि ही दुष्ट करणी ॥ २ ॥ निवारोनि शत्रुघ्नासि भेटे राघवासी ॥ कैकयिनें दुष्ट वचनें ताडिलें तुजसी ॥ उपेक्षूनि आह्मां सर्वां पातला वनासी ॥ चा० ॥ ह्मणे चला अयोध्येसि हो कृपा करोनी ॥ ३ ॥

**पद राग पिलु ताल धुमाळी.**

बहु प्रेमानें भरताते ॥ आलिंगुनि शत्रुघ्नाते ॥ पुढिल कार्य ॥ सांगोनी तयाते जाय म्हणे परत ॥ १ ॥

**मा० प० भरतबंधु सैन्यः—**

ह्मणे भरत परत न मी जाय अयोध्येसी ॥ राहिन सर्व संग त्यजुनि नंदिग्रामवासीं ॥ चतुर्दश वर्षें वाट पाहुनी प्राणासी ॥ चा० ॥ न होतां भेट रामा जाय मी त्यजोनी ॥ ४ ॥

**मा० प० बहु प्रेमानें:—**

मान्य करुनि राघवचन ॥ नंतर भरत शत्रुघ्न ॥ राम पादुका त्याते देउन करीत उपदेशा ॥ २ ॥ राज्य चालवी न्यायानें दुष्टा देयी शासनें ॥ सुष्टांचा प्रतिपाल करी बा मी येई तव जा ॥ ३ ॥

**मा० प० भरतबंधु सैन्यः—**

भरत वंदि वारंवार राघवपदांसी ॥ मग आज्ञा घेउनि येत नंदिग्रामवासीं ॥ सर्वसंगपरित्याग करुनि करि तपासी ॥ चा० ॥ इकडे रिपुघ्न राज्यकरी अयोध्यापट्टणीं ॥ ५ ॥

---

## शूर्पणखाविटंबना आणि खरदूषणवधाऽऽख्यान.

**॥ दिंड्या ॥**

कष्ट भक्तास्तव सहन करी फार ॥ वरुषें चवदा तो वनीं ज्या वूवार ॥ १ ॥
गिरीत्रिकुटा सोडून पुढें चाले ॥ अत्रिऋषिनें रामास पूजियेलें ॥ २ ॥

दत्तराया राघवें नमीयेलें ॥ अनूसूयें सीतेस गौरवीलें ॥ ३ ॥ तीन रात्री वास्तव्य तिथें केलें ॥ अत्रिऋषि तों राघवा काय बोले ॥ ४ ॥ असे वन हें राक्षसीं व्यापियेलें ॥ बंधुसीतेसह जपुनि पुढें चाले ॥ ५ ॥ ऐकुनीया बोल हे निघे राम ॥ श्रमुनि वृक्षछायेस घे आराम ॥ ६ ॥ जनकदुहिते तुज कष्ट फार झाले ॥ जानकीते रघुराज असें बोले ॥ ७ ॥ मागुनीया इतुक्यांत विरोचन ॥ असुर उचली सीतेस करिं धरून ॥ ८ ॥ आहा ! नाथा मजासि हा असुर नेतो ॥ सोडवा ना तरि प्राण सत्य जातो ॥९॥ ऐकुनीया स्वप्रियारुदनाला॥बाण मारुनि पाडीत राक्षसाला ॥१०॥ विरोचन तों रामास शरण आला ॥ आत्मवृत्ताते कथित मग तयाला॥११॥ उद्धरीला ऐकुनी वृत्त असुर ॥ पुढें पंचवटीं येत रघुवीर ॥ १२ ॥

**पद राग कालंगडा ताल त्रिवट.**

सीतासौमित्रासह ये राघव पंचवटीला ॥ ध्रु० ॥ विरोचनाचेनी बोलें शरभंग आश्रमिं आले ॥ शरभंगें पूजीयेलें राघवपदांला ॥१॥

**॥ अभंग ॥**

हाले पाहे कंथा ॥ पुसे लक्ष्मण ॥ करी त्या कथन ॥ ऋषी श्रेष्ट ॥ १ ॥ कुष्टें व्यापीलोंसे ॥ रामा मी बहूत॥ह्मणोनी लाजत ॥ सर्व जनीं ॥ २ ॥ लाजोनी शरीर ॥ ठेवीलें झाकोनी ॥ दुजें तें धरुनी ॥ आलों रूप ॥ ३ ॥ ऐकोनीया त्याची ॥ कुष्टकाया जाळी ॥ राम तो त्या काळीं ॥ सोडवी त्या ॥ ४ ॥ ऋषी बोले रामा ॥ सीतोदकस्नान ॥ शरीरालागुन ॥ कष्ट देत ॥ ५ ॥ उष्णोदक आम्हा ॥ मिळेल कोठून॥ करूनी उत्पन्न ॥ देयीन मी ॥ ६ ॥ स्मरण न होतां ॥ गौतमीतटासी ॥ आठवे रामासी ऋषीवाक्य ॥ ७ ॥ अग्नीमूलबाण ॥ रामानें सोडून ॥ उन्हाळी उत्पन्न ॥ केली तेथें ॥ ८ ॥

**पद राग कालंगडा ताल धुमाळी.**

पथिं बहु ऋषिते उद्धरीत राम पुढें चाले ॥ ध्रु० ॥ भेटले येऊन मंदकीर्णास ॥ वार्णी तो अगस्ति पराक्रमास ॥ आतापीवातापिकथानक त्यास [illegible] ॥ १ ॥ ध्यावया अगस्तिचें दर्शन॥उतावळा झाला रघुनंदन ॥ कदळीवनाप्रती येऊन तया भेटले ॥ २ ॥ काहीं काळ राम

राहिला तेथें ॥ ऋषी दे दिव्य बाण तयाते ॥ समरीं रामा सत्य रावणाने मृत्यु येणें बोले ॥ ३ ॥ अक्षयी भाता आणि चापाते ॥ अगस्ति देत रघूत्तमाते ॥ लोपामुद्रे माळ सितेते देउनि गौरविलें ॥४॥

॥ आर्या ॥

पार्थी मग राम सौमित्रा वृक्षावरि म्हणत कोण हा दिसतो ॥ राक्षस वाटे मजला बा रे सत्वर वधूनि टाकी तो ॥ ४ ॥

श्लोक इंद्रवज्रा.

बोले जटायू मग राघवाला ॥ कां बाण आह्मावरि योजियेला ॥ झाली कशी बुद्धि तुह्मासि बोला ॥ ऐशा वयीं कोण कुठोनि आला ॥ १

पद राग पिलु ताल धुमाळी.

रघुकुळीं परम श्रेष्ठ दशरथवीर ॥ त्यांचे आह्मि कुमर ॥ १ ॥मजलागी जन ह्मणती रघुवीर ॥ हीं सीतासौमित्र ॥ २ ॥ पितृवचनास्तव सोडुनि नगर ॥ सेवित कांतार ॥ ३

श्लोक शार्दूलविक्रीडित.

बाळां मी सुरसूतसूत वदती माते जटायू असें ॥ तूझ्या बा सुरदैत्ययुद्ध समयीं ताता सहाया असे ॥ तेव्हां पासुनि मानिता मजसि तो बंधूपरी राहला ॥ संपाती मम बंधु सागरतिरीं भेटीस बाहे तुला ॥ १ ॥

मा० प० सीतासौत्रासह ये राघवः—

राम बोले जटायूस स्थल उत्तम रहायास ॥ कृपाकरोनी सांगावें हो श्रेष्ठ आम्हाला ॥ २ ॥

श्लोक इंद्रवज्रा.

बोले जटायू मग राघवाला ॥ ऐका तुम्हा सुस्थळ राहण्याला ॥ गोदातिरीं पंचवटी अरण्यीं ॥ आहे मुला जाय तिथें जपूनी ॥ १ ॥

पद राग पिलु ताल धुमाळी.

भक्तसंकटालागी झाला सगूण रघुवीर ॥ लीला वर्णितां ज्याची थकले फणिवर विधी हर ॥ ध्रु० ॥ नमुनि जटायूस त्याच्या कथनें पंच-

वटीं आले ॥ सौमित्रें बांधून पर्णकुटि रहाया स्थळ केलें ॥ मग येउनि रामाजवळ मुनि अनेक राहीले ॥ तेणें सांग यज्ञयागादी होऊं लागले ॥ मग वनचर भिल्लिणी पहाया इच्छिाति रघुवीर ॥ १ ॥

**पद राग सिंधकाफी ताल धुमाळी.**

अरण्यांत एकीमेकीस मग काय बोलत त्या भिल्लिणी ॥ रघुविर पाहुं चला नयनीं ॥ ध्रु० ॥ ज्याच्या चरणरजाच्या महिमें शिळा झाली सुंदरी ॥ तोचि पातला वनाभीतरी ॥ फलें भेट आर्पूनी ठेऊं मस्तक चरणावरी ॥ आज्ञा जो भवाब्धिपार करी ॥ प्रेमें आर्पीयाते रामा आणिति फळें वेंचुनी ॥ १ ॥

**रामभजन पद राग कालंगडा ताल धुमाळी.**

रामदर्शना चला गे ॥ तो पंचवटीं पातला ॥ १ ॥ भेट देउनी चरणाचें ॥ दर्शन घेऊं आल्हि साचें ॥ २ ॥ नाम स्मरा रघुरायाचें ॥ न मग भय कळिकाळाचें ॥ ३ ॥

**मा. प. अरण्यांत एकिमेकीस:—**

नाचत नाचत गात आनंदें पक्क फळें वेचिती ॥ चाखुनि उत्तम त्या ठेविती ॥ फळें आर्पूनी रामा सद्गद चरणाते वंदिती ॥ आनंदें राघव त्या उद्धरिती ॥ आज्ञा घेउनि जात्या झाल्या स्वगृहा भिल्लिणी ॥ २ ॥

**॥ कटाव ॥**

एके दिनीं पुढें अरण्यीं बहू बिमरित हो वर्तलें ॥ ध्रु० ॥ शबरी शूर्पनखेचा सूत ॥ गुप्त वनीं बैसुन जाळींत ॥ कालखड्ग त्या व्हावें प्राप्त ॥ ह्मणुनि घोर तपाते अचरित ॥ शंकर त्याते प्रसन्न होत ॥ कालखड्ग स्वर्गाहुनि धाडित ॥ तों इकडे सौमित्र वनांत ॥ फलें त्याच न्यावया येत ॥ तों वरुनि तें अस्त्र उतरत ॥ सौमित्राच्या हस्तीं जात ॥ धारपरिक्षेस्तव तो मारित ॥ वंशजाळीवरी अवचित ॥ तों हो जाळी शबरीसहित ॥ दुखंड पाहोनिया घाबरत ॥ ह्मणे झाला मोठा घात ॥ वधिला म्या हो मुनी खचीत ॥ चा० ॥ घाबरोनि येउनि रामा वृत्त तें सर्व कथियेलें ॥ १ ॥

॥ आर्या ॥

राम ह्मणे शूर्पनखासुत शबरी हा मुनी न सौमित्र ॥ खड्गासाठीं शंभूप्राति प्रार्थी दंडनासि जो पात्र ॥ १ ॥ त्याच्या हातिं न जातां आलें तें काल खड्ग तव हातां ॥ करणें युद्ध पुढें बहु राक्षसवन पार हें आह्मां जातां ॥ २ ॥

पद राग काफी ताल धुमाळी.

दुष्ट स्वप्नें शूर्पनखा दचकुनि जागी ती झाली ॥ ध्रु० ॥ वदे सख्यांसी शबरी माझा पंचवटीला गेला ॥ दुष्टस्वप्न मज सूचवितें हो घातचि त्याचा झाला ॥ १ ॥ सख्यांसहित ती धावत धावत येत तयास्थळासी ॥ दुखंडजाळीमाजी पाही मृत पुत्र शबरीसी ॥ २ ॥ पुत्र शवातें कवळुनि करि ती शोकातें अपार ॥ बोले घेउं गे सूड तयाचा ज्याणें वधिला कुमर ॥ ३ ॥ लक्ष्मणाते देखुनि नयनीं नाटोपे हा समरीं ॥ विष्णुदास ह्मणे जाणुनि झाल्या मायेनें त्या कुमरी ॥ ४ ॥

॥ ओवी ॥

रूप घेऊनि सकुमार ॥ जाय लक्ष्मणासमोर ॥ सेवें जिच्या दासी सादर ॥ काय बोले सौमित्रा ॥ १ ॥

पद राग झिंझोटी ताल धुमाळी.

मज वरा हो त्वरितचि सौमित्रा हो ॥ कुमरी हातिं धरा हो ॥ गंधर्वविवाह करा हो ॥ मानस पूर्ण करा हो ॥ चाल ॥ मान्य करुनि ह्या मम वचनाते त्वरितचि मुहुर्त धरा हो ॥ १ ॥

पद राग पिलु ताल दीपचंदी.

रामाज्ञेविण जाण कुमारी नवरी तुजलागोन ॥ ध्रु० ॥ सीतेसहित आहे पैल ममाग्रज खूण तयाचि जा आण ॥ १ ॥

मा० प० मज वरा हो:—

पुसुनि ह्मणे मी येतें ॥ वंदि येऊनि सीतेते ॥ जाउ करा ह्मणे माते ॥ खूण देववा मज हातें ॥ चाल ॥ भावोजीला कळउनि मजला करवा लक्ष्मणा हो ॥ १ ॥

॥ ओवी ॥

सीता बोले रामाळागून ॥ नोवरी ही भावोजीस सुगूण ॥ आहे उत्तम इजलागोन ॥ खूण द्या त्या वरावया ॥ १ ॥

मा० प० भक्तसंकटालागी झाला:—

मायेची स्त्री ते समजुनिया रघूरायाते ॥ काय बोलला मग तो कपटी त्या नक्तंचरिते ॥ दुजी खूण न आम्हाजवळ गे तुजसि द्यावयाते ॥ तव पृष्ठीं लिहितों सौमित्रा तुजसि वरायाते ॥ चाल ॥ लज्जा त्यजुनी लिहून घेउन जायी पाठिवर ॥ २ ॥

मा० प० मज वरा हो:—

ह्मणे खूण भावोजींनीं ॥ पृष्ठीं मम लिहूनी ॥ दिली पहा वाचोनी ॥ सत्य प्रिया हे मानी ॥ चाल ॥ जन्मांतर दासी मी तुमची पदरिं आतां तरि घ्या हो ॥ ३ ॥

मा० प० रामाज्ञेविण:—

लिखित पाठिवर रामाज्ञा कीं कापी नासीकथान ॥ १ ॥ न वधितां नाकथान कापोनी सोडी स्त्री तीज ह्मणोन ॥ २ ॥

॥ ओव्या ॥

ऐशी विटंबना होऊन ॥ दुःखें रडत ती ये पळून ॥ खरदूषणादिकां भेटून ॥ दुःख कथीत आपुलें ॥ १ ॥ पंचवटीं कोणी आले ॥ मानव, मम सुता मारिलें ॥ मजलागी विटंबिलें ॥ स्तननासिक कापोनी ॥ २ ॥ ऐसें ऐकतां तिचें वचन ॥ सैनेसह ते खरदूषण ॥ येऊनि अती क्रोधाऊन ॥ युद्ध करिती रामाशीं ॥ ३ ॥

मा० प० भक्तसंकटालागी झाला:—

ठाण मांडुनी समर करी रघुवीर राक्षसांशीं ॥ एक्या बाणें वधिलें दूषण खर आणि त्रिशिरासी ॥ शूर्पनखा तों पळून तेथुनि आली लंकेसी ॥ वृत्त कथोनी कोपवीत ती आपुल्या बंधूसी ॥ चाल ॥ रावण बहु चिंतीत मानसीं योजित सुविचार ॥ ३ ॥

# सीताहरण, जटायूवध आणि राम-विरहाऽऽख्यान.

### पद राग पिलु ताल धुमाळी.

आपणासह कुलनाशक बुद्धी होउनि रावणाते ॥ सिताहरण मृत्यूप्रद ोजी या अघटित कर्माते ॥ ध्रु० ॥ मरीचीप्रति बाहुनि बोले मामा के वचन ॥ असुर बधित पंचवटीमाजीं आला रघुनंदन ॥ विटंबिली ार्पनखासुत मारून वानें तिजलागून ॥ आणिक दळासह तैसे वधिले त्रिशिराखरदूषण ॥ चाल ॥ त्रासउं मामा कपटयुक्ति योजून त्वरिताचि ाते ॥ १ ॥ तूं जायी मामा त्या वनांत सुवर्णमृग होऊन ॥ तूज व- ाया दूर वनाते येइल रघुनंदन ॥ मागें अतिथीवेशें सीता नेतों मी ोरून ॥ परोपरीनें बोध मरीची करित तयालागून ॥ चाल ॥ परि ा ऐकतां दुष्ट न सोडी आपुल्या दुराग्रहाते ॥ २ ॥ मग दोघे ते ाले वनिं त्या कपटवेश घेऊन ॥ स्वच्छंदें बागडे मरीची सुवर्णमृग होऊन ॥ रावण अतिथीवेशें बैसे दुष्टभावें करून ॥ वृक्षाआड पर्णकुटी-सन्निध गुप्तवेश धरून ॥ चाल ॥ सुवर्णमृग पाहोनि जानकी बोलत रघूत्तमाते ॥ ३ ॥

### पद राग झिंजोटी ताल धुमाळी.

होणारापरि बुद्धि पहा कशी झाली जानकीला ॥ सुवर्णमृगचर्माची कंचुकी मागे राघवाला ॥ ध्रु० ॥ ह्मणे प्राणनाथ मम हेतु करा पूर्ण ॥ मृगत्वचेचि द्या द्या मज कुंचकी करून ॥ पुढें अयोध्यें जातां अवडीनें घालिन ॥ चाल ॥ परोपरीनें विनवुनि मृग वधुं धाडित राघवाला ॥१॥

### पद राग पिलु ताल धुमाळी.

पुरवाया स्वप्रियाहेतूते मृगये रघूवीर ॥ निघतां बोले बंधु सौमित्रा सावध अस फार ॥ ध्रु० ॥ निशाचरस्थान हें भयानक रक्षी सीतेस ॥ चाप सज्ज करुनी मग लागे मृगापाठीस ॥ वनें उपवनें श्रमुनि राघवें वधिलें मृगास ॥ मृग नव्हे तो कपटी राक्षस कळलें मग त्यास ॥चाल॥ श्रमुनि वृक्षछायेस बैसले नंतर रघुवीर ॥ १ ॥

**मा० प० आपणासह कुल:--**

इकडे वनिं रामापरि मरिची कपटी स्वर काढून ह्मणे सौमित्रा धाव निशाचर वधितो मजलागून ॥ न येशी तरि पुन्हा राम हा तुजलागी भेटे न ॥ वारंवार करुणास्वरें आरडे बहु विव्हळ होऊन ॥ चाल ॥ घात्ररवी तो ऐशा यत्नें रावण सितामनातें ॥ ४ ॥

**मा० प० होणारापरि बुद्धि:--**

त्वरित जा ह्मणे सिता सौमित्राते ॥ अनिवार्य संकटीं असती प्रियकर ते ॥ न लावि उशिर बहाती जा सहायाते ॥ चाल ॥ कैची बंधू ममता अगदीं नाहीं हो तुह्माला ॥ २ ॥

**पद राग पिलु ताल दीपचंदी.**

राक्षसमाया ही जाण सीते तूं हें न मानी किमपि प्रमाण ॥ ध्रु० ॥ रघुवीर कळिकाळासि दंडीता त्या ॥ राक्षस तृणासमान ॥ १ ॥

**मा० प० होणारापरि बुद्धि:--**

तुमचे मनीं अहा! भावोजी वाटतें ॥ कीं व्हावें विपरित माझ्या प्राणप्रियाते ॥ मम अभिलाष इच्छा आहे आपुल्या मनिं ते ॥ चाल ॥ वनीं बधूं प्रियकरा कैकायिनें धाडिलें कां तुह्माला ॥ ३ ॥

**मा० प० राक्षसमाया ही:--**

व्यर्थ दुरुक्तें ताडिलेंसी मसी ॥ असुनी तूं मातेसमान ॥ २ ॥ षण्मास पडसी बंदीं, फळ तव कृतिचें हें तुजलागून ॥ ३ ॥ बोले रेषा गुंफाद्वारीं काढोनीया ॥ शपथ तिज घालून ॥ ४ ॥ या रेषेबाहेर येतां अनीवार्य पडसि अनर्थी जाऊन ५ ॥ मी जाऊनी आतां भेटुन रामा कथुनी हें देईन प्राण ॥ ६ ॥ विष्णुदास ह्मणे दुःखें सौमित्र तो भेठी जा रघुनंदन ॥ ७ ॥

**पद राग काफी ताल दीपचंदी.**

जात शोधित रघुनाथा लक्ष्मण ॥ चिंतें व्यास मनीं दुःखित होउन ॥ ध्रु० ॥ उमटल्या पदमुद्रा रामाच्या त्या मार्गे शोधीत करितसे गमन ॥ १ ॥

### पद राग कालंगडा ताल धुमाळी.

मी आज यती तापसी आश्रमिं तूझ्या आलों गे ॥ भिक्षा घाली सी-तेप्रति रावण बोले हो ॥ ध्रु० ॥ अवदशे गाठिलें त्यासी पडली झोळी हातीं हो ॥ कुबुद्धीनें पाहे होऊं संपत्ति माती हो ॥ सीता येडानें जों गुफेद्वारीं पहाती हो ॥ तों हा यती तिष्ठत झोळी घेउन हातीं हो ॥ ह्मणे घाली भिक्षा क्षुधेनें मी व्याकूळ हो ॥ सिद्ध असे जें तव गृहिं घाली तें मजसी हो ॥ चाल ॥ क्षुधितापरि ढोंगें करि कासाविस प्राण हो ॥ १ ॥

### पद राग सोरट ताल धुमाळी.

फार सुदिन आजि दैवें यतिदर्शन मजला झालें ॥ परम धरुनि वि-नयातें जानकी यतीस काय बोले ॥ ध्रु० ॥ प्राणनाथ आज माझे मृग-मिस वनाप्रति गेले ॥ ते परत येत तों बैसा गृह आहे हें आपुलें ॥ वरें असन त्यासि बैसाया गुफेअंतरिं टाकिलें ॥ चाल ॥ या बसा आ-पण यतिवर्या जोडोनि हस्त त्या बोले ॥ १ ॥

### मा० प० मी आज यती तापसीः—

यक्षिणि कीं राक्षसी सांग मजसी असशी तूं कोण ॥ नेऊनि अंतरीं गेळूं पहासी मजलागून ॥ भिक्षा घालि मज गुंफेबाहेर येऊन ॥ नातरि शाप देऊनी करिन भस्म तुजलागोन ॥ कासावीस करोनी प्राण पडे मग मूर्छा येऊन ॥ तों ये फळें जानकी घेउन त्वरें घाबरून ॥ चाल ॥ भिउं नका ह्मणुनिया सांगे सीता स्ववृत्तातें हो ॥ २ ॥

### मा० प० फार सुदिन आजिः—

रघुकुळीं परम जे श्रेष्ठ दशरथ ते माझे श्वशुर ॥ सुत त्यांचे प्राण-पति माझे प्रियकर हो जे रघुवीर ॥ पुरवाया भक्तकाजातें वनिं आलों तेथे साचार ॥ चाल ॥ परिवारसह दशकंदन हनना आलों असें बोले ॥ २ ॥

### मा० प० मी आज यती तापसीः—

ऐकोनी ऐसें वचन सितेचें घाबरोनी हो ॥ थरथर कांपे भयें रावण मनिं बहु चरके हो ॥ सीतेनें भिक्षा घालुं करितां हस्त रेषेबाहेर हो ॥ उ-

चलोनी घातक घे तिजला स्कंदीं हो ॥ ओरडतां द्विज सैन्यचे लेणें त्यां दटाऊनी हो ॥ सीतेलागी घालून रथीं निघे लंके हो ॥ चाल ॥ बहु क्रोधें मग सति बोले काय रावणासी हो ॥ ३ ॥

**पद राग कालंगडा ताल धुमाळी.**

क्रोधें सीता बोले रावणा दुष्टा मम वचना मानी ॥ न करि घात मज नेउनी ॥ ध्रु० ॥ निरापराधी छळिलें लक्ष्मणा भलभलतें त्यां बोलोनी ॥ शाप दिला मग मज त्यांनीं ॥ आज्ञा उल्लंघन त्यांचि मीं करितां पडलें अनर्थीं येऊनी ॥ रावण नेत हा चोरोनी ॥ पशुपक्षांनो कळवा हें कोणि राघवाप्रती जावोनी ॥ रावणें नेली तव पत्नी ॥ चा० ॥ रुदन सितेचें ऐकतांचि ये त्वरित जटायू धावोनी ॥ १ ॥

**पद राग गुणकली ताल त्रिवट.**

स्थीर स्थीर हे दुष्टा दशवदना ॥ ध्रु० ॥ नेशि कोठें चोरुनिया रघूवीरललना ॥ नसतां राघव मागें हे चोरा रे ॥ यमसदनाप्रति जाऊं इच्छिसि कां रे ॥ स्वकुलसंपत्ती करिसी कां माती रे ॥चा०॥ राहि-उभा समरासि त्वरित रे मतिहीना ॥ १ ॥

**पद राग सोनी ताल धुमाळी.**

कोण सांग पक्षा तूं उगाच अडविसि मज कां रे ॥ नेणुनि विक्रम-समरा येतां मुकसिल प्राणा रे ॥ ध्रु० ॥ इंद्रादिक देव त्यां जिंकिले तुझी कथा काय ॥ प्राणदान देतों सुखें तुज वनाप्रती जाय ॥ कोपुनि पक्षी हाणितां चंचू रावण करि घाय ॥ युद्ध भयानक देखुनि सीता ह्मणे हाय हाय ॥ रावणरथअश्व ते खगेंद्रें घायें अनिवार्य ॥ करितां चूर रावण जटायुस वदतसे काय ॥ चा० ॥ शपथ तुला रामाचि सांग तव मृत्यु कशानें रे ॥ १ ॥

**मा. प. स्थीर स्थीर हे दुष्टा.**

पावेन मृत्यु उपाडितां ह्या पक्षातें ॥ सांगे आतां तव मर्मस्थानातें ॥ सत्य शीवभक्ता तूं शपथ तूंते ॥ युद्ध करूं निकरानें मदे त्यातें ॥ चा० ॥ बोल त्वरें न लावि उशिर बा मूढा मालिना ॥ २ ॥

**मा. प. कोण सांग पक्ष्या तूं उगाच:—**

माझे पदअंगुष्ट फोडितां पावेन मरणातें ॥ ऐकुनि झडपे अरुणपुत्र अं-

ष्ठ फोडण्याते ॥ तों उपडोनी पक्ष केला लोल खगेंद्राते ॥ पडे जटायु
र्छित होउनिया धरणीवरते ॥ नंतर सीते घेउन जायी असुर उर्ध्वपं-
॥ देखे मार्गीं ऋष्यमुकिं सीता पंच वानरांते ॥ चा० ॥ काढुनिया
ाकडे स्व टाकी अलंकार सारे ॥ २ ॥

॥ ओवी ॥

पडतां वरोनी अलंकार ॥ वरी पाहे वायूकुमर ॥ तों असुर एक
ी सुंदर ॥ घेऊनि चाले ऊर्ध्वपंथें ॥ १ ॥ कोण्या सभाग्याची प-
ी ॥ निशाचर नेत चोरोनी ॥ वायुकुमरें हें जाणोनी ॥ धरूं राक्षसा
डाला ॥ २ ॥ मग आकाशीं उडी मारितां ॥ गेला गगनीं असुरा-
रता ॥ तों रावण घेउनिया सीता ॥ लंकेमाजी पातला ॥ ३ ॥

घनाक्षरी.

परोपरी दशानन ॥ वदे जनकजे बिनवून ॥ होयी वश मजला-
न॥ परि न वचन मानि तीं ॥ १ ॥ मग पांच राक्षशीणी ॥ सांगे त्या-
बोलाऊनि ॥ सीतेलागी भिववोनि ॥ मज शयनिं वश करा ॥ २ ॥
सुरि दावित बहु भय ॥ परी स्तब्ध ती निर्भय ॥ अशोकवनीं जग-
ाय ॥ राहे असुरिं रक्षित ॥ ३ ॥

पद राग झिंझोटी ताल दीपचंदी.

भय न धरी गे मानसीं अश्वासी त्रिजटा सीतेसी॥ध्रु०॥पंचवटीमाजी
म सुखि गे अविंध्ये कथिलें मजसी ॥ १ ॥ बंदमुक्त तुज त्वरित क-
या येत आहे लंकेसी ॥ २ ॥ परस्त्रीवरि बलात्कारें मरशि असा शाप
सें रावणासी ॥ ३ विष्णुदास ह्मणे बहुतची प्रेमें त्रिजटा शांतवीत
जसी ॥ ४ ॥

मा. प. जाव शोधित रघुनाथः—

ाळ्ठीं तों रघुवीरा पाहूनी ॥ गहिंवरूनी जाय भेटाया धाउन ॥ २ ॥
सें रुदत चरणावरि लोळे ॥ रघुविर हृदयीं धरीत त्यालागून ॥ ३ ॥
ष्णुदास ह्मणे तोषवी राघव ॥ प्रेमभरें बंधुलागी कुरवाळून ॥ ४ ॥

पद राग आनंदभैरवी ताल एका.

कोणिं गांजिलें प्रिया सांग आजि तुला ॥ नेत्र पुसुनि पुसत राम

लक्ष्मणाला ॥ ध्रु० ॥ त्यजुनि माते लाडक्या आलासि मजसवें ॥ काय न्यून सांग मला काय तुज हवें ॥ शांतविला बंधु ह्रदयिं धरुनि राघवें ॥ चा० ॥ कथितां वृत्त लक्ष्मणें आश्रमा आला ॥ १ ॥

## पद राग सिंधकाफी ताल त्रिवट.

कोठें प्रिया आहे मम जानकि ती राम पुसे सौमित्रासी ॥ ध्रु० ॥ गुंफेआंत जाऊनि लक्ष्मण चोहोंकडे धुंडीत सतीसी ॥ १ ॥ न पाहुनि अंतरिं घाबरुनी शोकें बोलत काय तिजसी ॥ २ ॥ त्यजुनि आश्चातें कोठें गेली अथवा नेली कोणीं तिजसी ॥ ३ ॥ फलाहार वनवासा त्रासुनि गेली कां त्यजुनी आश्चांसी ॥ ४ ॥ आक्रंदत पाहोनि सौमित्रा मूर्छा आली रघुवीरासी ॥ ५ ॥ सावध होउनि बोले सौमित्रा कां त्यजुनी तिजला आलासी ॥ ६ ॥ वाक्‌शर तिचे न साहुनि मज वदे लक्ष्मण आलों वनासी ॥ ७ ॥ विष्णुदास ह्मणे शोकाकुल द्वय गडबड लोळत ते धरणीसी ॥ ८ ॥

## ॥ अभंग ॥

सावध दोघांते सनिधचे विप्र ॥ करोनी कथीती वृत्त झालें ॥ १ ॥ यतीरूपें दशानन तो पातला ॥ भीक्षा घाली सीतेलागी बोले ॥ २ ॥ भीक्षा सीता त्यातें घालाया जों गेली ॥ उचलुनी घेतली स्कंदीं तेणें॥३॥ गडबड करीतां आह्मा दटाउनी ॥ गेला तो घेऊनी त्वरें दुष्ट ॥ ४ ॥ ऐकोनिया ऐसें विप्रमुखें वृत्त ॥ शोधार्थ निघत बंधू दोघे ॥ ५ ॥

## पद राग परज ताल त्रिवट

शोधूं चल त्वरें सीतेला ॥ राम बोले लक्ष्मणाला ॥ ध्रु० ॥ गाठुनि असुरा वधुनि तयाते सोडऊं प्राण प्रियेला ॥ १ ॥ कर्दळिवनीं भेटूनि अगास्तिस जाउं पुढें शोधाला ॥ २ ॥ पाहुनि वनिं आरक्त जटायुस मानुनि राक्षस त्याला ॥ ३ ॥ वदत राम पहा एथें असुर हा सीते गिळुनिया बसला ॥ ४ ॥ राम राम तव पक्षिमुखांतुनि ध्वनि सौमित्रे ऐकिला ॥ ५ ॥ येउनि मग पक्षासन्निध ते ओळखुनी जटायूला ॥ ६ ॥ विष्णुदास ह्मणे प्रेमें त्याते रामे ह्रदयीं धरिला ॥ ७ ॥

## ॥ आर्या ॥

आनंदूनि जटायू अंती ध्या चरण पाहिले तूझे ॥ बोले दशवदनानें

पटें हे पक्ष उपडिले माझे ॥ १ ॥ सांग सकल वृत्ताते खगश्रेष्ठा बो-
ला तयीं राम ॥ ज्यानें तुजला छळिलें काळाचें दाखवीन त्या धाम॥२॥

॥ अभंग ॥

लंकापती दुष्ट रावण सीतेते ॥ नेत उर्ध्व पंथें पाहोनी म्या ॥ १ ॥
द्ध करोनीया जर्जर तयासी ॥ पाडीतां भूमीसी बोले मातें ॥ २ ॥
ण मजसी पुसे मर्मस्थानीं ॥ कोणत्या घालोनी आण तूझी ॥ ३ ॥
ही विचारीतां सांगत कपटी ॥ चरणअंगुष्ठीं मरण माझें ॥ ४ ॥
नीया ऐसें पखीं आहे माझें ॥ बोललों सत्य जे स्वामी रामा ॥ ५ ॥
ा अंगुष्ठासी गेलों मी फोडाया ॥ संधी साधोनीया उपडी पंख॥ ६ ॥
रु करोनीया सीतेसी घेऊनी ॥ गेला तो निघोनी उर्ध्वपंथें ॥ ७ ॥
सांगावया राहीला हा जीव ॥ आतां हा सोडीव भवपाश ॥ ८ ॥
या दर्शनानें झालों मी पावन ॥ स्वर्गासी जाईन आज्ञा देई ॥ ९ ॥

श्लोक भुजंगप्रयात.

करीतों तुला मी बरा बा खगेंद्रा ॥ असें राम बोले, नको रामचंद्रा॥
गें हें आतां लागलें सार्थकासी ॥ सुखें जाण जाईन मुक्ती पदासी॥१॥

॥ आर्या ॥

सांगे न मम पित्याते झाला मज विरह जनकदुहितेचा ॥ कळ-
स्वर्गसुखाते सोडुनि येईल खालता साचा ॥ १॥

घनाक्षरी.

मग राम राम म्हणत ॥ जटायु प्राण निघुनि जात ॥ विमानिं बस-
ें त्वरीत ॥ मुक्तिपदा धाडिला ॥ १ ॥ पित्रव्य मान त्या देऊन ॥
कर्म तेथें करून ॥ सीताविरहें खिन्न मन ॥ राम जात पुढारा॥२॥
शिळा आलिंगीत॥पाहुनि गौरि हरा वदत ॥ तुह्मी ज्यास सदाध्यात॥
करित हा कसे ॥ ३ ॥ फुका त्याचें नामस्मरण ॥ करिता, आज्ञा
लागून ॥ द्यावी त्वरें मी जाऊन ॥ त्याचें सत्व हरीतें ॥ ४ ॥

पद राग झिंजोटी ताल धुमाळी.

हास्य करोनी तो गिरिजावर वदे काय मग गौरीसी ॥ ध्रु० ॥ ऐक
नामाचा महिमा कालकुटें पिडितां मजला॥नाना उपायें दाह शमे न

जो तो त्या नामें गे शमला ॥ काय वर्णु मी त्यातें ज्यातें सहस्त्रमुखीं अहिही थकला ॥ चा० ॥ चार वेदही तसेच शिणले त्याचे गुण वर्णा-यासी ॥ १ ॥

॥ गीत ॥

द्यावी आज्ञा ह्मणे हराला ॥ सिताख्प धरुनिया तयाला ॥ जाउनि त्याच्या हो सत्वाला ॥ हरितें प्राणप्रिया ॥ १ ॥ शंकराज्ञा मग घेऊन ॥ गिरिजा सीतारूप धरून ॥ पंचवटीअरण्यीं येउन ॥ वदत काय रामा ॥ २ ॥

**पद राग कालंगडा ताल दीपचंदी.**

हे मम प्राणप्रिया रघुवीरा पहा ही कांता आपुली आली ॥ ध्रु० ॥ तव भयें मज दशाननानें आणुनि एथें सोडीली ॥ १ ॥ व्यर्थ कशास्तव वृक्ष कवळिता असुनि प्रीया आपली ॥ २ ॥ बोले न तिजशीं राम हें पाहुन लक्ष्मणा भ्रांति पडली ॥ ३ ॥ बोले निष्ठुर मन कां रामा ही श्रमित पहा जहाली ॥ ४ ॥

॥ आर्या ॥

नोहे सीता परि ही हिमनगजा पण करोनि शूलीशीं ॥ भुलवाया मज आली न कळे हें काय बांधवा तुजसी ॥ १ ॥

**पद राग बागेसरीची बहार ताल त्रिवट.**

कां आलीस तूं माय पुसे शिवा सोडोनि भवानी ॥ ध्रु० ॥ हरूं सत्व आलिस परि माते जाणत तव पति शिव पूर्ण ॥ कां श्रमसी व्यर्थ गे जाउनी पूस तया वंदुनिया पाय ॥ १ ॥

॥ ओव्या ॥

ऐसें ऐकोनि मृडानी ॥ ह्मणे रामा तूं ज्ञानखाणी ॥ तुह्मा हर तुह्मा लागोनी ॥ पूर्णपणें जाणतां ॥ १ ॥ परी सांगा रघुनाथा ॥ वृक्ष-शिळा कां आलिंगिता ॥ संशय माझे मनचा आतां ॥ कृपा करोनी निवारा ॥ २ ॥

**मा० प० कां आलीस तूं मायः—**

**गिरिजामस्ताकें हस्त ठेउनी दिव्य चक्षु देउनि तिजला ॥ राम ह्मणे पहा हे माते वृक्षशिळा कीं असे काय ॥ २ ॥**

॥ ओव्या ॥

दिव्यचक्षू करोनी ॥ पाहे तों ते दिसती मुनी ॥ राघवें त्यां उद्धारूनी ॥ मुक्तिपदा धाडिलें ॥ १ ॥ आनंदोनी बहू मृडानी ॥ रामातें अशिर्वाद देउनी ॥ ह्मणे काय तव मनांतूनी ॥ माग त्वरेनें पुरवितें ॥२॥

मा० प० कां आलीस तूं माय:—

भक्तजन ताराया अंबे रहा सदा गे तूं एथें ॥ तुळजापुरवासिनी ह्मणोत तुज विष्णुदास जनीं वंदुनि पाय ॥ ३ ॥

॥ कटाव ॥

तेथुनिया पंपासरसा रघुवीर पुढें नीघाला॥ध्रु०॥कृष्णातटिं येतां स्नानाला॥ आनंदानें पात्रि उतरला ॥ मिसळुनि तोयीं गुप्त जहाला ॥ पाहुनि ऐसें बहु घाबरला ॥ लक्ष्मण मग बहू कोपला ॥ अग्नीमुख काढीत शराला ॥ कृष्णाजल तें शोषायाला ॥ समजुनि मग हें रघूत्तमाला ॥ जलामधुनिया वरे निघाला ॥ आलिंगीत प्रेमें बंधूला ॥ ह्मणे वाटली कृष्णा मजला ॥ तिपरि गेलों भेटीला ॥ पुढें आनंदोनी तीघे ते ॥ जातां मार्गीं लक्ष्मण ते ॥ कबंधें गाठितां स्थळीं ते॥मारुनि उद्धारितां तयातें ॥ विश्वावसु तो वदे रामातें ॥ जाउनिया ऋष्यमूक गिरीतें ॥ करूं पुढें सीताशुद्धीतें ॥ सुग्रिवास घे तूं सहायातें ॥ मान्य करोनी तद्वचनातें ॥ मार्गीं उद्धारून शबरीतें ॥ येउनि पंपासरोवरातें ॥ बसती स्फटिकशिळेच्या वरते ॥ चा० ॥ तेथुनिया ऋष्यमुकीं तो पाहे मग पंचकपीला ॥ १ ॥

## वालीवध व हनुमंताचें किस्किंदीं आगमन.

॥ साक्या ॥

ऋष्यमूक गिरिवरुनि सुग्रिवें पाहुनि द्वयवीरांते ॥ पुसत मारुतिस स्फटिक शिळेवर कोण असाति बसले ते ॥ १ ॥ वदे मारुती पाहुनि येतों असती ते बा कोण ॥ ऐस स्वस्थ मी येई तोंवरि, त्वरें करी उड्डाण ॥ २ ॥

## घनाक्षरी.

शिळेसन्निध हनुमान ॥ बैसे वृक्षीं मग जाऊन ॥ वाकोल्या रामा दाऊन ॥ ढाळे फेंकि त्यावरी ॥ १ ॥ रामें पाहुनी कपीस ॥ बोल्ले काय सौमित्रास ॥ पहा पहा हा वानरीश ॥ स्वर्णकौपिनधृत ॥ २ ॥ आठवे कपिस मायवचन ॥ कीं ज्या तुझी ही कौपीन ॥ दिसेल सुवर्णाचि जाण ॥ तोचि स्वामी जाणपा ॥ ३ ॥ परी पहाया स्वामिशौर्य ॥ वृक्षशिळा अनिवार्य ॥ फेंकितां सौमित्र तो वीर॥बाणें सर्व उडवित ॥४॥ सौमित्र बाणोद्भव वातें ॥ कपी जात आकाशातें ॥ पाहुनि ऐसें समीरतातें ॥ वदे काय सुतासी ॥ ५ ॥

### पद राग पिलु ताल धुमाळी.

समीर प्रेमें मारुतिसी ह्मणे पुत्रा कां श्रमतोसी ॥ ध्रु० ॥ जो स्फटिकशिळेवर निजला स्वामी तव कथितों तुजसी ॥ अनन्य शरण त्या जायी सेवी तूं चरण तयाचे ॥ चिरंजीव करिल तुजलागी देऊनि अचलपद साचें ॥ चा० ॥ मानुनिया मम वचनाते ॥ त्यागुनि [illegible] नाते ॥ जा शरण रघुरायाते ॥ हो अजिंक्य त्रैलोक्यासी [illegible] १ ॥

### रामस्तुतिगद्य ताल अर्धधमार.

दिनोद्धारक भक्तपालक दिनानाथ दयानिधे ॥ भवसागरा तूं तारका श्रमहारका कृपानिधे ॥ केशवा करुणा करा मज पामराते [illegible] करुणानिधे ॥ दीन मातें मी हीन तुजविण न मातें तारिता कृपा [illegible] हरकांतक यज्ञपालक शिळोद्धारक दुष्टअंतक रघुविरा ॥ स्वामि [illegible] र्थे लीन चरणीं करिं धरा मज पामरा ॥ १ ॥

### पद राग सिंध काफी.

उठे उठें तूं सांग कपींद्रा कोण कोठुनिया आलासी ॥ ध्रु० ॥ वास तुझा कोण्या वनांतरिं उपदेशिलें हें कोणीं तुजसी ॥ १ ॥ [illegible]चिरंजिव रविशशि असती महिवरि तोंवरि कथितों तुजसी ॥ [illegible]नी कृपाकर ठेऊनि मस्तकीं प्रेमें उठवी हनुमंतासी ॥ ३ ॥ विष्णुदासणे स्ववृत्ताते कथित मारुती रघुपतिसी ॥ ४ ॥

### पद राग मुलतानी ताल धुमाळी.

स्वामि रामा आज्ञांते हतीं धरावें ॥ वधुनि वाले किस्किंदा[illegible]

सुग्रिवा द्यावें हो ॥ ध्रु० ॥ वायुसुत मी जन्मलों अंजनीउदरीं ॥ घातालि झेप जन्मतांचि सूर्यावरी॥त्रासिले देवां देवेंद्रा त्या हो भारी॥चा०॥तातें कथिलें मग त्वां रामा शरण रिघावें हो ॥ १ ॥ पाहे पैल ऋषिमूक-पर्वतावर ॥ नळ नीळ जांबुवंत सूर्यकुमर ॥ करिती इच्छा तव दर्शनाची फार ॥ चा० ॥ राघवें दिली आज्ञा जाउनि त्या आणायासी हो ॥ २ ॥ वंदुनि रामचरण हनूमान ॥ वृत्त जहालें कथि सुग्रिवास येऊन ॥ रघुवीरापरि योग्य वीर अन्य न ॥चा०॥ विष्णूदास ह्मणे सुग्रिवा काय ऐकावें हो ॥ ३ ॥

### पद राग आलियाबिलावल ताल त्रिवट.

बहातो तुज रघुवीर रे ॥ सुर्यसुताप्रति बोले मारुति लावि न चल उशीर रे ॥ ध्रु० ॥ सुग्रीवा तव भाग्य उदेलें ॥ न बाहतां राघव रे आले ॥ होतों सहाय वचन मज दिधलें ॥ चा० ॥ जायीं शरण त्या वंदी रे ॥ १ ॥

### पद राग पिलु ताल धुमाळी.

होउनि मान्य सुग्रिवा हो निघाला रामदर्शना हो ॥ ध्रु० ॥ वानर-सेनेसह येउनिया वंदित रामा हो ॥ १ ॥ उठउनि हृदयीं धरित तया-प्रति प्रेमें राघव हो ॥ २ ॥ सन्मुख मग कर जोडुनि सुग्रिव करि रामस्तुति हो ॥ ३ ॥ अशिर्वाद देउनि सर्वांते बसवी रघुपति हो ॥४॥

### ॥ आर्या ॥

तव बंधु वाली हा करितो कां द्वेष सुग्रिवा तुजशीं ॥ बोले राघव सांगे पहिल्यापासून वृत्त तें मजसी ॥ १ ॥ दुंदुभिसमरा पासुनि घडलें जें वृत्त रामभद्रातें ॥ विनयें सांगुन बोले व्हावें तुह्मीं साह्य राघव पातें ॥ २ ॥

### श्लोक भुजंगप्रयात.

वधोनी जरी वालि तद्राज्य वीरा ॥ तुला देइं ना मी तुझी प्रीय तारा ॥ तरी सूर्यवंशीं कशाला जिणें हें ॥ वदे सत्य पृथ्वीप्रती भार आहे ॥ १ ॥

॥ आर्या ॥

तैशी तुझीहि भार्या सीता ती तुज न भेटवी आणुन ॥ सैन्यासह सुग्रिव हा अक्षयिं नरकीं पडेल हें जाण ॥ १ ॥

॥ गीत ॥

दोघांचे झाल्यावरि पण ॥ सुग्रिव रामा करी कथन ॥ काळ एक स्त्री राक्षस घेउन ॥ येथुनिया गेला ॥ १ ॥ शोकें होउन विव्हळ सुंदरी ॥ बाहे प्रीयकरा वरिवरि ॥ पाहुनि आह्मां तिणें गिरिवरी ॥ अलंकार त्यजिले ॥ २ ॥ राम ह्मणे मग सूर्यसूता ॥ आणि भूषणें पाहूं आतां ॥ तेणें मारुति आज्ञापीता ॥ आणी भूषणें ॥ ३ ॥ रामें घेउन भूषणें तीं ओळखण्या सौमित्रहस्तीं ॥ देऊन पुसे तयाप्रती ॥ सीतेचीं कां हीं ॥ ४ ॥ अन्यभूषणें न ओळखती ॥ फक्त नूपुरें ठावी मज तीं ॥ सीताचरणीं हींच होतीं बोले सौमित्र ॥ ५ ॥

आर्या.

निशीं दिनि संनिध असुनी जानकिचीं भूषणें तुज न कैशीं ॥ ठावीं नवलच मोठें वाटतें मज सत्य हीं तिचींच अशीं ॥ १ ॥

॥ दिंडी ॥

तीन वेळां प्रतिदिनीं नमन सीते ॥ करी तेणें नूपुरें ठावि मातें ॥ नाहिं देखियलीं कधिंच इतर अंगें ॥ कशीं ठावीं भूषणें असतिं सांगे ॥ १ ॥

आर्या.

धन्य जगीं सौमित्रा रविकुलभूषण खराच तूं असशी ॥ धन्यसुमित्रा ती ही सात्विक पुत्रास प्रसवली तुजसी ॥ १ ॥

॥ ओव्या ॥

नंतर सुग्रीव रामासी ॥ ह्मणे न करी वाळीशीं ॥ सन्मुख युद्ध संग्रामासी ॥ ऐका विनंती ही माझी ॥ १ ॥ मी त्यांते युद्ध करून ॥ केल्या करी जर्जर आपण॥एक्या बाणेंकरून ॥ प्राण घ्यावा तयाचा ॥ २ ॥

## पद राग काफी ताल एका.

ऐकुन सुग्रिववचनास राम काय बोलला ॥ आतां वधुनी वाळीस त्वरित करिन सुखि तुला ॥ ध्रु० ॥ त्यातें वाळिस समरास न्हावयास धाडिलें ॥ सुग्रिवें जाउन भुभुःकारें नगर सर्व गर्जविलें ॥ चा० ॥ ऐकुन गर्जना तारेसवालि काय बोलला ॥ १ ॥

## ॥ आर्या ॥

वारंवार पराजित तारे मी जरि करीत गे त्याला ॥ पुनरपि येतो युद्धा मूढ खरा तिळ न लाज गे ह्याला ॥ १ ॥ कोणी रघुविर नामें नृपसुत सह्यार्थ आणिला तेणें ॥ बंधूसह यमधामा धाडियलें बहुत दानवा जेणें ॥ २ ॥ नकरी समर तयाशीं प्राणेशा वदत ऐक तारा ती ॥ नेणोनि विक्रमाते सिंहाशीं लढत जाण मशकें तीं ॥ ३ ॥

## श्लोक पंचचामर.

वधीन आज सुग्रिवा तरीच प्राण ठेवि हा ॥ प्रिये उगी रडूंनकोस अंगदासवें रहा ॥ सुखें करीत राज्य वालि स्वप्रियेस बोलला ॥ जयांति-दत्त घालुनी गळ्यांत माळ धावला ॥ १ ॥

## पद राग काफी ताल एका.

सुग्रिववालि मल्लयुद्धिं हणिति मुष्टि गर्जुन ॥ कंपित होत धरणि जात देव भिऊन ॥ ध्रु० ॥ सम दोघे बलिवंत परी विजय माळ ती ॥ वालिकंठीं तेणें केला सुग्रिव जर्जर अती ॥ दोघे रक्तमाखित बालभा-नूपरि दिसती ॥ चा० ॥ जर्जर होउनि पाहे सुग्रिव रामाते दीन ॥१॥ जर्जर सुग्रिव देखोन राम बोले मारुती ॥ उभयांतिल सुग्रीव दावि त्वरें मजप्रती ॥ करुनीया सुमनमाल सुग्रिव कांठिं मारुती ॥ चा० ॥ घाली-तेणें आला रामा सुग्रिव कळून ॥ २ ॥ चाप सज्ज करुनि रामें त्वरित बाण सोडिला ॥ प्रखर बाणें त्या वालिह्रदय भेद जाहला ॥ विकल पडतां धरणिस राम संनिध आला ॥ चा० ॥ पाहुनि वाळि वदत क्रोधें तयालागून ॥ ३ ॥

## पद राग यमन ताल एका.

वाळि बोले रघुपतिला रे नसतां अपराध मजकडे कां दंड केला

आजि मला रे ॥ध्रु०॥ नोहे रामा रीत अशी ॥ हटकिल्याविणें मजसी ॥ दडुनि काय बाण त्वां मारिला रे ॥ १ ॥

**पद राग सिंधभैरवी ताल त्रिवट.**

ऐकुन वालीवाक्य रघुपति बोले काय त्याला ॥ दुष्टा धर्माधर्म कथिशी कशास व्यर्थ मजला ॥ ध्रु० ॥ मर्कट वनचर तुजसी वीरें समरा काय व्हावें ॥ क्षात्रधर्म असे कीं त्यातें दडूनीया मारावें ॥ कशाचा धर्म बंधुपत्नीशिं काय त्वां रत व्हावें ॥ मरण मम पुण्य बाणें तुजला योग्य नसावें ॥ केला उपकार बहूत तूजवरी सुग्रीवें ॥ झालें दर्शन माझें अंतीं त्वां मुक्तीस जावें ॥ चा० ॥ यापरि ज्ञानसार ऐकतां वाली सद्गद जहाला ॥ १ ॥

**मा० प० वालि बोले रघुपतिः—**

सीतेसाठिं व्यर्थ श्रमसी ॥ तव रिपु त्या रावणासी ॥ बांधिला होता पाळणासी ॥ अंगदाचिया रे ॥ २ ॥ जरि कथिलें असतें मजसी ॥ सोडउनी जानकिसी ॥ धरुनि आणिला असता त्यासी ॥ धाकें कापे तो मला रे ॥ ३ ॥

**मा० प० ऐकुनि वालीवाक्यः—**

ऐकुनि हर्षे बोले राम काय वालीते ॥ काढुनि बाणशल्य पूर्वीपरी करीतो तूंतें ॥ सहाय होउन मजसी आण धरोनी रावणाते ॥ नको रामा बोले वाली भवपाश मातें ॥ पाहुनि बंधूते गहिंवर आला सुग्रीवातें ॥ रामें शांतवीला हृदयीं धरुनी अर्कजातें ॥ चा० ॥ पती पडला मूर्छीत कळलें हें तारेला ॥ २ ॥

**॥ ओवी ॥**

मरणोन्मुख रामहस्तें ॥ झाला वाली कळूनि तारेतें ॥ येउनिया समरभूमीतें ॥ काय वदे रामासी ॥ १ ॥

**पद राग झिंजोटी ताल दीपचंदी.**

तुशिं वैर नसतां वधिलें कां मम प्राण पतीला ॥ तारा बोले रघुपति दीन केलें आजि मला ॥ध्रु०॥ मी प्राणनाथवीण जन्म कंठु काशितरी ॥ बोले सांगा प्राण कशास ठेउं दुःखित अंतरीं ॥ आणि अंगदास घालि

रामचरणांचवरी ॥ चा० ॥ कृपासिंधु करुणा माझि कशि नये तुला ॥ १ ॥

**मा० प० ऐकुन वालीवाक्य:—**

तारे न करी शोक भुलून या नाशीवंतातें ॥ कथितों वेदवत मान दे या वचनातें ॥ वरावें त्वां आतां ममाज्ञें गे सुग्रीवातें ॥ पतीव्रतेमाजीं गणतील जन तूंते ॥ मान्य करुनी रामावाक्य तारा सुग्रीवातें ॥ वरी होई कय मान्य हें सर्व जनांतें ॥ चा० ॥ करुनी शांतवन धाडीत रघुविर तारेला ॥ ३ ॥

**मा० प० वालि बोले रघुपति:—**

सुग्रिवगळां विजयिमाळ ॥ घालुनि वाळि तो तत्काल ॥ ह्मणे रामवचन पाळ ॥ साह्य हो तया रे ॥ ४ ॥ असशी रामा तूं जवळ ॥ नये ऐशि मरणवेळ ॥ कृपा करि न लावि वेळ ॥ धाडि मुक्तिला रे ॥५॥ विष्णुदास बोले सार ॥ इंद्रपुत्रभाग्य फार ॥ असतां बंधुमांडि शरि ॥ प्राण सोडिला रे ॥६॥

**॥ ओवी ॥**

रामेंमुक्ती देऊन वाळीते ॥ विमानीं बसवोनिया त्यातें ॥ धाडिता झाला वैकुंठाते ॥ उत्तरक्रिया करी सुग्रिव ॥ १ ॥

**॥ अभंग ॥**

झालों वचनांतूनी पार ॥ बोले सुग्रीवा रघुवीर ॥ माल्यवानाच्या शेजारीं ॥ राहूं चार मास तरी ॥ मम वचनांतूनी पार ॥ व्हावें करोनि त्वां कार्य ॥ ऐसें आज्ञापूनी त्यास ॥ वदे काय सौमित्रास ॥ जावोनीया राज्यीं स्थापी ॥ सचिव करी अंगदकपी ॥ मग तो किरिंकदेते येत ॥ रामआज्ञेपरि करीत ॥ १ ॥

**॥ गीत ॥**

पुढें कोणे एके दीनीं ॥ स्मरण सितेचें रामा होउनी ॥ आहे सुग्रिव कृतघ्नखाणी ॥ बोले सौमित्रा ॥ १ ॥ राज्यसुखीं होउन तो मग्न ॥ मजलागी जाणीत अधम न ॥ करितां, जाउन शोध करून ॥ ये, करितो काय ॥ २ ॥ जर मानी न मम वचनातें ॥ धाडी त्याते बंधुभेटिते ॥ मत्कार्यीं उद्युक्त त्याते ॥ आण तरी इकडे ॥ ३ ॥

॥ कटाव ॥

मानुनिया रामाज्ञेते सौमित्र किस्किंदे आला ॥ ध्रु० ॥ पाहुनिया त्याच्या कोपाला ॥ हनूमंत मग पुढें धावला ॥ गाठुनि सुग्रीवास बोलला ॥ मूर्खा रामकार्य न तुजला ॥ आठवलें त्या कोप आला ॥ आला लक्ष्मण सुड घ्यायाला ॥ ऐकुन सुग्रिव बहु घाबरला ॥ ह्मणे कपी सीताशुद्धीला ॥ धाडा, तों सेवक ते त्याला ॥ कथिती येउन पुरद्वाराला ॥ रामानुज तो आहे आला ॥ विनवी सुग्रिव हनुमंताला ॥ त्वरें शांतवी सौमित्राला ॥ मग तारेसह सुग्रीवाला ॥ आणुनि त्याचे चरणिं घातला ॥ बोले मी शरण रामाला ॥ क्षमा करी रघुराज तयाला ॥ आणुनिया मग कपीगण ॥ दाखवीत रामा स्वसैन्य ॥ पराक्रमी एकएकाहून ॥ पुसे राम त्या या वस्त्रन्न ॥ पुरविशि कैसें करी कथन ॥ सुग्रिव बोले फलपर्ण ॥ वायू यांचें आहे आशन ॥ पृथ्वी अंबर यां प्रावर्ण ॥ वृक्षशिळा अयुधें त्या जाण ॥ चाल ॥ सुग्रिवें बहू धाडीलें मग कपि सीताशुद्धीला ॥ १ ॥

॥ ओवी ॥

धुंडीत पृथ्वी आकाश ॥ परी नलगे शुद्धी त्यांस ॥ सीताविरही जगंनिवास ॥ काय मारुतिस बोलला ॥ १ ॥

पद राग झिंझोटी ताल त्रिवट.

सीताशुद्धीस जायी त्वरें हनुमंता ॥ येऊन कळवी मज असे कोठें कांतां ॥ध्रु०॥ वानरसेना सवें घे जाई दक्षणपंथें प्रियकरा आतां ॥१॥

पद राग मल्हार ताल धुमाळी.

प्राणापरिस प्रिय रामाते मारुती ॥ जो अकरावा रुद्रचि अवतरला साह्य रघुपतीसी ॥ ध्रु० ॥ मानुनि आज्ञा पद वंदी हनूमान ॥ सिताशुद्धिस निघे दक्षणपंथ लक्षून ॥ सवें नळनीळ जांबुवंत आणि वालीसून ॥ सर्वांसी स्थीर करीत कांहीं त्या सूचोन ॥ चाल ॥ मग येउनि परत काय पुसत स्वामीप्रती ॥ १ ॥ रघुराज कशी जाणावी आह्मी जानकीला ॥ कांहिं स्वरूपाचें वर्णन सांगावें आह्मांला ॥ किंवा कांहिं खुण द्यावी तिजला ओळखण्याला ॥ जाउं त्वरेंकरुनी आम्ही तिजला शोधायाला ॥ चाल ॥ त्रिभुवनीं धुंडुनी काढूं सीतासती ॥ २ ॥

**मा० प० सीताशुद्धीस जाई:—**

मम रूपापरि रूप प्रियेचें अंगा सुवास असे अंजनीसूता ॥ २ ॥ तिज-संनिध पाषाण वृक्ष ते असती नाम मम स्मरीत सूता ॥ ३ ॥ मुद्रा खूण ही प्रिये दावितां समजेल मम सेवक तुज सीता ॥ ४ ॥ शिरीं हस्त ठेऊन कपीच्या राम ह्मणे जाई त्वरें आतां ॥ ५ ॥ विष्णुदास ह्मणे वानरगणसह निघे शोधाया जनकदुहिता ॥ ६ ॥

**मा० प० प्राणापरिस प्रिय:—**

हनुमंतें केलें तेथोनी मग उड्डाण ॥ पातला होते ज्या स्थानीं सर्व वानरगण ॥ करीती रामस्मरणें तेथोनी गमन ॥ तों पुढें लागलें त्यांसी दग्ध घोर वन ॥ चाल ॥ त्या वनीं विकळ क्षुधेनें सर्वहि होती ॥ ३ ॥ ~~मुनिकंडुपुत्र त्या~~ वनीं होता ब्रह्मराक्षस ॥ तो त्वरें आला धावोनी वानर भक्षायास ॥ अंगदें पाडिला त्यासी ~~स्वकी~~ चरणास ॥ बळिवंत पाहुनी त्यासी कथी स्ववृत्तास ॥ चाल ॥ विष्णुदास ह्मणे उद्धारुन गेला तो स्वर्गाप्रती ॥ ४ ॥

**पद राग ललत ताल दीपचंदी.**

चिंता पडली हनूमंतासी ॥ क्षुधें व्याकूळ पाहूनी वानरांसी ॥धृ०॥ तों देखे विस्तीर्ण एक विवराप्रती ॥ त्यांतूनीया बाहेर पक्षी फळें आणीती ॥ हळूं हळूं विवरीं सर्व कापी जाती ॥ चाल ॥ नेत वाहुन मारुती शक्तीहीनांसी ॥ १ ॥ आंत पाहे सफळ वृक्ष आणि नीर ॥ चढावया परि न शक्ती वृक्षावर ॥ तों ये सुप्रभा रक्षक पाहे प्रकार ॥ ॥ चाल ॥ फळें आर्पून पुसे कोण मारुतीसी ॥ २ ॥

**॥ आर्या ॥**

बोले कपींद्र तीते रामाचे दास जात शुद्धीते ॥ जानकिच्या लंकेते ऐकुनि सांगे स्ववृत्त ती त्यातें ॥ १ ॥

**॥ ओव्या ॥**

परी न त्यास विवरांतून ॥ मार्ग दिसे जायालागून ॥ ऐसें सुप्रभेनें पाहून ॥ बोलत काय तयातें ॥ १ ॥ तुह्मी झाका आपुले नयन ॥ ह्मणजे सागरतटीं नेईन ॥ आज्ञेपरी वानरगण॥करितां त्यांतें पोचवी॥२॥

॥ आर्या ॥

येउनि रघुरायातें कळउनि हें वृत्त सुप्रभा गेली ॥ इकडे तं
कपी मंडळि पाहोनि सागरा भ्याली ॥ १ ॥

पद राग कालंगडा ताल दीपचंदी.

नसे मार्ग पैल जाया पाहोनीया कपी बहू दुःखित होती ॥
आतां मुख दावावें राघवा प्राण द्यावयास सिद्ध होती ॥ १ ॥ व
ढीग पेटऊनी हनूमंत बोलत काय तों सर्वांप्रती ॥ प्राणत्याग व
मी सर्वांआदी कपीगण मान्य तें करीती ॥ २ ॥

पद राग यमन ताल धुमाळी.

रघुविरदास काय करिती सिंधुतीरास ॥ ध्रु० ॥ मारुती उडी
अग्नींत ॥ तीन वेळ अग्नी ... शांत ॥ चाल ॥ झाले मग
कपी समस्त प्राण द्यायास ॥ १ ॥ तंव ये पक्षिराज संपाती ॥
यालागि वानराप्रती ॥ चाल ॥ हर्षें स्तउनि तया बोलती खाः
... ॥ २ ॥ फुटती पक्ष तों संपातीला ॥ आश्चर्यें कोण पुस
... ॥ चाल ॥ पावलों दर्शनें पक्षाला वंदि तयांस ॥ ३ ॥
वनाप्रती आगमन ॥ जटायू स्वर्गलोकीं गमन ॥ चाल ॥ गहिव
पाती ऐकोन कथी स्ववृत्तास ॥ ४ ॥

॥ आर्या ॥

ह्मणती कापि जानकिची शुद्धी सांगा तुह्मांस जरि ठावी ॥ बे
आहे ती लंकेमाजीं सुखी अशोकाटवीं ॥ १ ॥

घनाक्षरी.

संपाति नमुनि त्यांस जात ॥ पुढें कपि विचार करित ॥
जाइल लंकेंत ॥ सागरास उलंघुनी ॥ १ ॥ ह्मणे मी वृद्ध जां
अंगदा लंका न माहीत ॥ मग ते हनुमंता पुसत ॥ पैल ज
तुह्मी ॥ २ ॥

॥ ओव्या ॥

ह्मणे बाळपणीं सूर्यासी ॥ होतों गेलों गीळायासी ॥ स

नी पैलतिरासी ॥ जाईन लंके सत्वर ॥ १ ॥ मग ह्मणे वानरांस ॥
ा वृक्षशिळा यांस ॥ उड्डाणसमयीं मम वेगास ॥ न सहाल तुह्मी हो
२ ॥ मग रामस्मरण करून ॥ महेंद्रपर्वतीं जाऊन ॥ क्षेपयेत पुच्छ
ऽकून ॥ वानर पहाती चमत्कार ॥ ३ ॥

# सीताशुद्धी, लंकादहन आणि रामाचा सुवेळेंत प्रवेश.

### पद राग नाट्य ताल धमार.

रामदास बलाढ्य मारुति स्मरित रघुपति येत लंकेला ॥ सिताशुद्धी
ं वेगें उडुनि सिंधूला ॥ ध्रु० ॥ विघ्नकरं येतां त्या सुरभा धाडि मु-
ख ॥ तैसा नग मैनाक येतां बुडावि तयास ॥ सिंहिके मारून भिकी
ादेवीस ॥ चाल ॥ पुढें जातां मार्गी क्रौंचा अडवि तयाला ॥ १ ॥

### पद राग पिलु ताल धुमाळी.

घर घर निशाचराची स्त्री ती क्रौंचा हो असुरी ॥ इंद्र हस्ते मरतां
तिस रावणें दिली नगरी ॥ १ ॥ सहज तिथें जातां उडि धरि
हनुमंतास करीं ॥ पाक करोनी याचा आणा सूदा आज्ञाकरी ॥ २॥
न करी ह्मणतां त्यानें, टाकित मुखांतरीं॥त्रास देउनि तो पोट चिदा-
निघे बाहेरी ॥ ३ ॥ मारुति तेथिल निशाचरातें फेकित सागरीं॥
ती वृद्ध राक्षसी भयें दावित लंकानगरी ॥ ४ ॥ निघुनि तेथुनी नि-
ळे ये त्वरीत मग वीर ॥ ह्मणे इंद्रजित सुलोचनेसह पाहुन शेजेवर
॥ काय सिता असुराशिं रते हो ! ! कोपें अनिवार॥तों ती सुलोचना
तें सांगे सुविचार ॥ ६ ॥

### ॥ दिंड्या ॥

शेषकन्या स्वप्रिया काय बोले ॥ आणुनि सीतें असुरें न बरें केलें॥
ायाशीं वैर वाढविलें ॥ तुह्मी कां न त्यालागि बोधियेलें ॥ १ ॥
लागी बोलला इंद्रजीत ॥ भावि होणारापरि धी खचीत ॥ ह्मालि
ी ऊपाय, हनूमंत ॥ आला ऐकुनि बिभीषणमंदिरास ॥ २ ॥

### पद राग काफी ताल त्रिवट.

भक्तशिरोमणि खरा बिभीषण जो प्रिय सीतावरा ॥ ध्रु० ॥ ऐकुनि त्याच्या गृहीं हरिभजन अवडे तो वायुकुमरा ॥ १ ॥ नाचे कीर्तनीं आनंदुनि ह्मणे कारिन लंकानृपवरा ॥ २ ॥ अशिर्वचन देऊनि जात पुढें कुंभकर्णमंदिरा ॥ ३ ॥ विष्णुदास विनवीत तयाते त्वरें मजसि उद्धरा ॥ ४ ॥

### पद राग कालंगडा ताल धुमाळी.

लंका नगरद्वारीं हनूमंत पातला ॥ परोपरी विटंबून छळी राक्षस नारींला ॥ १ ॥ कोणांचे घालुन कानीं पुच्छ फोडी शिरिच्या कुंभाला ॥ कोणां नग्न करी झालें श्रुत हें दशाननाला ॥ २ ॥ येउन रावणसभेंत कपि मग गुप्त बैसला ॥ तों ते हेर सांगति रावणासीं झाल्या वृत्ताला ॥ ३ ॥ मालऊनी दीप विटंबीत निशाचरांसी ॥ कापोनीया लिंगे कैकांची ताडीत त्यांसी ॥ ४ ॥ सीतेसाठीं शोधी कपी सर्व नगरासी ॥ गुप्तरूपें मग आला त्वरें मैजागृहासी ॥ ५ ॥ रावणाशीं तों मैजा बोलत देखुनी कपीसी ॥ वाटे सीता ती वश झाली दशाननासी ॥ ६ ॥ दु:खी होत मनीं; तंव ती बोले दशाननासी ॥ मैजा, काय ऐके मारुती लावोनी ध्यानासी ॥ ७ ॥

### पद राग पूरियाकल्याण ताल दीपचंदी.

मैजा बोधित रावणासी ॥ तुम्ही अचरा न या दुष्टकृतिसी ॥ ध्रु० ॥ स्वप्न मला आजी विपरीत पडलें त्याचें निवारण कथितें तुम्हांसी ॥१॥ सीता नोहे हें विघ्नचि आणिलें स्वकुलसंपत्तिक्षयास्तव गृहासी ॥ २ ॥ शरण जाउनि रामा आर्पून सीता अक्षयीं भोगा हो या राज्यासी ॥३॥ विष्णुदास ह्मणे मैजाबोधामृत न रूचलें त्या दशवक्त्रासी ॥ ४ ॥

### मा० प० लंकानगरद्वारीं:—

मारुति दूतीसवें त्वरें तेथोनीया नीघाला ॥ अशोकवनीं ये बंदी पाहोनीया सीतेला ॥ ८ ॥ अंजुलिपुटीं असतां ध्यानस्त स्तवीत रामाला ॥ सीता, टाकीत मारुती रामदत्तमुद्रेला ॥ ९ ॥ उडोनी तेथुन मग वृक्षावर येउन बैसला ॥ घाबरें अवचीत पाहोनी रामकरिच्या मुद्रेला॥१०॥ दु:ख करीत स्फुंदोनी ढाळी अश्रूपूराला ॥ विष्णुदास मन कळवळें ऐकुन शोकाला ॥ ११ ॥

## पद राग झिंझोटी ताल धुमाळी.

सीता रुदत पुसत मुद्रेसी कां त्यजिलें त्वां रामासी ।।सांग०।। कां दुष्टे सोडुनि प्रियाला आलीस सांग तूं मजला ।। कीं असुरिं वनीं भक्षीला कीं आलीस मम शुद्धीला ।। चा० ।। त्वरें बोल वैरिणी मजशीं ।। १ ।। झालें असत्य वाल्मिकिवचन कीं कारिल कपी शोधन ।। त्रासील लंकापुरजन मम शुद्धि रामालागोन।।कळवितां सेतु बांधोन सुवेळेसि प्रीय येऊन ।। चा० ।। मारील असुररावणासी ।। २ ।। राज्यिं स्थापिल बिभीषणाला प्रियकर मग भेटेल मजला ।। बोल धरिसि कां मौन्याला सत्य त्यजीन यामाणाला ।। झालि सिद्ध जीव द्यायाला कळतां हें रक्षकअसुरींला ।। चा० ।। दटावित वदे विष्णुदास तिजसी ।। ३ ।।

## ।। ओवी ।।

वदती असुरी तिजलागोन ।। फुका कां गे करिसी रुदन ।। कोठील राम धरोने रावण ।। सुखी रहा अनंदें ।। १ ।। हनुमतें त्यांसी मारून।। आरंभी वृक्षीं मग बैसोन ।। रामचरित्र गायन।।सीता ऐके वृक्षतळीं ।।२।।

## पद राग जोगी ताल धुमाळी.

रघुविरकिंकर मी ऐक सिते शोधुंआलों तुज माते ।। ध्रु० ।। राक्षस मारुनिया हनुमान ।। आरंभी गायन ।। वर्णित रामलीला संपूर्ण ।। वृक्षाआड बैसोन ।। ऐकत उभी सिता येऊन ।। सद्गदीत होऊन ।।चा०।। कुंटित समिरगती ऐकायातें ।। १ ।। राक्षस मातले उर्विवरी ।। पिडितां गोद्विजां भारी ।। करुणाघन दशरथउदरीं ।। आला, मग कांतारीं ।। नेलें कौशिकें, असूरी ।। ताटिकेसउद्धारी ।। चा० ।। रक्षी मख उद्धरि अहिल्येते ।। २ ।। भार्गवचापपण हरुनी ते ।। वरिलें तुज रघुनाथें ।। करुनी चिरंजीव रामाते ।। आले अयोध्येते ।। पितृवचनें ये पंचवटिते।। मारी बहु असुरांते ।। चा० ।। नेली दशाननें चोरून तूंते ।। ३ ।। वालिराज्य दिलें सुग्रिवाला ।। आज्ञा तवशुद्धीला ।। देतां उलंघुनी सिंधूला ।। त्रास दिला लंकेला ।। झालें दर्शन हें दासाला ।। मुद्रा आणिलि खुणेला ।। चा० ।। कृपा करि विष्णूदासावरते ।। ४ ।।

॥ ओंवी ॥

होवोनिया बहू चाकित ॥ सीता चोहोंकडे पहात ॥ मनीं होत भयाभीत ॥ तों हनुमंत भेटला ॥ १ ॥

पद राग यमन ताल त्रिवट.

मारुती ह्मणे सीते ऐक माते ॥ सुखी रघुवीर किस्किंदेते ॥ ध्रु० ॥ रामकिंकर मी हनुमान ॥ आलों शोधार्थ तुझ्या जाण ॥ शोधिली लंका संपूर्ण ॥ कथुनी तिज हें वर्तमान ॥ बोले करुनिया तिसी नमन ॥ लागली क्षुधा मजलागोन ॥ चा० ॥ आज्ञा दे फलें हीं खायातें ॥ १ ॥

॥ आर्या ॥

प्रतिबंदीं असुरांच्या देऊं आज्ञा कशी तुला बोल ॥ काळासि दंडिते हे उद्यानीं दैसरे पहा सकल ॥ १ ॥

श्लोक पृथ्वी वृत्त.

महीवरि पडे क्षुधें बहुत व्यापिलों बोलुनी॥अहा !! रघुविरापती कथिल कोण हो जाउनी ॥ तुझें सकल वृत्त,हें आयकुनी वदे जानकी॥गळूनपडलीं फळें त्वरित घेउनी खायकीं ॥ १ ॥

मा० प० मारुती ह्मणे सीते:—

वृक्षातळीं पडल्या फळांला ॥ घेइवेंचून भक्षायाला ॥ कथितां उपडित वृक्षांला ॥ पाडित झोडुनिया फलांला ॥ असुरा श्रुत हा वृत्तांत जाहला॥ आले आरडत त्या ठायाला ॥ चा० ॥ बसे मारुति तों फलाहारातें॥२॥

ओव्या.

असुर पुसत कपींद्रा ॥ कोण दुष्टा तूं वनचरा ॥ मृत्यूभय सोडोनि पामरा ॥ विध्वंसिसी यावना ॥ १ ॥ नदेतां त्या प्रतिवचन ॥ पुच्छें सर्वांसी बांधून ॥ देउनी समुद्रीं फेकून ॥ मारी सैन्यसह जंबुमाळी॥२॥ वृत्त कळे हें दशाननासी ॥ कोपोनीया तो बहू मानसीं ॥ बोले काय प्रधानांसी ॥ गर्वेकरून बहूत ॥ ३ ॥

पद राग भूपकल्याण ताल एका.

बहु कोपें रावण दांत खात सभें कर्करा॥सेवकांसि आणा ह्मणत ध-

रुनि वानरा ॥ ध्रु० ॥ अतिकायासह पाठवीत सात सुतांसी ॥ दळसह ते आले धरायासि वायुसुतासि ॥ निर्भच्छना करीत पाहोनीया तयांसी ॥ चा० ॥ वधित कपी सैन्यसहित सातकुमारां ॥ १ ॥ पित्राज्ञा घेउनि इंद्रजीत त्वरें निघाला ॥ येऊनि वनीं मारुतीस पाश घातला ॥ तेणें बळें इंद्रजीतपाश तोडिला ॥ चा० ॥ इंद्रजीत विवरिं दडत कांपे थरथरा ॥ २ ॥ प्रार्थोनि रावण धाडी वनीं मग विधीते ॥ जावोनि तेणें स्तउनि धरिला वायुसुताते ॥ बांधोनि पाशिं आणित त्वरें त्यास सभेतें ॥ चा० बोले रावण राग येउनि काय कपींद्रा ॥ ३ ॥

### मा० प० रामदास बलाढ्य:—

रामदास मी आलों मूढा सिताशुद्धीतें ॥ पुत्रसह तव सैन्य वधिलें लाज न तुंते ॥ मारितों तुज परि न आज्ञा दिली रघुनाथें ॥ चा० ॥ उमज स्वहित जाय तूं बा शरण रामाला ॥ २ ॥

### मा० प० बहु कोपें रावण दांत:—

बडबड कशास करिसि रे विसरुनिया मरणा ॥ बोले असुरां वानरासि धरुनिया आणा ॥ मारितां असुर थकले कळे हें दशानना ॥ चा० ॥ वज्रदेही नलागे घाय वायुकुमरा ॥ ४ ॥ देखोनि असें मारुतीस पुसिलें रावणें ॥ न होय तुझें रोम वक्र असुरघायानें ॥ रामशपथ तुजसी सांग मरसि कशानें ॥ चा० ॥ बोले विष्णुदास कपी काय पुढारां ॥ ५ ॥

### मा० प० रामदास बलाढ्य:—

नोहे योग्य हें बोले मारुति तूजलागोन ॥ स्वामीची मज आण घालिशि कथितों ह्मणून ॥ पुच्छीं आहे मरण माझें करी हें दहन ॥ चा० ॥ वस्त्रें वेष्टुनि तैल घालुनि लावा अग्नीला ॥ ३ ॥

### घनाक्षरी.

त्वरित वस्त्रें मिळऊन ॥ वेष्टित पुच्छ हनूमान ॥ लंका होत वस्त्रहीन ॥ परी पुच्छ ऊघडें ॥ १ ॥ दशानना हनूमान ॥ ह्मणे सर्व वेष्टिल्यावीण ॥ पावे कदा न मरण ॥ मग तो काय आज्ञापी ॥ २ ॥ अशोकवनीं जाऊन ॥ सीता वस्त्ररहित करून ॥ आणा वस्त्रें त्वरें क-

रून ॥ काय तों कपी करीत ॥ ३ ॥ स्वपुछासि अकर्षीत ॥ पाहुनि असुर आनंदीत ॥ तैल घालुनि पेटवीत ॥ परि न पेटे पुच्छ तें ॥ ४ ॥

॥ ओव्या ॥

न पेटे पुच्छ पाहोन ॥ पुसे उपाय दशानन ॥ तों त्यास हनुमान काय बोले आयका ॥ १ ॥ फुंकी दशवदनें करून ॥ ऐकोन फुंकी असुर अग्न ॥ तों दाढीमिशा होतां दहन ॥ लज्जें तेथून पळाला ॥ २ ॥

**पद राग पिलु ताल धुमाळी.**

स्वामिकार्जीं अनुरक्त बली हरी ॥ जाळित लंकानगरी ॥ ध्रु० ॥ मारुतिनें त्या सभेमाजी चमत्कार बहु केला ॥ दीनपणें राक्षसा बहातसे स्वपुच्छ विझवायाला ॥ धाउन कवटाळुन जाळी तो सभेमाजि कैकांला ॥ चा० ॥ पहावया मानसा निचेष्ठित पडला भूमिवरी ॥ १ ॥

॥ ओवी ॥

ऐसें पाहोनिया असुर ॥ रावणा कळविती समाचार ॥ आमुचा घायें मेला वानर ॥ रावण त्यांस गौरवी ॥ १ ॥

**मा० प० रामदास बलाढ्यः—**

जाळि असुर मारुती मग पुच्छि बांधोन ॥ येतां पूरामाजि राक्षस पळत भीऊन ॥ भलति स्त्री आलिंगि भलत्या रक्षि ह्मणून ॥ चा० ॥ दासविष्णू ह्मणे बहु दे त्रास नगरीला ॥ ४ ॥

**मा० प० स्वामिकार्जीं अनुरक्तः—**

जाळितांचि लंकेतें जन ते त्रस्त बहूतचि होती ॥ कोलाहल माजला चहुंकडे भयें सर्व घाबरती ॥ पवनसहायें अग्निशिखा त्या अंबर गिळुं धावती ॥चा०॥ कडकड भडभड शब्द होतसे जळतां लंकानगरी ॥२॥ जाळुनि लंका तीन भाग मग स्वपुच्छ विझवायातें ॥ आला सागरतीरीं पाहुन काय वदे तो त्यातें ॥ जलचर मरतिल बैस कडेवर लाटेनें पुच्छातें ॥ चा० ॥ विझवीतों, ऐकुन मग टाकी स्वेद पुसुनि सागरीं ॥ ३ ॥ गीळितां स्वेद मगरीनें झाली सागरिं ती गर्भीण ॥ स्वपुच्छ विझतां पाहे कपी तो लंकेकडे वळून ॥ जळेल सीता ह्मणुनि शांतउन अग्न येत हनुमान ॥ चा० ॥ विधी गृहातें, विष्णुदास ह्मणे स्तवि तो त्यातेंभारी ॥४॥

### पद राग काफी ताल त्रिवट.

काय बोले त्यास मारुती ॥ जो अतिप्रिय सीतापतीप्रती हो ॥ध्रु०॥ न सांगावी हे चतुरानन स्वमुखें आपुली स्तुती ॥ ह्मणुनि वृत एथें झालें द्या पत्रिं लिहुन मजप्रती ॥ १ ॥

॥ आर्या ॥

स्तऊनी त्या विधि देई स्वहस्तें लिहुनि पत्र रामासी ॥ झालें लंकेमाजी वृत्त सकल स्तवुनिया कपेंद्रासी ॥ १ ॥

### मा० प० काय बोले त्यास मारुती:--

अशोकवानें विधि आज्ञा घेऊन येत त्वरित मारुती ॥ करजोडुनिया पुसत तयातें विनयें सीतासती ॥ २ ॥

### पद राग खमाज ताल त्रिवट.

कधिं आणशिल रघुविर लंकेला ॥ स्फुंदत बोले सिता मारुतिला ॥ ध्रु० ॥ होतें चिंतें मन दुःखित झालें ॥ कीं पावकें तुजलागी गिळिलें ॥ चिंतेरहित आतां मम मन झालें ॥ चा० ॥ भेटविशिल कधीं प्राणप्रियाला ॥ १ ॥

### मा० प० काय बोले त्यास:--

हे सीते उदईक रघोत्तम आणितों सुवेळेप्रती ॥ मग मारुनि सेनेसह रावण सोडउं त्वरें तुजप्रती ॥ ३ ॥ खूण कांहिं दे जेणें वाटेल सत्य सर्व हें रघुपती ॥ वाट पहात मम स्वामि असेल दे आज्ञा जायाप्रती ॥ ४ ॥

### मा. प. कधिं आणशिल:--

ने हें वेणींतिल बोर खुणेतें ॥ गुप्त खूण सांग येतां वनातें ॥ वल्कलें नेसविलीं स्वहातें ॥ चा० ॥ सांग प्रिया मजसाठीं श्रमला ॥ २ ॥ रामासंनिध ... कपि तुज ऐसे ॥ असती बहुत बलिवंत कितीसे ॥ असाति असुर एथें पर्वत जैसे ॥ चा० ॥ चिंता असे ही माझ्या मनाला ॥ ३ ॥

### मा. प. काय बोले त्यास:--

ऐक सिते रघुवीरासंनिध बहु बाले कपि असती ॥ अगणित त्यांतिल पाहुनि मातें धाडिलें शुद्धीप्रती ॥ ५ ॥

**मा० प० कधि आणशिलः—**

बारे आतां तूं त्वरिताचे जाईं ॥ नमन कथी मम रघुविरपायीं ॥ त्वां
प्रियकरा आणि या ठायीं ॥चा०॥ सेनेसहित वदे विष्णुदासाला ॥ ४

**मा. प. काय बोले त्यासः—**

आज्ञा घेऊन सीतेचि निर्जरां शांतउनी मारुती ॥ विष्णुदास ह्मणे लं
गिरिहुनि उडत वायुपरिगतीं ॥ ६ ॥

**॥ ओव्या ॥**

येऊनिया मग मारुती ॥ भेटे आनंदें कपीप्रती ॥ त्यांनी विचारितां
प्रती ॥ समचार न सांगे ॥ १ ॥ तेथून निघाले सर्व जण॥वाटें वि
सिती सुग्रिवत्न ॥ मग रघुविरा नमून ॥ मूद, पत्र देतसे ॥ २ ॥

**पद राग झिल्हा झिंझोटी ताल त्रिवट.**

मम प्राणप्रीय सीता जनकदुहिता ॥ सुखी कीं सांग कोठें हनुम
॥ ध्रु० ॥ बहु कृश झाले असेल मम कांता ॥ मूद, काशि अ
हातां ॥ १ ॥

**पद राग कालंगडा ताल धुमाळी.**

मारुती ह्मणे ऐका प्रीयकर रघुपती ॥ लंकेंत तव प्रिया आहे
गुणवती ॥ ध्रु० ॥ तव स्मरणें वाचली प्राण नेत्रिं ठेउन ॥ बहु
हो जहाली ध्यास तुमचा लागुन ॥ तव अंगुलिमुद्रा झाले बाहुभूष
ऐका तेथिल वृत्त विधीपत्र वाचुन ॥ चा० ॥ बहुत्वरें वाहिलें खूण
देऊन ॥ १ ॥

**॥ गीत ॥**

आलिंगुनिया हनुमंतासी ॥ झाले बहु उवकार, मुदेसी ॥ हृदयीं घ
बोलत त्यासी ॥ भेटावि मज प्रिया ॥ १ ॥ कपी वदे ... गु
न आणिली हा अनय हातून ॥ झाला मग त्वरें उभा राहुन ॥
हो सिद्ध ॥ २ ॥ मग सांगोनी पुढील वृत्त ॥ राघव हनुमंतासि
रित ॥ वाचुनि विरंचींचें पत्र आश्चर्य करी ॥

**मा. प. मम प्राण प्रीयः—**

—न वर्तति कैसे ॥ सविस्तर मजासि आतां ॥ २ ॥

**मा. प. मारुती म्हणे ऐका:—**

लंकेंत सर्व जन सांबा भजाति निशिदिन ॥ होत होम घरोघरिं आणिक वेदाध्यायन ॥ कित्येक शिवालयिं बसति यती होउन ॥ जटामुकुट शिरावरि मौन्यध्यान धरून ॥ चा० ॥ नृपासह नगरिंजन सर्व असे वर्तती ॥ २ ॥

**मा० प० ममप्राणप्रीय:—**

ऐसे पुण्यशिल जन तेथील तरि ॥ कैशी येईल हातां ॥ ३ ॥

**मा० प० मारुती ह्मणे ऐका:—**

दयाक्षमा किमपि नसे ऐका स्वामि असुरांला ॥ अनुदीन जापिती कपटी कालमंत्राला ॥ गोद्वीजहत्येची क्षिती नसे त्यांजला ॥ ऐसे आहेत कुमार्गीं जन सहित नृपाला ॥ चा० ॥ विष्णुदास ह्मणे ऐकुन हें कोपे रघुपती ॥ ३ ॥

**मा० प० मम प्राणप्रीय:—**

ऐसा अनर्थ जरि लंकेमाजी ॥ सहज येइल जिंकीतां ॥ ४ ॥ विष्णुदास ह्मणे सुग्रिव झाला रामा काय कथिता ॥ ५ ॥

**॥ आर्या ॥**

बोले सुग्रिव रामा आहे उद्यां सुमुहुर्त जायासी ॥ लंकेतें, परिसुन हें झाला आनंद सर्व सैन्यासी ॥ १ ॥

**पद राग काफीजिल्हा ताल अर्धधमार.**

दास सुग्रिववचन तें मान्य केलें रघुनाथें ॥ विजयादशमिदींनीं निघतीं सैन्यासह मारावया दशवदनातें ॥ ध्रु० ॥ हनुमंतस्कांदिं रघुवीर बैसे रणरंगधीर ॥ अंगदस्कांदिं सौमित्र संगे सकल वानर ॥ करिती आनंदघोष वीर पाहुन सिंधूतीर ॥ चा० ॥ दळसह रघुवीर आले सिंधूतीरा श्रुत हो हें दशवदनातें ॥ १ ॥

**पद राग काफीजिल्हा ताल दीपचंदी.**

रावणसभें तों जाउनी बिभीषण बोधीत रावणासहीत प्रधान ॥ध्रु०॥ भलभलतें हें काय करिता तुह्मीं ॥ वचन माझें सीता द्या आयका तुह्मीं

शरण रिघा रघूकुलतीलका तुह्मीं ॥ चा० ॥ तरि सत्य मिळेल सुख, यश, कल्याण ॥ १ ॥

**पद राग लीलांबरी ताल धुमाळी.**

प्रहस्त बहु कोपला कोपला बोलत बिभीषणाला ॥ ध्रु० ॥ राजबंधु तुह्मि शतमुर्खाहुनि मूर्ख मला जाणवला ॥ फिरुनि बोलला विपरित जरि एथें वधीन मी तुझांला ॥ १ ॥

**मा० प० रावण सभें तों:--**

रघुविरशौर्य तुह्मा कोणाहि न नेणें ॥ चाप उरावरिलें काढिलें तेणें लंकादहन केलें एक्या हनूमानें ॥ चा० ॥ समजलें बळ तुमचें मजलागून ॥ २ ॥ मद्यप्राशक मति नाहीं तुम्हांसी ॥ कुलासह मूकवो-ता या प्राणासी ॥ शिणलों व्यर्थ बोधूनीया मी तुम्हांसी ॥ चा० ॥ प्रत्यया पूढें येईल हें वचन ॥३॥

**॥ आर्या ॥**

क्रोधाउनि मग रावण जातां मारावयास बंधूतें ॥ इंद्रजितें अवरीला परि लत्तेनेंचि झाडिला त्यातें ॥ १ ॥

**मा० प० रावण सभें तों:--**

जेष्ठबंधुसि वंदूनीया बिभीषण ॥ जातों ह्मणे शरण राघवालागून ॥ करुनी विचार प्रधानासह येउन ॥ चाल ॥ विष्णुदास म्हणे पुसे माते-लागुन ॥ ४ ॥

**साकी.**

बोले केकासि बिभीषणा रामा जा शरण ॥ ध्रु० ॥ एकांती स्वपुत्रा माता बोध करी बाहून दुष्ट समागम आणि दुर्बुद्धी देई रे सोडून ॥ १ ॥ रावण परिवारासह गर्वे न मानित तव वचन ॥ मिळेल त्याचें फल तयातें कुलक्षय होऊन ॥ २ ॥ सार्थक करि बा तूं जन्माचें मम उदरीं येऊन ॥ दास्यकरी रामाचें बा रे शरण तया जाऊन ॥ ३ ॥

**पद राग मोहनकल्याण ताल त्रिवट.**

या मातावचनाला बिभीषणाला आनंद झाला ॥ येत त्वरित प्रधानाते ॥ गुप्त आला

श्रीराघव जेथें ॥ विनवित दूर राहोनी वानरांतें ॥ चा० ॥ हस्तजोडून राहीला ॥ १ ॥

**आर्या.**

सचिवासहित बिभिषण रावण बंधू आला असे शरण ॥ इच्छित स्वामीदर्शन कथिती कपि राघवास येऊन ॥ १ ॥

**घनाक्षरी.**

करुनि मानसीं विचार ॥ सर्वां पुसत रघुवीर ॥ तंव तो अंजनीकुमर ॥ काय वदत राघवा ॥ १ ॥ असे भक्त बिभीषण ॥ स्वामि तुमचा तशांतून ॥ करिल विपरित वर्तन ॥ तरी वधुन टाकुंया ॥ २ ॥ मग धाडुनि अंगदास ॥ राम आणावि बिभिषणास ॥ येउनि राघवपायास ॥ मिठी घालुनि करि स्तुती ॥ ३ ॥

**रामस्तुतिगद्य ताल अर्ध धंमार.**

ताटिकांतक गर्वमोचक सिळोद्धारक यज्ञपालक बंदमोचक दिनोद्धारक असुरअंतक रघुविरा ॥ मी दीन चरणीं लीन तारिल अन्य तुजविण कोण राघवा ॥ दुष्टसंगति झालि मजप्रति क्षमा करि प्रिति दीन वागवा ॥ तव चरणावीण न आस रे मज खास हा तव दास जगिं या गाजवा ॥ १ ॥

**॥ कटाव ॥**

उठऊनी बिभीषणातें रघुराज काय त्या वदला ॥ ध्रु० ॥ कृपाहस्त मस्तकीं ठेउन ॥ चिरंजीव ऐसा वर देउन ॥ मानीतों तुज बंधुसमान ॥ लंकाराज्य तुज खास देइन ॥ रवी चंद्र असती तों जाण ॥ भुवरि असती, राज्यालागुन ॥ भोगिसील हें सत्यचि जाण ॥ श्रम झाले बा बहु तुजलागुन ॥ दुष्टाचे समागमेंकरून ॥ मग सिकतेची लंकाकरुन ॥ बिभीषणा बोलत हनुमान ॥ ठेवी ही तुजपाशीं गहाण ॥ सोडऊं ही तुज खरी देउन ॥ मग राघव कपिलागी बाहुन ॥ चा० ॥ ह्मणे हो लंकाधीप ह्मणत जा बिभीषणाला ॥ १ ॥

**॥ गीत ॥**

राघव पुसे बिभीषणाला ॥ कैंचे जावें पैलतिराला ॥ ऐकून हें बि-

भीषण रामाला ॥ काय बोलतसे ॥ १ ॥ मान देउनी प्रार्थि सिंधु
कथील तो हो मार्ग तुह्मांला ॥ सिंधुपार उतरून जायाला ॥ सब
हो स्वामी ॥ २ ॥ असनीं बैसुनिया रघुनाथ ॥ सिंधुतिरीं तप अ
भित ॥ तीन दीन होई पर्यंत ॥ सागर न भेटे ॥ ३ ॥

॥ ओव्या ॥

इकडे रावण शुकासुरास ॥ सांगे आज्ञा कथायास ॥ सुग्रिवातें ज
यास ॥ ईन्यासह स्वनगरा ॥ १ ॥ तो येऊन सुग्रिवास ॥ कथी
काउन जायास ॥ ह्मणे न मानाल या वचनास ॥ तरी दंडीन तुह्मांतें॥
राग येउन सुग्रिवातें ॥ हसडोनि पाडी राक्षसाते ॥ वल्गना कां
बहू त्याते ॥ वानरांनीं बांधिला ॥ ३ ॥

॥ गीत ॥

मग कोपोनी रघुवीर ॥ अटवाया सिंधू, अनिवार ॥ बाण काढि
ये सत्वर ॥ शरण रघुराया ॥१॥ क्रोधें राघव बोले त्यातें ॥ तीन
मार्गार्थ एथें ॥ वाट पाहिली बसुनि तपातें ॥ न कळे कां तुजसी॥

॥ अभंग ॥

क्षमाकरा देवराया ॥ लागे सिंधू राघव पाया ॥ पीडीले मज
दैत्यें ॥ सोडवा ह्मणे मारुनि त्यातें ॥ बाण राघवें सोडीला ॥ मुरू
त्याते मारीला ॥ आनंदोनी मग सागर ॥ मुकुटादी दे आल्कार
अव्हेरीतां रामें त्यातें ॥ घेववीत सर्व कपी ते ॥ मग पैलपार जाय
सांगे राघवा उपाया ॥ १ ॥

॥ आर्या ॥

बांधी सेतु नलाच्या हस्तें मुनिशाप हो असे त्यातें ॥ बोले न
रामा कीं तरतिल उपल कपिनला हातें ॥ १ ॥

पद राग कालंगडा ताल धुमाळी.

दास कीर्ति वाढवी रघुविर भक्त कीर्ति वाढवी ॥ धृ० ॥ गौरव
मग नलकपीला बोले काय तयाला ॥ तव हातें पाषाण तरती
दावी ॥ १ ॥ बांधुनि सेतू सिंधूवरती आज्ञा पैल बा ने
ह मग मारुतिते त्वरेंकरून बोलावी ॥ २ ॥ सांगे त्यातें

कपीते सहाय हो या कामीं ॥ हनुमंता जा त्वरेंकरोनी शिळा नळाते पुरवी ॥ ३ ॥

### पद राग झिंजोटी ताल धुमाळी.

आज्ञा करितां रघु पतिनें ॥ उडाला कपी त्वरित गतिनें ॥ धु० ॥ शिळा आणाया राघवकार्या भक्तशिरोमणि वानरगणसह ने ॥ केलें अघटित मारुतिनें ॥ १ ॥ रोमरोमावरि महानमहान गिरि उतरड्या रचुनिया वायुनंदनें ॥ आणिले नग बहु तातडिनें ॥ २ ॥

### ॥ ओव्या ॥

नळहातें शतयोजनें ॥ होतां श्वेतू, फुगे गर्वानें ॥ तों रात्रीं एका मच्छानें ॥ श्वेतू गिळूनी टाकिला ॥ १ ॥ दुसरे दिवशीं हें पाहून ॥ नळ जाई खिन्न होऊन ॥ तों हनुमंत त्या लागून ॥ ह्मणे फळ हें गर्वाचें ॥ २ ॥

### घनाक्षरी.

श्रुत हें होतां रामास ॥ आणवीत त्या मच्छास ॥ ठेववि सेतु स्वस्थळास ॥ नळा काय बोलत ॥ १ ॥ लिहि रा एका शिळेवर ॥ दुसरी वरि बा मकार ॥ जोडुनि सेतु सिद्धकर ॥ गर्व त्यजुनि वानरा ॥ २ ॥ जातां सेतू सिद्धीस ॥ वदे सुग्रिव रामास ॥ चला त्वरित सुवेळेस ॥ असुर खल वधार्थ ॥ ३ ॥

### मा० प० दास सुग्रिव वचनः—

दळ सह रघुनंदन जातश्वेतुवरोन ॥ हनुमंतस्कांदिं बसोन तैसा तो लक्षूमण ॥ अंगदस्कांदिं अरुढोन शस्त्रें अस्त्रें घेऊन ॥चा०॥ दळसह रघुपती ये सुवेळेप्रती श्रुत हो हें दशवदनानें ॥ २ ॥

### पद राग पिलु ताल धुमाळी.

इकडे रावण शुकसारणातें ॥ हेरूनि या ह्मणे राम सैनेतें ॥ मग ते धरूनी कपिवेशातें ॥ हिंडत रामसैनेत ॥ १ ॥ ओळखून बिभिषण तयातें ॥ ह्मणे पहाया वानरचमुतें ॥ फिरूनि तेथें नेऊनि रामातें ॥ सांगति सर्व दशवदना ॥ २ ॥ क्रोधा आनिया दशवदन ॥ चढे गोपुरीं पाहाया सैन्य ॥ तों त्याच्या छत्रछायीं झाकुन॥रामसैन्य हो गेलें ॥३॥

**मा० प० दास सुग्रिवचनः—**

राग येऊन लक्ष्मणास लाउनि बाण चापास ॥ टाकी छेदुनि छत्रास दचके रावणमानस ॥ चिंतीत येउनी सभेस काय प्रधानास ॥चा०॥ ह्मणे विष्णुदास बोले तयास उपाय सांगा कांहीं यातें ॥ ३ ॥

# रावणविटंबना आणि अंगदशिष्टाई.

**पद राग धनासरी ताल धुमाळी.**

पाहुनि सौमित्राचें शरसंधानातें ॥ न रूचे अन्नपान चैन न रावणातें ॥ ध्रु० ॥

**श्लोक उपेंद्रवज्रा.**

प्रधान बोले मग रावणाला ॥ न कां तुह्मी भोगिली जानकीला ॥ असोनि भीरू सकुमार भ्याला ॥ अहां कशाला तुह्मि सत्य बोला ॥१॥

**मा० प० पाहुनि सौमित्राः—**

मग प्रधानाप्रती बोले रावण ॥ विधिचा शाप मज आहे रे दारूण॥ बलात्कार परस्त्रीवरि करितां मरण ॥ चा० ॥ पावसिल ह्मणुनी मी विनवीलें आजवरि तीतें ॥ १ ॥

**श्लोक वसंततिलका.**

राजाधिराज कपटें शिर चाप तुह्मां ॥ देतों करूनि निकरें अनुरूप रामा ॥ हें दावितां जनकजेस निराश खिन्न ॥ होईल सत्य अनुकूल तुम्हां नमून ॥ १ ॥

**मा० प० पाहुनि सौमित्राः—**

विद्युजिव्हा वचन तें रावणाला ॥ मानवूनी घेई त्या शिरचापाला ॥ वस्त्राभरणें तयास गौरवीला ॥ चा० मग तो परिवारासह आला अशोकवनातें ॥ २ ॥ह्मणे गे सीते पहा या शिर धनुष्यास ॥ मारोनीया रामासी दावायास ॥ आणिलें, नोहे मिथ्या ओळख तूं यांस ॥ चा० ॥ सोडुनि मनिचा हेका ऐक आतां वरि मातें ॥ ३ ॥

## पद राग कालंगडा ताल धुमाळी.

रुदन करि सीता हो लोळत धरणीसि पाहुनी दुःखें बहु विपरित तें ॥ ध्रु० ॥ प्राणनाथाहो ॥ कसे शत्रुचे करीं तुह्मि अवचित आजि सापडला ॥ प्राणनाथा ॥ यश कसें देणें घडलें नकळे अहा ! शत्रूला ॥ प्राणना० ॥ कोण सोडवील आतां सांगा येथुनि मजला ॥प्राणना०॥ आणि दोष कसा आणिला तुह्मि वाल्मिकिवचनाला ॥ प्राण०॥ कसें सौमित्रे संकटीं त्यजिलें तरि आपणाला ॥ प्राण० ॥चा०॥ वदा मातें ॥ लोळतधर० ॥ १ ॥ हे लंकेशा रे ॥ दैवगतिपरी जाहलें प्राप्त मज लागून ॥ हेलंके० ॥ त्वरित सहगमनसिद्धता द्यावि मला करून ॥ हेलंके० ॥ तुह्मी जनकासम माझा हेतु करा हा पूर्ण ॥ हेलंके० ॥ कुबुद्धी सोड आतां ती वर्त सुमार्गेकरून ॥ हेलंके० ॥ पुढें मम वचन लागेल बहु गोड अमृताहून ॥चा०॥ हे पापमते ॥ लोळत० ॥ २ ॥

## घनाक्षरी.

रावण सीता न वश होत ॥ पाहुनि, स्वप्रिये विनवीत॥बोध करूनी त्वरीत ॥ जानकीस वश करी ॥ १ ॥ मैजा बहुत बोधकरून ॥ करी त्याचें निवारण ॥ परि न ऐके पाहून ॥ अशोकवनीं निघाली ॥ २ ॥

## ॥ गीत ॥

इकडे जानकी मनीं दुःखित ॥ पाहुनि शर्मा तिज शांतवित ॥ ह्मणे राघव सुवेळेंत ॥ सुखी आहे बाई ॥ १ ॥ मम प्रिय गेला त्यातें शरण॥ कपट सर्व कथिलें त्या लागुन ॥ असुर आतां गे निर्दाळूण ॥ सोडवील तूंतें ॥ २ ॥ होवो तव सोन्याची वाचा ॥ करविन स्वामी तव, पति साचा ॥ सत्यचि शर्मे या लंकेचा ॥ जानकी बोले ॥ ३ ॥

## ॥ ओवी ॥

मैजा येऊनि अशोकवनीं ॥ जनकजेस नमन करुनी ॥ वदे काय तिजलगोनी ॥ मोहक मृदू वचनें ॥ १ ॥

## पद राग झिंजोटी ताल दीपचंदी.

कारि बोध मैजा सीतेसी ॥ हो वश दशवदनाशी ॥ ध्रु० ॥ सर्वां घटीं रघुविर व्यापक तरी ॥ द्वैत न धरि रावणाशीं ॥ १ ॥

**पद राग पिलु ताल त्रिवट.**

न वद विपरित ऐसें बोलत सीता मैजेप्रती ॥ ध्रु० ॥ सर्वां घटीं रघुविर व्यापक जरि ॥ मानावें सम कैसें ॥ १ ॥

**मा० प० करि बोध:—**

सुरवर सेवक संपत्ती अगणित ॥ कां न मानवती ते तुजसी ॥ १ ॥

**मा० प० न वद विपरित:—**

तव पति संपति क्षणिक सर्व असे ॥ राघवसाम्य त्या नसे ॥ २ ॥

**मा० प० करि बोध:—**

मम पतिशीं युद्धीं राघव नटिके ॥ वरी सखे गे प्रियासी ॥ ३ ॥

**मा० प० नवद विपरित:—**

व्यर्थ पातकीं कां पडसि प्रिये तूं ॥ बोलुनिया ऐसें ॥ ३ ॥ विष्णुदास ह्मणे धि:कारुनि तिस ॥ राघवध्यानीं बसे ॥ ४ ॥

**मा० प० करि बोध:—**

विष्णुदास ह्मणे मैजा उमजुनि मनीं ॥ जात त्वरें स्वग्रहासी ॥ ४ ॥

**॥ आर्या ॥**

होउनि लज्जित मैजा सांगे येऊनि रावणा सीता ॥ न वश हो प्राणांतीं करुनि फुका श्रम उगाच कां दमतां ॥ १ ॥

**॥ ओवी ॥**

मग रामसैन्य पहायाते ॥ रावण चढे गोपुरावरते ॥ तों कपिसह राम लंकेतें ॥ पहाया बैसे सुवेळीं ॥ १ ॥

**घनाक्षरी.**

येऊन कोप सुग्रिवास ॥ उडुनि धरुनि रावणास ॥ करुनि मल्लयुद्ध त्यास ॥ जर्जर करुनि पाडित ॥ १ ॥ देतां ह्रदयिं मुष्टिघात ॥ पळे भिउनि रावण आंत ॥ उडुनि तेथुनी त्वरीत ॥ स्वदळांत मिसळला ॥ २ ॥ नंतर सुवेळेवरून ॥ सर्व खालीं उतरून ॥ कारिति विचार मिशिं युद्धाचा ॥ ३ ॥

॥ आर्या ॥

बोले बिभीषण रामा शत्रूते प्रथम सामदामाहीं ॥ वळवावा मानि न तरि दंडावा मग त्वरीत त्वलाही ॥ १ ॥

### पद राग जिल्हाकाफी ताल त्रिवट.

रघुवीर जो रणधीर बिभीषणा काय बोलतसे ॥ ध्रु० ॥ काढी यांतुन एकाद्यास सूज्ञ बली वानरास ॥ समयोचित संभाषण कराया जो योग्य असे ॥ १ ॥ हुडकोनीया अंगदास रावणा शिष्टाईस ॥ योजीतां बिभीषणास राम ह्मणे योग्य असे ॥ २ ॥ गौरवूनीं अंगदास आज्ञा होतां जायास ॥ वंदोनीया चरणास लंकेकडे जात असे ॥ ३ ॥

### पद राग सिंधकाफी ताल धुमाळी.

वंदूनी रघुवीरा तो अंगद वीर आला लंकेला ॥ ध्रु० ॥ सभेमध्यें करूनी पुच्छासन ॥ त्यावरि बैसुन बोलत गर्जुन ॥ पुसत न कोणि मज खल तुह्मि दुर्जन ॥ चा० ॥ आलों बोधायाला ॥ १ ॥ रावणा सीता दे सुवेळेस जाउन ॥ माग अयुष्य रामा जाउन शरण ॥ सुख न लागे कोणा रे विष खाउन ॥ चा० ॥ वाचवि स्वकुलाला ॥ २ ॥

### पद राग खंमाज ताल धुमाळी.

आला बहू कोप रावणाला ॥ धरा धरा ह्मणत अंगदाला ॥ कोठिल हा मर्कट करितसे कटकट बोलत सभे उद्धट मारा धरूनि याला ॥ ध्रु० ॥ ह्मणें तूं मर्कट कोठिल रे ॥ वनांतिल पालेभक्षक रे ॥ बोधकरूं आलास मजसी रे ॥ व्यर्थ वर्णिशी स्वामिला रे ॥ नर वानर ते समरीं रे ॥ असती भक्ष्य आमुचे रे ॥ चा० ॥ समज जानकी फिरूनि राघव न पडेल दृष्टिस सांग जाउन त्याला ॥ १ ॥

### मा० प० वंदुनी रघुविरा:—

केलें स्नान तुज कक्षीं धरून ॥ टांगिला होता मम पाळखें नेउन ॥ ज्याणें, पिता तो वाली मम जाण ॥चा०॥ अंगद ह्मणाति मला ॥ ३ ॥

### मा० प० आला बहु कोप:—

अंगदा व्यर्थ वाचलासी ॥ पिसाचा सूड तूं न घेसी ॥ पड येउन मम

पृष्ठीसी ॥ शिक्षा करिन मानवांसी ॥ लाजहीन सेवा तूं करिशी ॥ सु-
ग्रिवा देउनि मातेसी ॥ चाल ॥ काल एक वानर जाळुनि नगर पळुन
गेला दूर सांग कोण चोर मला ॥ १ ॥

**मा० प० वंदुनी रघुविरा:--**

असुरा सृष्टिपालक जो रघुविर ॥ आज्ञाधारक त्याचा मी किंकर ॥
ज्यास ध्यात तो सदा दिगंबर ॥ चाल ॥ मूर्खा नुमजे तुला ॥ ४ ॥
रावणा मृत्यु तव समीप आला ॥ ह्मणुनि न मानिशि मम वचनाला ॥
मूर्खा स्वहित कळेना तुजला ॥ चाल ॥ दंडचि योग्य तुला ॥ ५ ॥

**मा० प० आला बहु कोप:--**

दशानन बोले प्रधानांतें ॥ मारा धरूनिया मर्कटातें ॥ काय केलें तों
वालिसूतें ॥ झोंबुनि रावणअंगातें ॥ घेउनि मुकुट, मंडपातें ॥ असुरसह
उडत आकाशातें ॥ चाल ॥ उडुनि त्वरित गातें येउनि कपी बालि
विष्णुदास वंदीत रघूपतिला ॥ ३ ॥

**मा० प० वंदुनी रघुविरा:--**

मारूनि बहु असुरांतें येउन ॥ सांगे वृत्त सर्व रामालागुन ॥ विष्णुदास
ह्मणे युद्धावांचुन ॥ चाल ॥ उपाय न याला ॥ ६ ॥

**मा० प० रघुवीर जो रण:--**

रावणमुकुट मग घालुनी बिभीषणास ॥ ह्मणे त्वरीत होसी तूं लंकाधीष
असें ॥ ४ ॥ ठेउन ये लंकेस अंगदा या मंडपास ॥ हवा हा बिभीष-
णास पुढें, राम सांगतसे ॥ ५ ॥

**॥ ओवी ॥**

अंगद येत मंडप ठेऊन ॥ कपीदळ मग सिद्ध करून ॥ लंकेवर
जाय क्रोधाऊन ॥ रघुराज वीर तो ॥ १ ॥

---

## धूम्राक्ष, वज्रदंष्ट्र आणि प्रहस्तवध.

**पद राग झिंजोटी ताल एका.**

"परंगधीर कोपुनीया बोलला ॥ सुग्रिवादि सर्व बलिवंत

कर्पाला ॥ ध्रु० ॥ काय पहातां खरें सर्व तुह्मीं जाउनि लंकेला ॥ गा-
जोनि बहुत रावणासी आणा युद्धाला ॥ ऐकुनी हें गर्जत निघत कपी
चढुनि कोपाला ॥ चाल ॥ पीडीत मार्गि असुर येत सर्व लंकेला ॥१॥

### पद राग मल्हार ताल धुमाळी.

वानरदल कोपुनी लंकेवर सैरा धावती ॥ वृक्षाशिळा फेंकित बहु ज्यांची शेषा न हो गणती ॥ ध्रु० ॥ परिघावरिल असुरांतें देती खंदकांत ढकलून ॥ असुरांच्या तोफा हिरोनी मारिति त्यां उटटून ॥ शिरुन नगरिं लाविति अग्नातें चुड्या हातीं घेऊन ॥ चाल ॥ कोलाहल ऐकुनी दशानन चढला गोपुरावरतीं ॥ १ ॥

### पद राग गौडसारंग ताल धुमाळी.

पहातां हा दुर्धर प्रसंग आला ॥ दशानन कोपला, मारोनी प्रखर अस्त्रें पळवी शत्रूसैन्याला ॥ ध्रु० ॥ मेघास्त्र सोडुनि मग समंत्रक तें विझवित अग्नातें ॥ सिद्ध मग करुनिया स्वदळातें धाडित युद्धातें ॥ धूम्राक्षसह अगणित रजनीचरते आले समरातें ॥ चाल ॥ कपि तों शिळामेघ वर्षुनी मारिती त्या सर्व दळाला ॥ १ ॥

### ॥ ओव्या ॥

मग धूम्राक्ष पुढें आला ॥ शरें खिळिलें कपी गणाला ॥ मारुती पाहून हें कोपला ॥ पर्वत हणी त्यावरी ॥ १ ॥ तेणें धूम्राक्ष पावे मरण ॥ तो वज्रदंष्ट्र आणि अखूपण ॥ मारिलें अंगदें पर्वत फेंकून ॥ कळतां रावण दुःख करी ॥ २ ॥

### घनाक्षरी.

इंद्रजीत तों पित्यास ॥ ह्मणे आज्ञा द्या दासास ॥ मारुन येतों मी तयांस ॥ रावण आज्ञा त्यास दे ॥ १ ॥ येत दळसह मग रणीं ॥ रथावरि आरूढोनी ॥ करित युद्ध भीडोनी ॥ देव पहात विमानीं ॥२॥

### ॥ कटाव ॥

रघुराज आणि इंद्राजित दळसहीत शौर्यें लढती ॥ ध्रु० ॥ जंबुमाळि धरिला हनुमंतें ॥ तसें सुग्रिवें विद्युन्माळितें ॥ मारित नळ जंघासुरातें॥ दिनमणि तो गेला अस्तातें ॥ कोणी कोणा दिसाते न तेथें ॥ तों

रवि येत पुन्हा उदयातें ॥ केलें अघटित इंद्रजीतें ॥ नेउन मेघाअ रयातें ॥ बाण मारि बहु कपीगणातें ॥ चिंता पडली रघुनाथातें ॥ र्पअस्त्र प्रेरुनि सर्वांतें ॥ निचेष्टीत पाडिलें इंद्रजितें ॥ करीत मग जयघोषातें ॥ भेटे येउन दशाननातें ॥ गौरवीत रावण तयातें ॥ येउ मग अशोक वनातें ॥ बोलाउनिया त्रीजटेते ॥ ह्मणे विमानीं घालु सीते ॥ दावी नेउनि रणांगणातें ॥ पाहुनि विपरित खिन्नमना ते होउनि सहजी होइल मातें ॥ वश असें सांगतां तियेतें ॥ पुष्पकिं घ लुनिया सीतेतें ॥ रणांगणीं आणोनि तियेते ॥ दावित दळसह रघुराय ॥ चाल ॥ शोक करी दुःखें करुनी पाहुनि तें जानकी ती ॥ १ ॥

**मा० प० रुदन करि सीता हो:—**

निराशा केलि प्रिया अहा ! सांगा माझी कैशी ॥ त्यजिलें कां मजसी दुष्ट असुरांहातिं देऊन गेला मज कैशी ॥ त्यजिलें० ॥ कोण सोडवी सांगा प्रिया तरि आतां मजसी ॥ त्यजिलें० ॥ जर्जर केलें सर्पास्त्रे अ सुरिं कसें आपणासी ॥ त्यजिलें० ॥ पाहुन विपरित रणिं जानकी दुःखित मानसीं ॥ चाल ॥ करि शोकातें ॥ २ ॥

**पद राग कानडची बहार ताल त्रिवट.**

शोक तूं न करी जानकी माये बोले शर्मा समजाउन तीतें ॥ध्रु० सावध होतिल सर्व आतां निवारण होवोनीया असीत तें ॥ १ ॥ पर आणोनी अशोकवनीं, जावूनी वश न हो सांगे रावणातें ॥ २ ॥

**॥ अभंग ॥**

बिभीषण मग मारुती ॥ पुसे आतां कैशी गती ॥ १ ॥ वदे का तों सुषेण ॥ आणा त्वरें गिरिद्रोण ॥ २ ॥ करितों सावध क्षणांत मारुती तों काय करित ॥ ३ ॥ गरुडमंत्र रामा सांगत ॥ जपतां उनि ते त्वरीत ॥ ४ ॥ सर्व सर्पांतें भक्षीत ॥ सैन्य सर्व सावध हो ॥ ५ ॥ आनंदोनी रघूनाथ ॥ काय कपींतें बोलत ॥ ६ ॥

**घनाक्षरी.**

उठा सर्व कपी वीर ॥ जाळा लंका मारा असुर ॥ आज्ञा हो कोधें सर्व धावती ॥ १ ॥ त्वरित येउनि लंकेंत ॥ केल्हो

माजवीत बहुत ॥ तंव तो जाउनी प्रहस्त ॥ बोले काय रावणा ॥२॥ आज्ञा द्या या दासास ॥ मारितों जाउनि शत्रूंस ॥ देतां रावणें आज्ञा त्यास ॥ समरीं वीर निघाला ॥ ३ ॥

मा० प० पहातां हा दुर्धरः—

रावणें गौरउनी प्रहस्तातें ॥ धाडिला युद्धातें ॥ आला बहु सैन्यासह रणातें ॥ बिभिषण रामातें ॥ सांगे योजा हो या समरातें ॥ बलवंत नळातें ॥ चाल ॥ धाउनी तो आज्ञा होतां मारी धरुनीया त्याला ॥२॥ पडला प्रहस्त तों रावणातें ॥ कळलें वृत्त तें ॥ करुनी अति शोक रणांगणातें ॥ सिद्ध घेउनी दळातें ॥ निघत रघुवीराशीं युद्धातें ॥ हो श्रुत मैजेतें ॥ चाल ॥ येउनी विनवी न पती जावें त्याशीं युद्धाला ॥ ३ ॥

## कुंभकर्ण, पराषद, अतिकाया, शोणिताक्ष, विशालाक्षादि असुरवध.

पद राग पिलु ताल दीपचंदी.

मैजा कथीत पतीसी न ये यश न जावें युद्धासी ॥ ध्रु० ॥ स्वामी उमावर त्या प्रिय रघुवीर जपत सदा तो त्यासी ॥ १ ॥ जाळीली ही लंका एक्याच कपिनें विटंबूनी सर्वांसी ॥२॥ त्याच हनूमंतें कथितां सीताशुद्धी आला तो युद्धासी ॥ ३ ॥ रघुवीरविक्रम ठावा न काय सीतास्वयंवरीं हो तुम्हांसी ॥ ४ ॥

पद राग परज ताल त्रिवट.

वाचुनी काय सौख्य गे मजसी ॥ध्रु०॥ पूर्ण जाणत मी रघुरायासी ॥ सत्य असे जें तूं सांगसी ॥१॥ युद्धकामना धरुनि मानसीं ॥ आला असे तो लंकेसी ॥ २ ॥ समर करुनियां यश मिळवाया ॥ जातों रणांगणासी ॥ ३ ॥ नरवानर ते भक्ष्य आमुचें ॥ कां उगी त्यां तूं भीसी ॥ ४ ॥

मा० प० मैजा कथित:—

विष्णुदास ह्मणे निरुपाय होऊनी ॥ मैजा जात गृहासी ॥ ५ ॥

## पद राग यमन ताल अर्धधंमार.

सिद्ध करुनी दळासी येत रावण युद्धासी ॥ संगे असुरवीर आरुढत विक्राळ आला समरभूमीसी ॥ ध्रु० ॥

## ॥ ओव्या ॥

मग पाषाणवृष्टी वानर ॥ करिते झाले रावणावर ॥ तेणें एक्या बाणें समग्र ॥ चूर्ण करुनी येत पुढें ॥१॥ तों रामा बोले बिभीषण ॥ पहा सेनेसह हा रावण ॥ येत गर्वें युद्धालागून ॥ लक्ष्मण तों काय वदे ॥२॥

## ॥ आर्या ॥

द्या आज्ञा युद्धाची विनवित सौमित्र रामभद्रासी ॥ मिळतां रामानुज्ञा बाणें वधि तो दशास्यअसुरांसी ॥ १ ॥

## मा० प० सिद्धकरुनी दळासी:—

योद्धा अनिवार रावण वारि सौमित्र बाण ॥ शक्तीप्रेरि वेगें करुन छेदी ती तें लक्ष्मण ॥ कांहीं अंश तों तींतून मुर्छित पडे लागून ॥ मुष्टी ओपीत रावण पाहुन क्रोधें हनूमान ॥ लत्तें ताडीतां रावण जाय ओकत तेथून॥ पुन्हा सावध होऊन बहूत क्रोधाऊन ॥चा०॥ आला समरा रामाशीं ॥१॥

## मा० प० रघुवीर रणरंग:—

खळा मूढा रावणा स्वहित कैचें उमजेना तूंतें ॥ सुह्रदांसि भेटुनि भोग-भोगुन मग समरातें ॥ ये ऐसें ऐकतां रावण निघुन गेला लंकेतें ॥चा०॥ कृपाहस्तें मग रामें बंधुस उठविला ॥ २ ॥

## सारिकाछंदा ताल धुमाळी.

रावण शोकाकूलखिन्न ॥ पाहुन बोलति त्या प्रधान ॥ उठवावा आजि कुंभकर्ण ॥ संकट हरील आपलें ॥ १ ॥ मानउनि हें रावणाते ॥ आज्ञा करीत प्रधानांतें॥घेउनि मद्य मांस संगाते ॥ उठऊं जाती कुंभ-कर्णा ॥ २ ॥ न हो जागा कुंभकर्ण ॥ अप्सरांतें मग आणऊन ॥ सुस्वरगायन करऊन ॥ तयालागी उठविलें॥ ३ ॥जागा होतां आ पस-रीत ॥ मांस मद्य सर्व भक्षण करित ॥ उठोनिया मग नेत्र पुसीत॥काय त्यातें बोलला ॥ ४ ॥

**पद राग जोगी ताल त्रिवट.**

काय कुंभकर्ण बोलला मेघ जैसा गर्जला सुटे कंप धरणितरणी-ला ॥ विशाल भयानक मद्यमांसभक्षक पसरुनि वदनाला ॥ध्रु०॥ काय पृथ्वी जाती रसातळा ह्मणुनीया मजप्रती सांगा तुह्मीं उठवीलें ॥ किंवा कोणी शत्रू लंकेवरी आला सांगा नृपावरी काय संकट पडलें ॥ किंवा पृ-थ्वी घाली पाताळीं आला कोणी ऐसा बळी ह्मणुनीया उठवीलें ॥चा०॥ ब्रम्हांड गिळिन आतां क्षणही न लागतां सांग प्रधाना मजला ॥ १ ॥

**सारिकाछंद ताल धुमाळी.**

कुंभकर्णा बोले प्रधान॥ आणिलि सिता रावणें चोरून ॥ तेणें रामा राग येउन ॥ आला युद्धा लंकेसी ॥ १ ॥ प्रहस्तादि असुर मारून ॥ केला पराजीत दशवदन ॥ तुह्मां उठवावें ह्मणून ॥ तेणें आम्हां धाडिलें ॥ २ ॥ येउनि कोप कुंभकर्णातें ॥ निघे जाया रणांगणातें ॥ तंव ते प्रधान सांगति त्यातें ॥ राजदर्शन घ्या आधीं ॥ ३ ॥ मान्य करूनी वचन निघाला ॥ वानरिं प्रचंड पाहुनि त्याला ॥ भिउनि पळतीं दशदिशांला ॥ तों हनुमान काय करी ॥ ४ ॥ कुंभकर्णातें उचलून ॥ ह्मणे द्यावा या फेकून ॥ विचार मानसीं तो येऊन ॥ बोले काय कपींद्र ॥ ५ ॥ फेकिन जरी सुवेळेवरते ॥ होईल चूर वानरदळ तें ॥ टाकिन या जरि लंकेवरते ॥ स्थळ न पुढें बिभीषणा ॥ ६ ॥ ठेवित मग तयातें खालीं॥तेणें वानरभीति पळाली ॥ पाहुनि रामें हें त्या काळीं ॥ मारुतीतें स्तवीत ॥ ७ ॥

**॥ ओवी ॥**

येऊनि मग कुंभकर्ण ॥ जेष्ठ बंधूलागी नमुन ॥ ह्मणे संकट मज लागून ॥ सांगा काय आजि आलें ॥ १ ॥

**पद राग जिल्हाकाफी ताल दीपचंदी.**

काय बोलला रावण चिंतें दुःखित मनें बलीवंत कुंभकर्णासी ॥ बंधूराया आतां गती न बरवी वाटे या लंकेची रे मजसी ॥ ध्रु० ॥ म्या आणिली सिता हें कळतां रघूत्तमा दळसह आला तो सूवेळेसी ॥ जाळोनीया लंका त्यांनीं वधिले असुर बहू प्रधानपुत्र प्रहस्तासी ॥ काल अपजय आला मज ह्मणोनीया ऊठवीलें बा तूजसी ॥ चा० ॥ निर्दाळीं रघुवीर भक्षी वानर जाई त्वरें समरभूमीसी ॥ १ ॥

### मा० प० काय कुंभकर्णः—

राम परब्रह्म आदितात शिव ज्यास सदा ध्यात वैर त्यासीं कां जोडिलें ॥ घडूं नये ऐसें घडलें परी सीतेलागी आजवरीं कां न त्वां भोगिलें ॥ रामाविणें इतरांस वश हो न तरी खास धरूनि कपटवेश जा बोले ॥ चा० ॥ राघवरूप धरिल्यावरी दुजी स्त्री मातेपरी वाटत रावण वंदला ॥ १ ॥

### मा० प० काय बोलला:—

मारी बंधू आतां जा रामसौमित्रां मग ती सीता वश होय मजसी ॥ तैसे रणरंगधीरा भक्षून टाकी सैनेतील सर्व वानरांसी ॥ आज्ञा घेऊनी कुंभ- कर्ण दळसह नीघून भेरी ठोकित आला रणभूमीसी ॥ चा० ॥ पाहुनी असुरदळ कपीवीर सकळ पाषाणवृष्टी बहु करीती ॥ २ ॥

### मा० प० वानरदळ कोपोनीः—

कुंभकर्ण असुरावरि वानर हाणिती शिळातरुतें ॥ केले पिष्ट सर्वहि ते असुरीं मारूनि मुष्टीतें॥देखुनि मारुति प्रचंड नग दे फेकुन त्या वरतें॥ ॥ चा० ॥ कुंभकर्णें हाणितां मुष्टीतें मुर्च्छित पडला मारुती ॥ २ ॥ पुन्हा कोपोनी असुरां हाणिती पर्वत बहु वानर॥तैसा घेउनि धांवे गिरी तो सुग्रिव महावीर ॥ कुंभकर्णें धरियला तयातें पसरूनि द्वयकर॥चा०॥ मारूनि कक्षेमाजीं त्यातें जायी लंकेप्रती ॥ ३ ॥

### ॥ ओव्या ॥

कक्षेतून सुग्रिव निसटून ॥ असुर स्कंदावरी बसोन ॥ नासीक कर्ण त्याचें तोडून ॥ उडोनी जाय आकाशीं ॥ १ ॥ रक्तें माखिला कुंभ- कर्ण ॥ रणीं विजयी त्यां वाटून ॥ येत लंके दळ घेउन ॥ वृत्त कळे हें रावणा ॥ २ ॥

### मा० प० काय बोलला रावणः—

छिन्ननासिक दळसह येतां पाहूनी कुंभकर्ण दुःख झालें बहू राव- णासी॥सांगे प्रधानां उंच आरसा बांधोनीया दावा रूप त्याचें रे त्याज- सी ॥ मानोनीया आज्ञा छिन्नवदन आदर्शीं दावीती प्रधान कुंभकर्णा- सी ॥ चा० ॥ विपरित आदर्शीं पाहुनीयां रूप कोप चढे कुंभ- कर्णासी ॥ ३ ॥

**मा० प० काय कुंभकर्णः—**

गेला सुग्रिव नासिक कर्ण तोडोनीया हो घेऊन काय मुख दाऊं रावणाला ॥ मग कोपोनीया अनीवार त्वरें आला परतुन दांत खात रणांगणाला ॥ गिळी वानर गटकन निघती तों ते नाकांतून न कळत हे कुंभकर्णाला ॥ चा० ॥ मग रघूवीरें बाणें छेदीतां पदकर लोल धरणीं नाचूं लागला ॥ ३ ॥

**मा० प० रघुवीर रणरंगः—**

करि युद्ध तैसा लोल असुर रामसैन्याशीं मारि चुरडुनिया क्रोधें धरून कैक कपींसी ॥ रक्तें माखित असुर रणीं नाचत तुडवित कपींसी ॥ चा० ॥ विष्णुदास ह्मणे मारित बहुत सेनेला ॥ ३ ॥

**मा० प० काय कुंभकर्णः—**

त्या हो रणांगणीं घोर कुंभकर्ण बळीवीर धावत राघवासंनिध आला ॥ मध्यें येउन त्रिभीषण काय बोले त्यालागून सोडोनिया जाय रणभूमीला ॥ कोपोनीया कुंभकर्ण ह्मणे मूर्खा हें वदन आतां दऊं नकोरे मजला ॥ चा० ॥ विष्णुदास ह्मणे मग दिव्य अस्त्रें रघुवीरें कुंभकर्णातें वधिला ॥ ४ ॥

**सारिका छंद ताल धुमाळी.**

पराजित घायाळ सैन्य ॥ आरडत आले लंकेलागुन ॥ कळाविति रावणा वर्तमान ॥ रणांगणीं जें झालें ॥ १ ॥ ऐकुनि रावण पडे मूर्छित ॥ शांतवीत त्या इंद्रजीत ॥ तों महोदर त्रिशिर पराषद ॥ देवांतक हे ऊठले ॥ २ ॥ अतिकाया त्या संगें घेउन ॥ येत कराया रणकंदन॥ तों कपिसह अंगद हनुमान बहुतेकांते मारित ॥ ३ ॥

**॥ आर्या ॥**

बोले बिभिषण रामा अतिकाया येत हा पहा असुर ॥ हा आपणाविण अथवा सौमित्रावीण नाटपे वीर ॥ १ ॥

**पद राग सोनी ताल एका.**

सौमित्रवीर रघुविरासी काय बोलला ॥ द्या आज्ञा आतां वधितों

त्वरें सर्वांला ॥ ध्रु० ॥ घेऊनि आज्ञा त्वरित करित सज्ज धनूतें ॥ येऊनि रणीं क्रोधें गाठी अतीकायातें ॥ मारोनि बाण प्रबळ वीर मारि खलातें ॥ चाल ॥ विजयी वीर देता झाला मुक्ति तयातें ॥ १ ॥

॥ ओवी ॥

तों ते हेर रावणालागून ॥ सांगतां अतिकायानिधन ॥ शोक करी बहू दशानन ॥ तों इंद्रजित त्या काय वदे ॥ १ ॥

**पद राग जोगी ताल धुमाळी.**

गर्वोक्ति इंद्रजित काय बोलला तें परिसुनि आनंद होत रावणाला ॥ ध्रु० ॥ पित्या शोक न करी दळसह जाउन समरीं वधितों मी आतां त्या सर्वांतें ॥ वाजवीत रणवाद्यें आला रणभूमीमध्यें करी तेथें मग हवनातें ॥ मिळतां अग्नींतुनी रथ बैसुन मेघाआड जात बाण मारी तेथुन रामसेनेतें ॥ चाल ॥ दळासह रघुवीर मुर्छित करूनीया जाय गर्वें मग लंकेला ॥ १ ॥

**घनाक्षरी.**

सावध रामसैन्यांत ॥ बिभीषण हनूमंत ॥ चुड्या घेउनी पहात ॥ तों ते सर्व मूर्छित ॥ १ ॥ उठुनिया तो जांबुवंत ॥ प्रसंग दारुण हा ह्मणत ॥ तंव तो सुषेण कथींत ॥ प्रयत्न करा त्वरीत ॥ २ ॥ चौदासहस्र योजनें दूरी ॥ आहे येथुन द्रोणगिरी ॥ आणा तेथुन जीवनकारी ॥ अमृतवल्लि निशिआंत ॥ ३ ॥ जाउन एक क्षणार्धांत ॥ घेउन येतों पर्वत ॥ वंदुनि रघुनाथा निघत ॥ रामदास मारुती ॥ ४ ॥

**पद राग यमन ताल अर्धधमार.**

वंदुनि रघुपति दास मारुति द्रोणागिरिप्रति जा आणायाला ॥ ह्मणे नाथा निशी न होतां आणितों येथें त्याला ॥ वायुपरि गति चवदा योजनें उडुनि मार्गातें ॥ काय कथित भेटुनीया गिरीद्रोणातें ॥ सैन्य मूर्छित इंद्राजितप्रेरीत शक्तीनें ॥ उठविण्या त्या वल्लि देई मजसी त्वरेनें ॥ चाल ॥ अभिमानें गिरी काय बोले मारुतिला ॥ १ ॥

**पद राग सिंधकाफी ताल दीपचंदी.**

उडुनिया गिरि मारुतितें धिःकारानि काय वदला रे ॥ ध्रु० ॥

कारितोसी कटकट येऊनिया या ठाया रे ॥ १ ॥ आहे मी
तव रघुवीर न जाणत जा त्याला रे ॥ २ ॥ तव मनिं
ा गिरीवरि मनेप्सीत फलें खाउन रे ॥ ३ ॥ नाहिं तुज-
ं न देत जाय आल्या मार्गानें रे ॥ ४ ॥ विष्णुदास म्हणे
पडुनि नेत तयाला रे ॥ ५ ॥

घनाक्षरी.

वेळे पर्वत ॥ लागुनि त्यावरलि वात ॥ होति रघुविरा-
सर्व सावध ॥ १ ॥ आलिंगूनि मारुतीस ॥ गौरवूनि
ृणे पोहोंचवी गिरीस ॥ त्वरित नेउनि स्वस्थानीं ॥ २ ॥
रीत ॥ गिरी पोहोंचऊनि येत ॥ मग मिळुनी समस्त ॥
ती ॥ ३ ॥

॥ कटाव ॥

ाशवदनातें रागानें तप्तचि झाला ॥ ध्रु० ॥ निघे ज्ञा-
॥ निवारीत इंद्रजीत त्यातें ॥ वीर सात तो रणांगणालें
याते ॥ प्रघट प्रभंजन आणि त्रिधन ॥ शोणिताक्ष
॥ येती रणिं ते आज्ञा घेउन ॥ शिळा बहू त्यांवरी
मारी प्रघट प्रभंजन ॥ करीत विरूपाक्षाचें चंदन ॥
ताक्ष हनन ॥ कुंभनिकुंभ तों पुढें येउन ॥ कपिगण
हन ॥ तों सुग्रिव आणि हनूमान ॥ मुष्टिप्रहारें असुरां-
ते त्या यमपुरी लागुन ॥ चाल ॥ रणवृत्त हें ऐकुनिया
ाला ॥ १ ॥

॥ ओव्या ॥

ाक्ष मखासुर ॥ रावणाज्ञें कराया समर ॥ येऊनि रणीं
ते झाले घायाळ ॥ १ ॥ क्रोधाउनि मग रघूवीर ॥
रें असुर ॥ तेणें रावण दुःखित फार ॥ इंद्रजीत तों
॥

# इंद्रजीतवध आणि सुलोचनासहगमन.

## पद राग जोगी ताल धुमाळी.

दशानना शांतउनी क्रोधाउनि बहु मेघनाद रणांगणीं पातला ॥ कपटी गर्वी महाक्रूर करी युद्ध अनीवार मारित रामसेनेला ॥ ध्रु० ॥ सिद्ध सामग्री करून गुप्त स्थानातें जाऊन कृत्या निर्मित हवन करुनी ॥ त्या कृत्येआड बैसुन करी बाणपर्जन्य राम होत तें चकित पाहुनी ॥ तों वायुदेव येत रामा मंत्र उपदेशीत जपतां कृत्या पडे भस्म होऊनी ॥ चा० ॥ निरुपाय होऊनि येत खालीं जों थकुनि कपी सर्व मारिती त्याला ॥ १ ॥

## ॥ कटाव ॥

एकदांचि राघवसैन्य अनिवार वृष्टी करित ॥ ध्रु० ॥ बिभीषण हो गदा हणीत ॥ धन्वंतरि तो वृक्ष फेकित ॥ गंधमादन शक्ती सोडित ॥ मुद्गल वेगें शरभ मारित ॥ सुग्रिव अंगद जांबूवंत ॥ सुषेण केसरि नल हनुमंत ॥ वृक्षशिळा फेकीत अगणित ॥ तीन बाण सौमित्र प्रेरित ॥ सहस्र बाण राघव हणीत ॥ इंद्रजीत त्या किमापि न मानित ॥ बाणवृ-ष्टिनें जर्जर करित ॥ रणांगणीं ते कपी समस्त ॥ विजयी मानुनि लंके येत ॥ रावणातें वृत्त कथीत ॥ निर्भर्च्छुनि त्या रावण वदत ॥ मूर्खा वारंवार पराजित ॥ करिसी परितें युद्धा येत ॥ पुन्हांपुन्हां न दावि नि-श्चित ॥ मूख तुझें हें मज कलंकित ॥ हें ऐकुन कोपे इंद्रजित ॥ ह्मणे आज मी शत्रूघात ॥ करीन नातरि ऐका तात ॥ न दाविन हें मूख खचीत ॥ चा० ॥ करुनिया प्रतिज्ञा ऐशी समरासीं क्रोधें जात ॥१॥

## मा० प० दशानना शांतउनिः—

रणांगणीं येऊन कपटी जानकी निर्मून काय क्रोधें बोले मारुतिला ॥ महाकृत्या ही प्रखर हिजस्तव आटिले असुर पहा मारितों आतां तिज-ला ॥ तिस बधूनी त्वरित निकुंबळेमाजी येत आरंभीत घोर हवनाला ॥ चा० ॥ विष्णुदास ह्मणे करी दिव्य रथाकारणें हवन कळे हें ॥ २ ॥

॥ ओवी ॥

सीता मृत झाली पाहून ॥ पडे हनुमंत मूर्छा येऊन ॥ तैसे सर्व कपीगण ॥ येत राम तों तयाकडे ॥ १ ॥

**पद राग मुलतानीधनासरी ताल धुमाळी.**

रघुविर दुःखें अनिवार काय मग बोले सौमित्रा॥आलिंगुनिया हनुमंतातें मनीं बहू हळहळे ॥ ध्रु० ॥ आजवर बहु मम काजि भोगिलें कष्ट या हनुमंतें ॥ सिता शुद्धीकरितां बा रे येउनिया लंकेतें ॥ व्यर्थ झालें तें आजि प्रियेतें वधितां इंद्रजीतें ॥ न राहे हा प्राण आतां न भेटेन मी भरतातें ॥ रावणराज्यीं स्थापा बिभिषण जीवित मग हें सरलें ॥ सौमित्रा० ॥ १ ॥

**मा० प० सौमित्रवीरः--**

जाणूनि नाशिवंत धरिशि कां खंत मानसीं ॥ कीर्ति करिशी अकांत शांत करी मनासी ॥ क्षणमात्रें वधिन त्याजसह दशाननासी ॥ चा० ॥ विनऊनी शांतउनी उठवि बंधुला ॥ २ ॥

**पद राग आनंदभैरवी ताल धुमाळी.**

काय तों बिभिषण बोलतसे ऐकुनी रघुविर डोलतसे ॥ येउनी त्वरितगतीं कपटि राक्षसकाति विनयें सांगतसे ॥ ध्रु० ॥ कपटी इंद्रजितें हनन- ॥ कृत्रिम जानकि निर्मून ॥ केलें रणिं तिज आणून ॥ मानी सत्य तें हनुमान ॥ आहे सुखि जानकिरत्न ॥ दूतें आणिलें वर्तमान ॥चा०॥ परी इंद्रजित निकुंबळेंत अभिचारित करित असे ॥ १ ॥ व्हावा दिव्यरथ प्राप्त ॥ ह्मणुनी घोर हवन करित ॥ झाला आ[illegible] अर्धरथ ॥ पूर्ण [illegible] निघतां होइल अकांत ॥ विध्वंसाल जरी त्वरित ॥ होति[illegible] सफल[illegible] मनोरथ ॥ चा० ॥ मरण तयाचें चौदा वर्षें निरहारिहातें असे ॥ २ ॥

**घनाक्षरी.**

ऐकून ऐसें वर्तमान ॥ राम मनीं आनंदून ॥ सज्ज लक्ष्मणालागून ॥ अस्त्रें देउन धाडीत ॥ १ ॥ सवें दासबिभीषण ॥ वानरसहित हनूमान ॥ येतां सुवेळेलागून ॥ पहाति बहुत विपरित ॥ २ ॥ सात प्रेतें पसरून॥ इंद्रजीत करित हवन ॥ अर्धा रथ अग्नींतून ॥ उत्पन्न जाहला

असे ॥ ३ ॥ मग वानर कोपून ॥ टाकुनि वृक्षपाषाण ॥ हवननाश करून ॥ तेथुनि सर्व निघाले ॥ ४ ॥ कोपे फार इंद्रजीत ॥ दळासह रणीं येत ॥ मग सौमित्रासहीत घोर युद्ध चाललें ॥ ५ ॥

## पद राग भूपकल्याण ताल दीपचंदी.

इंद्रजीत येऊनी रणातें ॥ क्रोधावेशें बोले सौमित्रातें ॥१॥ मानव तूं दुर्बल आणि लहान ॥ करूं व्यर्थ इच्छिसी युद्धकंदन ॥ २ ॥ देतों जा तूज प्राणदान ॥ पळ आतां रणभूमी सोडून ॥ ३ ॥ काय बोले तो त्या लक्ष्मण ॥ अगस्ति जरी अकृतीनें लहान ॥ ४ ॥ क्षणीं आटिला सिंधू प्राशून ॥ तैसें मी प्राण तुझे हरिन ॥ ५ ॥ इंद्रजीतें सोडीलें बहु बाण॥ सौमित्र ते खंडी शौर्यैकरून ॥ ६ ॥ अद्भुत सौमित्रशरसंधान ॥ इंद्रजीत आनंदे तें पाहून ॥ ७ ॥ इंद्रजीतें पर्जन्यास्त्र प्रेरीलें ॥ सौमित्रें वातास्त्रें नीवारिलें ॥ ८ ॥ इंद्रजीतें पर्वतास्त्र टाकीलें ॥ रामानुजें वज्रास्त्रें नीवारीलें ॥ ९ ॥ अग्नीअस्त्र इंद्रजीतें मारिलें ॥ सौमित्रें सागरास्त्रें वारिलें ॥ १० ॥ अगस्तिअस्त्र इंद्रजीतें प्रेरीलें ॥ अघटीतास्त्रें सौमित्रें वारीलें ॥ ११ ॥ इंद्रजीत सोडी पापास्त्रातें ॥ लक्ष्मण योजी नामास्त्रातें ॥१२॥ महेशास्त्र प्रेरिलें लक्ष्मणें ॥ मेघनाद खंडी तें ब्रह्मास्त्रानें ॥१३॥ मग पांच बाण सौमित्रावर ॥ सोडीले इंद्रजीतें कठोर ॥१४॥ तोडीत ते शौर्यें सौमित्र वीर ॥ तंव उठे एकदांचि कपिभार ॥ १५ ॥ क्रोधाउनिया अंगद शरें ॥ मेघनादमस्तका पाडी छिद्रें ॥ १६ ॥ हाणी क्रोधें बिभीषण गदेतें ॥ मोडुनि टाकी इंद्रजीत तीतें ॥ १७ ॥ मारी जांबूवंत मुष्टीप्रहार ॥ करी चूर्ण मेघनाद रहिवर ॥ १८ ॥ मारुति, नल, मैंद, गव, ऋषभ ॥ कुमुद, गवाक्ष, केसरी, शरभ ॥ १९ ॥ एकदांचि करिती शिळावर्षाव ॥ निवारीत बाण सोडूनी दिव्य ॥२०॥ एकाएकीं उडुनी रणांतून ॥ मेघाआड जाउनी मारी बाण ॥ २१ ॥ हनुमंतें सौमित्रा करिं घेऊन ॥ गाठी इंद्रजीता नभीं जाऊन ॥ २२ ॥ मग इंद्रजीत खालीं उतरला ॥ सौमित्रें दिव्य शर काढीला ॥ २३ ॥ करी प्रतीज्ञा बहू दारुण ॥ कीं ब्रह्मचारी सत्य असेन ॥ २४ ॥ खरा रामदास हा हनुमान ॥ बंधू रघूवीर सत्यवचन ॥ २५ ॥ आणी पति- ? सीता सती ॥ तरी येवो या बाणें तुज मुक्ती ॥ २६ ॥ ऐसें ?ोडितां बाण ॥ भुजशीर गेलें खंड होऊन ॥ २७ ॥ भुज

पडे सुलोचनाअंगणीं ॥ ऋषभ जात शीर त्याचें घेऊनी ॥ २८ ॥ आनंदे मानसीं सौमित्र ॥ पुष्पवर्षाव करिती सुरवर ॥ २९ ॥ संगें घेउनीया सर्व वीर ॥ निघे भेटावया रामा सत्वर ॥ ३० ॥

॥ दिंड्या ॥

पुसे शोकें रघुराज सुग्रिवातें ॥ नाहिं कळलें रणवृत्त कांहिं मातें ॥ आहे सुकुमार बाल लक्षुमण ॥ परोपारिनें करि कपी शांतवन ॥ १ ॥ विजयि होउनि तो येत लक्षुमण ॥ रघूराज त्या देत आलिंगन ॥ बिभीषण सांगे सर्व रणवृत्त ॥ दावि शक्रजितशीर त्या त्वरीत ॥ २ ॥ राम सांगे ऋषभास बा पुजूनी ॥ शीर ठेवी ; मग लक्ष्मणालागूनी ॥ शस्त्रघाय विरहीत त्या करूनी ॥ गौरविलें सर्वांस आनंदूनी ॥ ३ ॥

॥ ओवी ॥

मेघनादभुज अंगणीं ॥ पडतां दणाणली धरणी ॥ शेषकन्या जों पाहे येउनी ॥ ओळखे स्वपतीकर तीतें ॥ १ ॥

पद राग यमन ताल धुमाळी.

सुलोचना पाहुनि अंगणीं पतीकरातें ॥ टाकी सति शोकें अंग धरणीतें ॥ ध्रु० ॥ काय झालें म्हणे अहा! माझ्या प्राणप्रियास ॥ न कळे रणिं पडले कोण्या ठायास ॥ कसें मरण असें आज आलें प्रिया आपणास ॥ सांगा तरि काय पुरविली आस ॥ काय करूं धनादिक संपत्ति घेउन यास ॥ शोकें सति पिटित वक्षस्थळास ॥ चाल ॥ दुःखें विव्हळ होउनी फेकि अलंकारांतें ॥ १ ॥ कुलक्षयास्तव मामाजिंनिं बळें यत्न केला ॥ आणुनी व्यर्थ गांजिलि हो सीतेला ॥ समजुनिया हें बहु कोप आला रामाला ॥ तेणें बहु राक्षसअंत हा झाला ॥ करि शोक आलिंगुनि हृदयीं पतीकराला ॥ कवटाळुनि सख्या अवरिती तिजला ॥ ॥ चाल ॥ वर्णीत सती मग स्वपतिच्या शौर्यातें ॥ २ ॥

पद राग काफी जिल्हा ताल दीपचंदी.

सूलोचना मनीं पतिगूण अठवूनी शोकें धरणीं पडली ॥ बोले तुह्मंप्रती कैची अशी गती प्रिया सांगा आली ॥ ध्रु० ॥ इंद्रादीक देव जिंकोनी सकळीक सेवक किं हो केले ॥ ते आज मानवहातें पडाल

र्णा कैंचें विपरित हें घडलें ॥ ममतेनें मजलागी भेटीस बहावया भुज-मूळ पाठविलें ॥ चाल ॥ देउन लेखणी करीं ह्मणे ल्याहा तरी काय कृती घडली ॥ १ ॥

**पद राग यमन ताल धुमाळी.**

पत्र लिहिलें निर्जिव करें शेषकूमरी ॥ ये भेटिस मम झडकरी ॥ध्रु॥ असतां करित हवन दुर्धर ॥ निकुंबळें, विघ्नकरी सौमित्र ॥ क्रोधाउनि मग अनीवार ॥ चाल ॥ गेलों त्यावरी ॥ १ ॥ प्रथम जर्जर त्या मीं केलं ॥ शेवटीं यश गे त्यातें आलें ॥ तेणें भूजशीर छेदिलें ॥चाल॥ झालें यापरी ॥ २ ॥ नेलें शीर गे सूवेळेसी भुजमूळ ॥ धाडीलें म्यां तु-जसी ॥ नमुनी विष्णुदास आज्ञेसी ॥ चाल ॥ निघे सुंदरी ॥ ३ ॥

**मा० प० सूलोचना मनीं:—**

लुटऊनी संपत्ती घेउन भुजे हातीं येत ती सभेप्रती ॥ पुसतां रावणें वृत्त कथुनी सर्व ह्मणे मी जातें सती ॥ ऐकोनी रावण प्रीयपुत्रशोकें पडे सिंहासनाखालतीं ॥ मंडोदरी अन्य अंगनासहीत शोक फार करीती ॥ चाल ॥ गहिवरोनी मग साति श्वशुरातें शिर आणवा वदली ॥ २ ॥

**मा० प० सिद्धकरोनी दळासी:—**

रामासी आतां वधीन ॥ ना तर मुख न दावीन ॥ क्रोधाउनीया रावण॥ दळ सिद्ध करून ॥ विनवी मैजा तों स्नुषेलागुन ॥ न धाडी दशवदन॥ ॥ चाल ॥ मान्य करी विष्णुदासी ॥ ३ ॥

**॥ आर्या ॥**

विनउनि लंकेशातें अहिकन्या बोलली न आयास ॥ व्यर्थ करा मामाजी आणितें पतिशिर स्तऊनि रामास ॥ १ ॥

**सारिकाछंद ताल धुमाळी.**

रावण बोले सुलोचनेतें ॥ सीते परि गे स्वबंदीतें ॥ रागें रघुविर ठे-विल तूंतें ॥ न जाई तूं त्याकडे ॥ १ ॥

**पद राग मांडजिल्हा ताल त्रिवट.**

न सुलोचना अहिकन्या ॥ काय वदत ॥ ध्रु० ॥ कां आप-

णासम सर्व मानितां नव्हे तैसा रघुनाथ ॥१॥ एकपत्नीव्रत आहे ज्याचें॥ निःशंक आज्ञा द्या मज त्वरित ॥ २ ॥

**सारिकाछंद ताल धुमाळी.**

स्नुषाआग्रह बहु देखून ॥ ह्मणे जाय निस दशवदन ॥ परि सांभाळुनि सतीपण ॥ पतिशिर घेउनि ये त्वरें ॥ १ ॥

**॥ ओवी ॥**

पाहोनि सुरूप सुलोचनेस ॥ कपी बोलती रघुरायास ॥ आली जानकी भेटायास ॥ प्रभूराया आपणा ॥ १ ॥

**॥ गीत ॥**

बोले राघव काय कपीतें ॥ मारिन जेव्हां दशाननातें ॥ तेव्हां पडेल हो दृष्टीतें ॥ जानकी माझी ॥ १ ॥ रावणस्नुषा ही जी येत ॥ साध्वी सति ही असे पुनीत ॥ करूं सहगमन पतीसहित ॥ शिर मागूं आली॥२॥

**॥ दिंडी ॥**

वंदुनीया बोलली रघूनाथा ॥ कृपा करूनी द्या पतीशीर आतां ॥ आहे इच्छीतें सहगमन त्याशीं ॥ हेत पुरवा जाउं द्या त्वरें मजसी ॥ १ ॥

**सारिकाछंद ताल धुमाळी.**

ऐकुन रामें सतीवचन ॥ ह्मणे साध्वी तूं गे धन्य ॥ मिळेल अक्षयि पद तुजलागुन ॥ सत्य पतीसहित ॥ १ ॥ मग ऋषभातें आज्ञापून ॥ आणवी शिर; ती त्यातें पाहुन ॥ हृदयिं दुःखें आलिंगून ॥ आक्रंदत अनिवार ॥२॥ राम पुसे सुलोचनेसी ॥ शिर हें आणिलें या ठायासी ॥ कोणीं कथिलें सांग मजसी ॥ तों ती काय वदत ॥ ३ ॥ लिहूनि या करानें पत्र ॥ कळविलें मज सकल वृत्त ॥ ऐकुन हसती कपी समस्त ॥ ह्मणती सर्व हें खोटें ॥ ४ ॥

**॥ आर्या ॥**

हसवी शिर हें आतां ह्मणती कपि मानु सत्य तव वचन ॥ ऐकुन ऐसें प्रार्थी पतिशीर्षा दीन हस्त जोडून ॥ १ ॥

**पद राग कालंगडा ताल धुमाळी.**

आजि प्राणनाथ तुह्मि हास्य करावें मजशीं ॥ तेणें वाटेल मम वचन

सत्य कपींसी ॥ ध्रु० ॥ बहु विनोद करूनी आजवर मजसंगातें ॥ स
आज धरिलें कां मजशीं मौन्यातें ॥ रणीं पराभूत ह्मणुनी राग अ
काय तुह्मांतें ॥ वाटे तरिच मान द्याना मम वचनातें ॥ प्रिया हास्य व
निया द्यावें मज यशातें ॥ तरीच हे मानतिल माझ्या सतीपणातें॥चा
न हासे शिर मग कांहीं विनोद करित तयाशीं ॥ १ ॥ वरूं जातां
र्पनखा सौमित्रालागून ॥ शोभविली त्यांणीं नासिकस्तन कापून ॥ सु
नासिक नेलें हें त्यातें न कळुन ॥ नाचला छिन्नभिन्न युद्धीं कुंभकर्ण
दशवदनदाढिमिशे हनुमंतें जाळून ॥ विटंबिलें सभाजनां दीप माल
॥ चा० ॥ असे नाना विनोद करी साति शिर हसायातें ॥ २ ॥ र
अपजय तुह्मां कळतें मजलागून ॥ पूर्वींच मी आणितें पित्यास मम बाहू
आपल्या शत्रुसि तो वाधिता युद्ध करून ॥ मग विपरित हें कां आलें
सतें घडून ॥ विष्णुदास ह्मणे परिसुनि हें नेत्र उघडून ॥ हसलें मोठ
नें मृत शीर असोन ॥चा०॥ महासती मानुनि कपी वंदित सर्व तियेसी॥

॥ आर्या ॥

पुसती कपि रामातें पूर्वीं बहु विनविलें परी न शिर ॥ हसलें,
आतां कां हासे निर्जीव हा चमत्कार ॥ १ ॥

॥ साक्या ॥

गहिंवर येउन कथीत राघव कपितें, हा सौमित्र ॥ तिचा तात
शेष तयाचा आहे हो अवतार ॥ १ ॥ सहाय तुह्मां आणितें म्ह
आश्चर्यें हें शीर ॥ हसलें; ऐकुन रामवचन हें हो मूर्छित सौमित्र ॥
बोलत शोकें हा हा ! दैवा ! केलें म्यां विपरीत ॥ स्वकन्येतें दुःख दी
वधुनी मम जामात ॥ ३ ॥

**घनाक्षरी.**

आप्त सूहृद समरांत ॥ वधितां दोष नसे त्यांत ॥ तैसें सर्व अशाश्व
ध्यर्थ दुःख न करी ॥ १ ॥

**मा० प० सौमित्रवीरः—**

अन्यास कथायास योग्य शब्द कां असे ॥ सितावियोग दुःखें शिळ
[illegible]विले कसे ॥ तेणेंपरेच सर्व दुःख मायेंकरूनिया असे ॥ चा
नि काय वदत तयाला ॥ ३ ॥

॥ साकया ॥

राम ह्मणे मज सांग सौमित्रा उठऊं कां जामाता ॥ हें वच ऐकुन आश्चर्य वाटे कपिसह त्या हनुमंता ॥ १ ॥ उत्तम आणिलें मनीं मारुती बोले हात जोडोनी ॥ माराया त्या प्रयास किति ते पडले आणा मनीं ॥ २ ॥

मा० पं० काय वदन सुलोचना:—

मारुतिवच तें मान्य रघुपती ॥ होतां सती नीराश होत ॥ ३ ॥ विष्णुदास ह्मणे वंदुनि रामा ॥ पतिशिर घेउनि काय कथित ॥ ४ ॥

मा० प० सुलोचना भनीः—

नमुनी राघवातें ह्मगे उभयांतें धाडावें मुक्तीला ॥ मनीं रामध्यान करीत मग सती नीघाली जायाला ॥ सिंधूतीरा येवोनीया साध्वी होत सिद्ध सहगमनाला ॥चा०॥ विष्णूदास म्हणे पतिशीरासहीत अग्नींत प्रवेशाली॥३॥

॥ ओव्या ॥

इंद्रजीत पावला मरण ॥ सुलोचनें केलें सहगमन ॥ हें दशवदनें पाहून ॥ दुःखें बहू शोक करी ॥ १ ॥ मग प्रधान तयासी ॥ सांगते झाले सुविचारांसी ॥ ऐकोनि ते राय मानसीं ॥ आनंदीत जाहला ॥२॥

---

## अहीमहीवध.

---

पद राग सूधकल्याण ताल धुमाळी.

बोलती प्रधान रावणासी ॥ आणा अहिमहिसी ॥ध्रु०॥ कपटि बळी ते असूर ॥ काढितील विचार ॥ रावणें धाडितां त्यां पत्र ॥ येती लंके सत्वर ॥ नमुनी असूरइंद्र ॥ सांगा ह्मणती सविस्तर ॥ काय संकट आपणासी ॥ बाहीलें या दासासी ॥ १ ॥

सारिकाछंद ताल धुमाळी.

रावण वदे काय तयांसी ॥ हरून मीं आणितां सीतेसी ॥ येउन कोप तिच्या पतीसी ॥ सुवेळेसी तो आला ॥१॥ कुंभकर्णादी बळि वीर ॥

असंख्य इंद्रजितादी कुमर ॥ पराक्रमी मारिले असुर ॥ केलें मजही पराभुत ॥ २ ॥ वाटुन पुढें प्रसंग कठिण ॥ आणिलें तुम्हां बोलाऊन ॥ कपटें रामसौमित्रां धरून ॥ नेउन वधा स्वनगरीं ॥ ३ ॥ आज्ञा वंदुन ते असूर ॥ निघती सुवेळे सत्वर ॥ कपटी पराक्रमी बळिवीर ॥ गुप्तवेशें तेथुनी ॥ ४ ॥

### पद राग कानडा ताल त्रिवट.

कथीत बिभीषण येऊनी मारूतीसी ॥ काय हितकारक वृत्त रघुपतीसी ॥ ध्रु० ॥ अहीमहितें आज रावणें आणूनी न्यायासी ॥ कथिलें रामलक्ष्मणां कपटें स्वपूरासी ॥ १ ॥

### घनाक्षरी.

ऐकुन ऐसें वर्तमान ॥ स्वपुच्छदुर्ग हनूमान ॥ करुनि रामलक्ष्मण ॥ घालुनि आंत रक्षित ॥ १ ॥ रसवी वानर ठायिं ठायीं ॥ हुशार सांगे सर्वांही ॥ तों ते कपटि अहीमही ॥ न कळत तेथ पातले ॥ २ ॥

### पद राग झिंजोटी ताल धुमाळी.

अहिरावणमाहिरावण खल दुर्जन ॥ काय करिति तेथें येऊन कर्म दारूण ॥ ध्रु० ॥ रात्रीं सुवेळेसि येऊन ॥ विशाल पुच्छपरिघ देखून ॥ फोडावया करिती यत्न ॥ पुच्छ दुर्ग तो वज्रसमान ॥ हणितां घाय शस्त्रें मोडून ॥ जातां, चंद्रमडळीं जाऊन ॥ उतरूनि गवाक्षामधून ॥ चा० ॥ मोहनी घालीती ते उभयांलागून ॥१॥ दुर्घट विवर करुनि तेथून ॥ शय्येसह रामलक्ष्मण ॥ नेती दधिसिंधूस विवरांतुन ॥ ठेउनी विवरद्वारिं रक्षण ॥ मकरध्वज मगरीनंदन ॥ महिकावतितें मग येऊन ॥ द्यावें भद्रकालीस बलिदान ॥ चा० ॥ दुष्ट ठेवीती म्हणूनी त्यांतें रक्षून ॥ २ ॥

### पद राग गौडमल्हार ताल धुमाळी.

वानरसेनेमध्यें हहःकार झाला ॥ रविउदयिं न देखुनि सौमित्र रघुपतिला ॥ ध्रु० ॥ कपि सर्व उठोनी येती प्रभातकाळीं ॥ रघूवीर [illegible] बहुत उतावळीं ॥ प्रभुसी न अनुजसह देखुन ते काळीं ॥ बहु [illegible] दोरुन दीन हेत आगेल्रो ॥ तों बिभिषण त्वरें येउनिया त्या [illegible] थोर सर्व मंडळी ॥ हें वृत्त कळतां

रावण येउन या ठायीं ॥ ही बरवी संधी पाहुनिया लवलाही ॥ चा० ॥ भक्षील असुरसह क्षणांत सर्वांला ॥ १ ॥

**मा० प० कथीत बिभीषण:—**

स्थीर करूनी सर्वांतें सांगे हनुमंतासी ॥ जावें त्वरें आतां प्रिया प्रभूच्या शोधासी ॥ २ ॥

**पद राग केदार ताल त्रिवट.**

परिसूनी निघे त्या वचनातें ॥ हनुमंत सांभाळा सांगोनीया सेनेतें ॥ चा० ॥ नळ नीळ अंगद आणि जांबुवंत ॥ यांसवें प्रवेशे विवर मार्गांत ॥ थकतां मार्गीं सर्वां वाहून नेत ॥ चा० ॥ देखतां असुरभयें झाले कापडी त्यांतें ॥ १ ॥

**कटाव.**

अंजनीसूत हनुमान मग पुढें काय करीत ॥ ध्रु० ॥ अडवीतां त्यांतें असुरांनीं ॥ बांधितें झाले चौघे मिळुनी ॥ मकरध्वज मग ये धावोनी ॥ बसे उरावर कपी पाडुनी॥ह्मणे साह्य जो तुजलागूनी॥आणा एथें त्यातें स्मरूनी ॥ तंव तो हनुमंतास स्तवीत ॥ ताता या मम साह्या त्वरित ॥ ऐकुन ऐसें विपरित वृत्त ॥ झाला मारुति बहू लज्जित ॥ ह्मणे मी तो रे हनुमंत ॥ ब्रह्मचारि मज कोठुनि सूत ॥ तों मकरध्वज मगरी स्तवित ॥ ये तों मगरी तेथें त्वरित ॥ हनुमंतालागी वंदीत ॥ ह्मणे सुत हा तुमचा निश्चित ॥ ज्या काळीं लंका जाळून ॥ श्रमघर्म सागरीं आपण ॥ टाकीला तो म्यां हो गिळुन ॥ गर्भिणि झालें त्यापासून ॥ तो हा मकरध्वज नंदन ॥ संशयविरहित हो हनुमान ॥ उठवी पुत्रातें गौरउन ॥ नेले कोठें रामलक्ष्मण ॥ या मार्गे सांगे मजलागुन ॥ वृत्त त्यातें सर्व सांगुन ॥ ह्मणे बसा मम मुर्ती नेउन ॥ महिकावतिमाजी सोडीन ॥ नल निळ अंगद जांबूवान ॥ भयाभीत झाले तिज पाहुन ॥ उल्लंघुनि सिंधू हनुमान ॥ महिकावतिनगरांत येउन ॥ भद्रकालि देवालयिं जाउन ॥ न्हाणित देवीतें फेकून ॥ अंगातें सिंदूर चर्चुन ॥ बहू भयंकर रूप घेऊन ॥ चा० ॥ लाऊनी द्वारकपाटें पायानें दडपुन बसत ॥ १ ॥

**घनाक्षरी.**

आले अही महिरावण ॥ पूजासाहित्य घेऊन॥देवी बोले तों आंतून॥

ऐका भक्तहो तुह्मी ॥ १ ॥ माझें उग्ररूप फार ॥ उघडितां न देउळ-द्वार ॥ शिखर फोडुनी सत्वर॥पूजा नैवेद्य समर्पा ॥ २ ॥ गवाक्ष वरी करीत ॥ पंचामृत ओतित आंत ॥ न ये बाहेर किंचीत ॥ पुजारि ढो-शित मोरिते ॥ ३ ॥ बसे मार दोहोंकडून ॥ कापे देवि भयेंकरून ॥ स्तब्द मौन्य धरून ॥ बसे स्वस्थ मोरींत ॥ ४ ॥ ढेकर देत खाउनि अन्न ॥ मारुति उभयांलागून ॥ वदे बळी आतां आणुन ॥ गवाक्षांतून सोडा ॥ ५ ॥ गिळिन लावितां न दांत ॥ ऐसें ऐकुन असुर जात ॥ रथीं सौमित्ररघुनाथ ॥ घालुनि पुरीं फिरवित ॥ ६ ॥ गुलाल सिंदुर वरवर ॥ उडउनि करित वाद्यगजर ॥ नेतां मिरवित नारिनर ॥ नगरीं सर्व हळहळती ॥ ७ ॥ सौधिं अहिस्त्रि चंद्रसेना ॥ पाहे जानकीजी-वना ॥ कामें हत निद्रा अन्ना ॥ त्यागुनि रामिं ध्यानस्त हो ॥ ८ ॥

॥ **ओवी** ॥

काढितांची मोहनास्त्रा ॥ सावध होऊन राम सौमित्रा ॥ बोले आ-मची प्रिया आतां ॥ फार कठीण रे गती ॥ १ ॥

**पद राग झिंजोटी ताल त्रिवट.**

सावध होऊनी रघुवीर लक्षुमणा बोले ॥ प्रिया शत्रूंनीं आपणांतें खिळूनी वेष्टीलें ॥ ध्रु० ॥ दळासह कोठें माझा असेल हनूमान ॥ कोण स्थापील लंकेसी आतां बिभीषण ॥ तैसें माझें सीतारत्न सोडवील कोण ॥ कळतां माझ्या भरता हें त्यागलि तो प्राण ॥ चा० ॥ दुःखें रामनेत्रांतूनी आश्रूपूर आले ॥ १ ॥ सनकादीक देव जया निशींदी-नीं ध्यात ॥ प्राप्त समयानूसार राघव वर्तत ॥ बळी द्यावया उभयांतें नेउन देऊळांत गवाक्षांतून दोघांतें सोडीलें मग आंत ॥ चा० ॥ वि-शाल रूप देवीचें रामें अवलोकीलें ॥ २ ॥

**ओवी.**

विक्राळरूप हनुमान ॥ बोले लक्ष्मणालागून ॥ स्मरा तुमचा त्राता कोण ॥ संकटीं धाउन येई त्या ॥ १ ॥

**पद राग गौडसारंग ताल धुमाळी.**

माझी माय धाव गे लौकरी॥रघुविर धावा करी माय पा-

व गे लौकरी ॥ ध्रु० ॥ सिताशुद्धितें उड्डुनि सागरा श्रमलासी बा भारी ॥ संकटिं सर्वांसी उठवीलें आणुनि द्रोणागीरी ॥ तुजवांचुन न कोणि अनाथा सोडावि झडकरी ॥ प्रेमाश्रू आले मारुतिच्या ऐकुन गालांवरी ॥ चा० ॥ विष्णुदास ह्मणे लोळे रामचरणावरी ॥ १ ॥

**पद राग सारंग ताल एका.**

रामकार्यीं सक्त हनुमान दास निशिंदिन ॥ ध्रु० ॥ प्रेम आवरेना मारुतीस ॥ त्वरें लागला चरणास ॥ मीच दास ह्मणे रघुपतीस ॥ अंजनीनंदन ॥ १ ॥ आनंद झाला रघूनाथा ॥ कवळूनी ह्मणे हनुमंता ॥ धावा करितां आलासी आतां ॥ त्वरेनें धाऊन ॥ २ ॥ पहा शत्रूनें आपणातें ॥ चोरूनी आणीलें एथें ॥ धाऊनीया वहातां तूतें ॥ आलासी प्रियप्राण ॥ ३ ॥ नाहीं हातीं चापबाण ॥ आणीशी जरीं जाऊन ॥ दुष्ट राक्षसां मी मारीन ॥ न लागतां क्षण ॥ ४ ॥ त्वरें जाऊनी हनुमान ॥ आणीत धनुष्यतूण ॥ आनंदें वदे झाले रघुनंदन ॥ कष्ट तुज लागून ॥ ५ ॥ मही येतां दर्शनास ॥ मारीतों लाथेनें त्यास ॥ करूनी आपण युद्धास ॥ मारा अहिरावण ॥ ६ ॥ पाठीं घालूनी दोघांतें ॥ बैसे हनुमान तेथें ॥ बोले काय मग असुरांतें ॥ आरडूनी हनुमान ॥७॥ अहिरावण महिरावणा ॥ तुष्टले भक्षुनि अवदाना ॥ आतां यावें तुह्मी दर्शना ॥ भय रे त्यजून ॥ ८ ॥

**पद राग सोनी ताल त्रिवट.**

हर्षें नाचती अहिमहिरावण ॥ ध्रु० ॥ देविवचन परिसूनी मानिती भक्तशिरोमणि आपण ॥ १ ॥ दर्शना आंत अही आदि जातां मारी रगडुनि पादतळीं हनुमान ॥ २ ॥

**॥ ओवी ॥**

दक्षणा पंचामृतापरी ॥ जाईल ह्मणूनि पुजारी ॥ जावया देऊळगाभारीं ॥ एकमेकांशीं भांडत ॥ १ ॥

**मा० प० हर्षें नाचतीः—**

अहि जातां त्या धरित मारुती उसाळी मारी विपरीत तो पाहुन ॥३॥
बंधुगती विपरीत पाहुनी दळसह सिद्ध हो युद्धालागून ॥ ४ ॥

॥ ओवी ॥

रामलक्ष्मण स्कंदीं घेऊन ॥ आला बाहेर हनुमान ॥ देवळासह देवी फेकून ॥ समुद्रांत दीधली ॥ १ ॥

म:० प० रामकार्यी सक्तः—

बाण मारूनी रघूनाथ ॥ दळ सर्व संहारीत ॥ एक उरतां अही दैत्य ॥ मारी त्यासी बाण ॥ ९ ॥ अहितें लागतां बाण ॥ वाहे रक्त जें तेथून॥ पडतां भूमीवरी तत्क्षण ॥ होत अहिरावण ॥ १० ॥ मारीतांची त्यातें बाण ॥ होती बहू त्यापासून ॥ आश्चर्ये कपि मगरिस येऊन ॥ पुसत कारण ॥ ११ ॥ तों ती वदे कामासक्त ॥ चंद्रसेना रामा ध्यात ॥ देउन भाक पुरवीन हेत ॥ पुसा अहीमरण ॥ १२ ॥ तेथूनी मग हनूमंत ॥ चंद्रसेनासदनीं येत ॥ चुटक्यानादें जागृत करीत ॥ असतां ध्यानीं मग्न ॥ १३ ॥

॥ आर्या ॥

उघडूनि नेत्र सति पुसे कोण कुठिल कां आलासि सांग मला ॥ असतां रघुविर ध्यानीं मग्न वृथा कां आलासि विघ्नाला ॥ १ ॥

॥ गीत ॥

रामदास मी गे हनुमान ॥ पडतां संकट स्वामीलागुन ॥ आलों पुसाया तुजलागून ॥ कृपा करुनि सांगे ॥ १ ॥ युद्धीं अहिशीं राम थकला ॥ सांग युक्ति त्या मारायाला ॥ पुरविन हेतू सांग मजला ॥ तूझा नंतर ॥ २ ॥

पद राग सोरट ताल धुमाळी.

सांगेन पतिमृत्यु तूंतें चंद्रसेना ह्मणे हनुमंतातें ॥ रघुविरप्राप्ती करविन अशि जरि देशि भाक मातें ॥ ध्रु० ॥ कालच रघुविर मिरवित नेतां पाहुनि मम मनीं ॥ वाटलें कीं ही मूर्ति असावी निशिदिनिं सुखशयनीं ॥ अन्नशयन न रुचे तळमळे कामें हत होऊनी ॥ चाल ॥ तुझ्या हाबीं जरि सत्य असे तरि आणि त्यास एथें ॥ १ ॥

॥ आर्या ॥

जाणुनिया प्रभुकार्या देई कपि भाक चंद्रसेनेतें ॥ आनंदें अहिपत्नी जंपाति कथा त्यातें ॥ १ ॥

### मा० प० सांगेन पतिमृत्युः—

प्रसन्न करुनी हरा अहीनें वरद्मा मागितला ॥ मम शोणितबिंदूचे हो-वोत अहि ह्मणुनी ; भ्रमरांला ॥ सांगुनिया शिव शिंपावे रुधिरावरी अ-मृताला ॥ चाल ॥ अमृत कुंडावरिल मार जा त्वरितचि भ्रमरांतें॥२॥

### ॥ आर्या ॥

जाउनि मारुति तो मग भ्रमरांसह वधित कुंडरक्षक ते ॥ येतां श्रेष्ट तयांतिल षट्पद तो शरण सोडिला त्यांतें ॥ १ ॥ येउनि बोलत रामा प्रेरा ब्रह्मास्त्र या अहीवरतें ॥ करितां रामें तैसें मेला ; आनंद होत सकलांतें ॥ २ ॥

### सारिकाछंद ताल धुमाळी.

वर्षित पुष्पें मग सुरवर ॥ पाहे मारुतीस रघुवीर ॥ तंव तो चिंता-क्रांत वीर ॥ पुसत राम कारण ॥ १ ॥ चंद्रसेनेचें सांगे वृत्त ॥ आहे तिजला भाक दत्त ॥ कीं आणिन शयनीं रघुनाथ ॥ चिंता आहे ही फार ॥ २ ॥ राम बोले मारुतीसी ॥ एकपत्नि मी हें बा तुजसी ॥ ठावें कां न सांग मजसी ॥ कठीण आणिला प्रसंग ॥ ३ ॥ उपाय योजी सत्वर कांहीं ॥ दोष न लागे मज लवलाही ॥ खरा भक्त बा तुज सम नाहीं ॥ त्वरीत जाई प्रियकरा ॥ ४ ॥

### मा० प० रामकार्यी सक्तः—

चंद्रसेनामंदीरांत ॥ जाऊनिया हनूमंत ॥ ह्मणे शय्या करी सिद्ध त्व-रीत ॥ आणितो रघुनंदन ॥ १४ ॥ येथें होतां अपशकून ॥ राम जा-ईल उठोन ॥ मग तो दोष आह्मांलागून ॥ नलगेची जाण ॥ १५ ॥

### मा० प० सांगेन पतिमृत्युः—

व्हाया वचनांतूनि पार बा आणि रघुपतितें ॥ विलासद्रव्यांसहित सिद्ध मी करितें सुमनसेजेतें ॥ मनीं आनंदित चंद्रसेना वार्णित हनुमंतातें ॥ ॥ चाल ॥ तेथुन येउन बोले कपि मग चल त्वरें रघुनाथातें ॥ ३ ॥

### मा० प० रामकार्यी सक्तः—

रक्षित भ्रमरां सांगूनी ॥ चंद्रसेना अवरोधनीं ॥ युक्तीनें मंचक कोर-ऊनी ॥ रामा जा घेऊन ॥ १६ ॥

ऐकुनी हे डोले ॥ ध्रु० ॥ युगायुगीं मारुतिराया घेतले मीं अवतार ॥ न विसरे दासा मी तुझे कृतउपकार ॥ संकटीं धावलासी बाहतां तूं सत्वर ॥ चाल ॥ राक्षस वधुनी कपिदळ मज त्वां भेटवीलें ॥ १ ॥

॥ ओव्या ॥

महिकावतींत हनुमंतें ॥ केले पराक्रम ते ते ॥ वर्णितां सर्व रघुनाथें॥ सर्व स्तविती तयासी ॥ १ ॥ इकडे अहीमही वधून ॥ आला सुवेळे रघुनंदन ॥ कळतांचि हें दशानन ॥ चिंताक्रांत होतसे ॥ २ ॥

---

## शक्तिहतलक्ष्मणाऽऽख्यान.

### पद राग लीलांबरी ताल धुमाळी.

चिंतातुर रावण क्रोधावेशें बोले प्रधानातें ॥ राघव आला सूवेळेला मारुनि अहिमहितें ॥ ध्रु० ॥ त्वरें प्रचंड सेना घेउनि रावण आला युद्धाला ॥ गर्जोनि कपी असुरांवर करिती शीलावृष्टीला ॥ बाणें नीवारुन सज्ज दशवदन सेनेपुढें आला ॥ चा० ॥ सिद्ध करुनी चाप हटकिता झाला रामातें ॥ १ ॥

### मा० प० आनंदे सुवेळेसी रघू राजः—

पुढे होउन रघुनाथें मारिले पांच बाण ॥ रावणें पांच प्रखर शर दिले सोडून ॥ रामशर झाले भग्न परी प्रभु न सोडि ठाण ॥ चा० ॥ रामें शत शर प्रेरुन रावणअस्त्रां निवारीलें ॥ २ ॥

### घनाक्षरी.

क्रोधाउनिया सौमित्र ॥ रावणचाप भग्न करित ॥ आणिक चूर्ण त्याचा रथ ॥ बिभीषण तों धावला ॥ १ ॥

### मा० प० चिंतातुरः—

बिभिषणा भीउन दडशी येउन शत्रूपृष्टीला ॥ प्रलयीं तरि मरशील कीं जगसिल सांग सत्याचे हें मजला ॥ होई एकीकडे रहा चिरंजिव क्रिया करायाला ॥ चा० ॥ लक्ष्मणावर प्रखर रावण सोडित शक्तीतें ॥ २ ॥

**पद राग पिलु ताल एका.**

दिनोद्धारा अवतार तुह्मी स्वामि रघूपती ॥ चला त्वरित म्हणुनि घेउनि जात दास मारुती ॥ ध्रु० ॥ चंद्रसेनागृहीं राम आणियेला ॥ सतीनें वंदन करुनि पूजियेला ॥ मंचकावर बसवितां स्वूपतिला ॥ तळीं मंचक कडकडुनि चूर झाला ॥ अपशकुन होतांचि राघवाला ॥ सर्व घेउनिया मारुती निघाला ॥ चाल ॥ विरहें कोपुन त्या बोले काय सती ॥ १ ॥

**मा० प० सांगेन पतिमृत्युः—**

कपटि वानरा तुझें कृत्य हें जाणिलें मीं रे मनीं ॥ पूर्ण न होतां मानस राघव जासी घेऊनी॥विरह न साहे आतां शापितें मी तुजलागूनी॥चाल॥ विष्णुदास ह्मणे झाला रघुविर तिजप्रती शांतविता ॥ ४ ॥

**॥ आर्या ॥**

बोले शांतउनी तिज भामा होशील कृष्ण अवतारीं ॥ पुरविन हेतू तेव्हां तोंवरि राहून स्वस्थ तप आचरी ॥ १ ॥

**॥ ओव्या ॥**

ठेवितां मस्तकीं कृपाहस्त ॥ रामें होत ती ध्यानस्त ॥ मग उपदेश तिज करीत ॥ धाडून देत तपातें ॥ १ ॥ मग महिकावतीराज्य ॥ करुनिया मकरध्वज ॥ निघे तेथून रामराज ॥ सुवेळेसी यावया ॥२॥

**मा० प० दिनोद्धारा अवतारः—**

रामलक्ष्मणा स्कदिं घेऊन ॥ उड्डानि उदधी ये ऐल हनूमान ॥ नळ नीळ अंगद जांबुवान ॥ सवे घेउनिया जात विवरांतून ॥ येत आनंदें सुवेळेलागून ॥ देखुन आनंदे सर्व कपीगण ॥ चाल ॥ रामचरणावरि दास लोळताती ॥ २ ॥

**॥ ओवी ॥**

कपीसह बिभीषण ॥ भेटती रघुविरालागून ॥ वर्णिती मारुतीलागून॥ आनंदूनी मग सर्व ॥ १ ॥

**पद राग सोनी ताल एका.**

आनंदें सुवेळेसि रघूराज काय बोले ॥ सुग्रिव बिभीषण कपिगण

ऐकुनी हे डोले ॥ ध्रु० ॥ युगायुगीं मारुतिराया घेतले मीं अवतार ॥ न विसरे दासा मी तुझे कृतउपकार ॥ संकटीं धावलासी बाहतां तूं सत्वर ॥ चाल ॥ राक्षस वधुनी कपिदळ मज त्वां भेटवीलें ॥ १ ॥

॥ ओव्या ॥

महिकावर्तीत हनुमंतें ॥ केले पराक्रम ते ते ॥ वर्णीतां सर्व रघुनाथें॥ सर्व स्तविती तयासी ॥ १ ॥ इकडे अहीमही वधून ॥ आला सुवेळे रघुनंदन ॥ कळतांचि हें दशानन ॥ चिंताक्रांत होतसे ॥ २ ॥

---

## शक्तिहतलक्ष्मणाऽऽख्यान.

### पद राग लीलांबरी ताल धुमाळी.

चिंतातुर रावण क्रोधावेशें बोले प्रधानातें ॥ राघव आला सुवेळेला मारुनि अहिमहितें ॥ ध्रु० ॥ त्वरें प्रचंड सेना घेउनि रावण आला युद्धाला ॥ गर्जोनि कपी असुरांवर करिती शीलावृष्टीला ॥ बाणें नीवावारून सज्ज दशवदन सेनेपुढें आला ॥ चा० ॥ सिद्ध करुनी चाप हटकिता झाला रामातें ॥ १ ॥

### मा० प० आनंदे सुवेळेसी रघू राजः—

पुढे होउन रघुनाथें मारीले पांच बाण ॥ रावणें पांच प्रखर शर दिले सोडून ॥ रामशर झाले भग्न परी प्रभु न सोडि ठाण ॥ चा० ॥ रामें शत शर प्रेरुन रावणअस्त्रां निवारीलें ॥ २ ॥

### घनाक्षरी.

क्रोधाउनिया सौमित्र ॥ रावणचाप भग्न करित ॥ आणिक चूर्ण त्याचा रथ ॥ बिभीषण तों धावला ॥ १ ॥

### मा० प० चिंतातुरः—

विभिषणा भीउन दडशी येउन शत्रूपृष्टीला ॥ प्रलयीं तरि मरशील कीं जगशिल सांग सत्याचें हें मजला ॥ होई एकीकडे रहा चिरंजिव क्रिया करायाला ॥ चा० ॥ लक्ष्मणावर प्रखर रावण सोडित शक्तीतें ॥ २ ॥

### पद राग आनंदभैरवी ताल एका.

राम रावणाचे युद्धिं जें झालें परिसावें चरित तें ॥ ध्रु० ॥ हनुमंतें देखुन शक्ति आवरिली ॥ त्वरें स्त्री ती जाहली ॥ बोले ब्रह्मचारी का त्वां धरीली ॥ कपीनें सोडिली ॥ जाउन सौमित्राचे हृदयिं रिघाली ॥ तनु त्याचि भेदिली ॥ धरेवरि तनू मूर्छित आपटली ॥ शक्ति पाताळीं गेली ॥ चा० ॥ त्रिभीषण तों काय कथित रामातें ॥ १ ॥

### पद राग भूपकल्याण ताल त्रिवट.

दास काय कथीत बिभीषण रघुरायातें ॥ ध्रु० ॥ लक्षूमणाप्रती लागली शक्ती ॥ त्वरें करा स्वामि उपाय ॥ १ ॥

### पद राग हमीर ताल त्रिवट.

गहिवरें काय बोलत रघुवीर ॥ सौमित्रातें पाहुन मुर्छित नयनीं वाहत नीर ॥ ध्रु० ॥ बाळा शब्द मशीं बोले ॥ शक्तिनें कैंचे तुज व्यापीलें ॥ मशिं कां भाषण वर्जिलें ॥ मजस्तव कष्ट बहू सोशिले ॥ चा० ॥ परिसुनि शोका ढाळिति नीर ते दुःखें पशु आणि कीर ॥ १ ॥

### मा० प० रघूविर दुःखें अनिवारः—

मुखावरी मुख टाकुनि बोले कां मज सोडुन जाशी ॥ कधिं न मोडिली मम आज्ञा त्वां बोल वत्सा रे मजशीं ॥ काय सांगु बाळा मी जाउन फिरून सुमित्रेसी ॥ चा० ॥ निवारूनि शोक आवरूनि रामा त्रिभिषण काय बोले ॥ २ ॥

### मा० प० दास काय कथीतः—

शत्रुपराभव करी बा राघवा ॥ शोक करीता हा काय ॥२॥ देतां करीं बाणचाप बिभीषण ॥ उठला क्रोधें रघुराय ॥३॥

### घनाक्षरी.

क्रोधाऊनी रघुनाथ ॥ बाण असंख्य सोडीत ॥ पाहुनि रावण पळत ॥ घाबरूनी लंकेतें ॥ १ ॥ असुरसेनाही पळत ॥ मागें राम धा- [illegible] नो येउनी लंकेत ॥ मैंजे आनंदें कथीत ॥ २ ॥
[illegible] करूनि हवन रथ ॥ कारितों निर्माण

## सारिका छंद ताल धुमाळी.

मंडोदरि बोले दशवदना ॥ व्यर्थ न करा उपाय नाना ॥ शरण जाऊन रघुनंदना ॥ स्वप्राणातें वाचवा ॥ १ ॥ न मानुनि मंडोदरिवचन ॥ करूं जाई विवरीं हवन ॥ कालनेमि असुरा बाहून ॥ काय कथित तयातें ॥ २ ॥ जाइल कपि आणाया द्रोण॥धरि मार्गीं त्या खोळंबऊन ॥ परत न येऊं दे त्यालागून ॥ सूर्यउदय होई तों ॥ ३ ॥ आज्ञा मानुनिया असूर ॥ शिष्यासह वेषीत विप्र ॥ जाउनिया गिरिमार्गावर ॥ वाट पाहे मारुतिची ॥ ४ ॥

## ॥ ओवी ॥

करून असुर पराजीत ॥ येउनि परत रघुनाथ ॥ पाहून बंधूस निचेष्टित ॥ शोक करित अपार ॥ १ ॥

## मा० प० गहिवरें काय:—

इंद्रजितासी त्वां वधुन ॥ तोषवीले बहु सुरगण ॥ ते तव तछिति कल्याण ॥ आड कां आलें हें विघ्न ॥ चा. ॥ स्तउनि गौरीधवा बोलत राघव उठवा न मज धीर ॥ २ ॥ दुरुक्तें पंचवटींत असतां ॥ बोलली तुजला जें सीता ॥ रोष तो आला काय आतां ॥ सांग होते तुज काय व्यथा ॥ चा. ॥ विष्णुदास ह्मणे शोकें मूर्छित पडे रघूवीर ॥ ३ ॥

## मा० प० दास काय कथीत:—

करुनी शांतवन उठवी रघुनंदन ॥ विष्णुदास धरि पाय ॥ ४ ॥

## ॥ आर्या ॥

पाहुनि लक्ष्मणातें बोले उठविन सुषेण रामातें ॥ पूर्वीं रविउदयाच्या द्रोणागिरी जरि आणाल हो एथें ॥ १ ॥

## मा० प० रघूविर दु:खें अनिवार:—

सुषेणभाषण परिसुनि रघुविर पाहे सर्व कपींतें ॥ तों ते खालीं उत्तर न देतां बसत घालुनि वदनातें ॥ पाहुन हें येऊन मारुती लागे रामपदातें ॥ चाल ॥ विष्णुदास ह्मणे कपी काय तो रघुरायाप्रति बोले ॥ २ ॥

## ॥ आर्या ॥

द्या आज्ञा दासाला आणूं जायास द्रोणगिरिवर्या ॥ त्वरितचि घेउन येतों पूर्वीं एथें तयास रविउदया ॥ १ ॥

## पद राग भूपकल्याण ताल अर्धधमार.

मनाहुनिगतिं उडुन मारुति जातां मार्गीं असुर त्याजला ॥ विप्रवेंषित करिति आग्रह उदकपानाला ॥ समजुनीया कपट विवशीसहित असुरांला ॥ मारूनीया त्वरित द्रोणगिरीजवळ आला ॥ १ ॥

## पद राग काफी ताल एका.

गिरीकपिभ.षण परिसि जो तयातें ॥ बाधतिल न भवभोग रोग त्यातें हो ते ॥ ध्रु० ॥ गिरीद्रोणाप्राति वदे हनूमान ॥ रामकार्या चल न करि अनमान ॥ आहे मूर्छित शक्तीनें लक्ष्मण ॥ चाल ॥ आपण यावें वा द्या हो वल्लीतें मातें ॥ १ ॥ मर्कटा ही कां फुका वेरझार ॥ केलिस जाणे न मी रामसौमित्र ॥ मी न येत न वल्लि देत जर ॥ चाल ॥ पुन्हां बोलसि तरि करिन शासनातें लाथें ॥ २ ॥ ऐकुनी हें मारुती कोप आला ॥ धरून पुच्छें त्या समुळ ऊपडीला ॥ बली झेलित कंदूकवत तयाला ॥ चाल ॥ निघे यावया घेउन सुवेळेतें त्यातें ॥ ३ ॥

## ॥ ओवी ॥

इकडे नंदिग्रामीं भरतास ॥ दुष्ट स्वप्न पडे रात्रीस ॥ भिऊनि उठून वसिष्ठास ॥ कथिता झाला तें सर्व ॥ १ ॥

## पद राग महाडजिल्हा ताल धुमाळी.

कथितां भरतें स्वप्नारिष्ट वासिष्ठाला ॥ परिहार सांगतां गुरूनी हवन तो करिता झाला ॥ ध्रु० ॥ अवचित वरूनी तों कपि जात नग घेऊनी ॥ समजुनि अरिष्ठ राघवनामा बाण सोडूनी ॥ पाडित खालीं कापितें घायाळ करूनी ॥ चाल ॥ वदे रामराम तें ऐकुन भरत संनीध आला ॥ १ ॥

## ॥ गीत ॥

देखुनि भरत हनुमंताला ॥ कोठें वीरा ह्मणे गिरीला ॥ घेउन

[illegible]रासी सांग मजला ॥ कोण्या काजासी ॥ १ ॥ वदे मारुती सौमि-[illegible]त्रातें ॥ लागुनि शक्ती सूवेळेतें ॥ पडला त्यातें उठवायातें ॥ नेतों मी न[illegible] हा ॥ २ ॥ रवि उदयापूर्वी न जाइन ॥ तरी जाइल सौमित्र-प्राण [illegible] ॥ आहे काळजी कीं पोहोंचेन ॥ कैसा गिरिसह ॥ ३ ॥

**मा० प० कथितां भरतें:—**

परिसु[illegible]नि ऐसें भरत वीर गहींवरला ॥ पुसत शोकेंकरूनी रामवृताला ॥ लज्जायुक्त होउनि बोले तो काय कपीला ॥ चा० ॥ रामबंधू मी भरत बा[illegible] धाड[illegible]तों तुजला ॥ २ ॥

**॥ गति ॥**

रामदास [illegible] हो हनुमान ॥ जातों न लागतां क्षण॥परि तुमचा राघवबाण ॥ [illegible]नि मान दिला ॥ १ ॥ आठवि सदा तुह्मां रघुनाथ ॥ भिन्न न मी उभ [illegible]यांतें मानित ॥ [illegible]भ असो द्या आज्ञा त्वरित ॥ मजसी जावया ॥ २ [illegible]॥

**मा० प० कथितां भरतें:—**

कपींद्रा सत्य आहेस तूं बलीवंत ॥ जाई आतां घेउनिया त्वरें पर्वत ॥ प्रभूपायीं सांग मम नमन खचीत ॥ चा० ॥ भरतआज्ञें कपि विष्णु-दास त्वरें चालला ॥ ३ ॥

**मा० प० मनाहुनि गति:—**

येत मारुति घेउन गिरिप्रति पाहतां रामाला ॥ वाटलें घातकी भानू ऊदया आला ॥ ह्मणे दुष्ट हा दिशा सोडुन त्वरित उगवला ॥ विष्णु-दास ह्मणे केतूबाण काढीला ॥ २ ॥

**॥ आर्या ॥**

बोले सुषेण रामा न रवि चमके गिरीवरिल वल्ली ॥ ऐकुन ऐसें रघुविर धाउनि हृदयीं कपींद्र तो कवळी ॥ १ ॥

**॥ गति ॥**

बोले रघुविर हनुमंताला ॥ श्रम झाले बहु प्रिया तुजला ॥ तुज वरोनी उतरायाला ॥ अल्प मोल जिव हा ॥ १ ॥ वल्लीरस सूषेणें पा-

ज्जुन ॥ उठवी लक्ष्मणासह कपीगण॥आनंदोनी रघुनंदन ॥ बोले उ
मंता ॥ २ ॥ आतां नेउन ठेवी पर्वत॥ऐकून मारुति त्वरें निघत॥मागे
बहु असुरांतें मारित ॥ पर्वत ठेउन ये ॥ ३ ॥

**सारिकाछंद ताल धुमाळी.**

हस्त जोडुन मग हनुमान ॥ सांगे रघुराया वर्तमान ॥ भरता क
डलि तें ऐकून ॥ रघुरायासी प्रेम ये ॥ १ ॥ केव्हां पाहिन माझ्य
बाळा ॥ प्रेमेंकरूनीया स्नेहाळा ॥ बोले राम हनुमंताला ॥ तों ये
तेथें बिभीषण ॥ २ ॥

---

# रावणनिधन, विभीषणाचें लंकेंत आगमन आणि राज्यीं स्थापना.

**पद राग यमन ताल धुमाळी.**

बिभिषण बोलत रघूपती परिसा दासाची विनती ॥ ध्रु० ॥ इंद्र
जीता ऐसें हवन लंकेंत करित दशवदन ॥ रथार्ध झालें उत्पन्न पू
होतां होईल कठिण ॥ तरि अगोदरचि त्वरेंकरून जा टाका विध्वंसू
॥ चा० ॥ ऐकुनी ऊठत जुत्पती ॥ १ ॥

**पद राग झोंमी ताल धुमाळी.**

ऐकोनी हें वचन कोपें धावती वानर ॥ ध्रु० ॥ घेउनि प्रचंड वृक्ष
शिळा ॥ वंदुनि निघती जगत्पाळा ॥ त्वरीत गतिनें ते लंकेला ॥चा०
ज्यापुढें पळे काय समिर ॥ १ ॥ नळ निळ अंगद जांबुवंत ॥ पाव
लोचन गव्य हनुमंत ॥ गवाक्ष गंधमादन सहित ॥ चा० ॥ घेउनि
संगें कपिभार ॥ २ ॥ शिरती नगरीं कपिगण ॥ शोधिति घरोघ
रावण ॥ नकळे परि त्या कोठें हवन ॥ चा० ॥ करीत स्थानीं
असुर ॥ ३ ॥

**॥ आर्या ॥**

दाखावि कपिते शर्मा स्थळ जेथें कारि दशास्य तो हवन ॥ मार्ग
रक्षक असुरां शिरती कपि आंत द्वार फोडून ॥ १ ॥

**मा० प० ऐकोनी हें वचन:—**

विवरीं सर्व मग शिरून ॥ टाकिति होमद्रव्य नासून ॥ हणितां कुंडा-वरि पाषाण ॥ चा० ॥ गिळि तो अग्नी रहिवर ॥ ४ ॥ रावण सावध न पाहून ॥ फेडुनि वस्त्रें करीत नग्न ॥ अंगद राणीवशिं जाऊन ॥ चा० ॥ आणि मंडोदरि सत्वर ॥ ५ ॥ करुनीया मग तिजसी नग्न ॥ देती रावणावरि ढकलून ॥ रडत मैजा तें ऐकून ॥ चा० ॥ येई रावण शुद्धिवर ॥६॥ पाहुनि विपरित क्रोधें हणुन ॥ थपडा पळवी वानरगण ॥ कथिती रामातें येऊन ॥ चा० ॥ झालें वृत्त सत्वर ॥ ७ ॥

**सारिकाछंद ताल धुमाळी.**

करी इकडे तो रावण ॥ स्वप्रियेचें समाधान ॥ ह्मणे प्राक्तनभोग दारुण ॥ कोणा न चुके कल्पांतीं ॥ १ ॥ वेळ साधिली आजि दु-ष्टांनीं ॥ हवन टाकिलें विध्वंसूनी ॥ कार्यारंभीं विघ्न येउनी ॥ मातें त्यातें जय आला ॥ २ ॥

**पद राग जोगी ताल धुमाळी.**

कोपूनी रावण बोलला जातां सिद्ध युद्धाला ॥ ध्रु० ॥ मैजे तूं जाय-गृहासी ॥ आज मी वधुन येतों शत्रूसी ॥ नातर मुख न दाविन तुजसी ॥ चा० ॥ समजाउन पाठवील तिजला ॥ १ ॥ मग घेउनी रजनी-चर ॥ वाजवीत रणवाद्यें घोर ॥ निघती किंकिकाटत असूर ॥ चा० ॥ रणांगणीं सुवेळे आला ॥ २ ॥

**मा० प० ऐकोनी हें वचन:—**

आला पाहुनि राक्षसभार ॥ शिळावृष्टी ती अनिवार ॥ करिते झाले प्लु-वंगवीर ॥ चाल ॥ रावण धावे त्यांजवर ॥ ८ ॥

**मा० प० कोपूनी रावण:—**

सज्ज करूनी चापातें ॥ सिोडि बाणें रावण वानरांतें ॥ पाडी लोळत क्षितीवरतें ॥ चाल ॥ ऐसें पाहुनि राम पुढें आला ॥ ३ ॥

**पद राग खमाज ताल एका.**

देखूनि रणीं रावणासि क्रोध अनीवार ॥ येउनि त्या रघुविरास बो-

लत रणधीर ॥ ध्रु० ॥ परोपरि आजवरी व्यर्थ तुज मीं बोधिलें ॥ ने
णुनि खरालागि चंदनास वाहिलें ॥ वेदांचि खंडें करून ज्ञान व्य
र्थ जाहलें ॥ चाल ॥ प्राणहरक साहि बाण रे हे अनीवार ॥ १ ॥

पद राग काफी ताल त्रिवट.

व्यर्थ गर्वोक्ते न वदे मानवा किशोरा ॥ रावण बोलतसे रघुवीरा
॥ ध्रु० ॥ दळासह प्रधान आणि मम कुमर ॥ मारुनीया मानीत अ
सशील वीर ॥ ॥ शर साहि आतां रे मम प्रखर ॥ हो सिद्ध आतां
पहा चमत्कार ॥ चाल ॥ किंवा जा पळ सोडुनिया समरा ॥ १
सीता आणिली जी ती तव दृष्टीस ॥ न पडेल पुन्हां हें जाण खास
न सोडि व्याघ्र हा कदा मृगीस॥जा येथुन रे वाचवि प्राणास ॥ चा.
भेट आनंदें स्वमातापितरां ॥२॥ हा पश्चिमेस उगवेल तरणी ॥ म
शक ही उचालिल रे धरणी॥परि न मिळे सीता तुजलागुनी ॥ विष्णु
दास ह्मणे हें वच ऐकुनी ॥ चाल ॥ कोप येउन बोले काय रण
धिरा ॥ ३ ॥

मा० प० देखूनि रणीं रावणा:--

बडबड न करि मृत्यु समिप आला रावणा ॥ साहीले आजवरि अपरा
धा मीं नाना ॥ शर साहि आतां माझे प्रखर न करि वल्गना ॥ चाल
चाप सज्ज करुनि बाण सोडित बहु बीर ॥ २ ॥

मा० प० रामरावणाचे युद्ध:--

बाण सोडि रघुवीर कोपुन ॥ निवारुनी रावण ॥ सर्पअस्त्र प्रेरि वेगें व
रुन ॥ वानर टाकि खिळून ॥ गरुडास्त्र योजि रघूनंदन ॥ सर्प क
तें भषण ॥ असुर प्रेरि जातवेद कोपुन ॥ करि राम निवारण॥चा०॥म
वातअस्त्र त्यावरि सोडिलें ॥ २ ॥ रामें पाषाण वेगें हाणिलें ॥ व
रावणें निवारिलें ॥ रामावरि भानुमूख सोडिलें ॥ बाणें तेणें वारिलें
परी वामपदालागि लागलें ॥ ऐसें रण माजलें ॥ रणीं पडल्या शस्त्रा
टोचिलें ॥ कपिगणीं त्या भलें ॥चा.॥ रावण पळवी मारुनि तयांतें॥ ३

॥ ओवी ॥

तो स्वर्गी अमरनाथ ॥ बृहस्पतीस काय वदत ॥ सुरकाजीं र
श्रमत ॥ करूं सहाय तयातें ॥ १ ॥

### पद राग यमन ताल त्रिवट.

बोले इंद्र बसायातें धाडूं गुरु रथ रणि रघुपतितें ॥ ध्रु० ॥ बाहुनि मातलिस सिद्ध करुनी रथास ॥ घेउनि शस्त्रास्त्रास जा ह्मणे त्वरित सुवेळेतें ॥ १ ॥ आज्ञा वंदुन रहिवर घेउन ॥ रणांगणीं येउन वंदुनि वदत राघवातें ॥ १ ॥ देवेंद्रें शस्त्रसहित सेवें आपल्या रथ ॥ देउनी मजसहित धाडिलें एथें सूरपतें ॥ ३ ॥ स्तउनी देवेंद्रास मान्य करुनी वचास ॥ वंदुनि रथास ह्मणे विष्णुदास बसे वरतें ॥ ४ ॥

### ॥ कटाव ॥

पाहूनी रथिं रामातें रावणा दुःख बहु जाहलें ॥ ध्रु० ॥ दांत खात मग क्रोधें करकर ॥ रघुवीरावरि सोडी बहु शर ॥ निवारीत राम ते सत्वर ॥ ऐसें रण माजलें भयंकर ॥ बाणें व्यापे दिशाअंबर ॥ अड-खळे वाहातां समीर ॥ मार्ग न थांबाति शशी मित्र ॥ प्रलयें उर्वी कापे थरथर ॥ बसुनि विमानीं पळती सुरवर ॥ दाणादाण बहूत होत ॥ कपी असुर ते भयें पळत ॥ भेरी धो धो नादें गर्जत ॥ भयंकर रणवाद्यें वाजत ॥ शिरें बहुत अंबरीं उडत ॥ कबंदें नाचति अगणीत ॥ समरी दोघे निकरें लढत ॥ असंख्य दल पडलें रणांत ॥ चतुर मातलीनें त्वरीत ॥ श्रमला पाहुनिया रघुनाथ ॥ चाल ॥ क्षणभर विश्रां-तीतें स्यंदनास मागें आणिलें ॥ १ ॥

### मा० प० देखुनि रणीं:—

रघुवीरें मग चार बाण प्रखर सोडिले ॥ रावण रथअश्व चार त्वरें मा-रिले ॥ नूतन तुरग रावणानें पुन्हां जोडिले ॥ चाल ॥ विष्णुदास ह्मणे राम कोपे अनीवार ॥ ३ ॥

### श्लोक चामर.

बाण अर्धचंद्र राघवें तयास मारिला ॥ छेदि तो दशास्य मस्तका किरीटकुंडलां ॥ येत त्या धडास तीं पुन्हां शिरें जशीं तशीं ॥ देखुनी बसे बहूत खिन्न स्वस्थ मानसीं ॥ १ ॥

### ॥ आर्या ॥

बोले मातालि रामा बसतां कां खिन्न मारुनी बाण॥मारा असुरा ह्र-दयीं अमृतकुप्पी त्वरीत भंगून ॥ १ ॥

### पद राग कालंगडा ताल एका.

अगस्तिदत्तबाण रामभद्रें काढुनी ॥ केला सिद्ध देवतांचि शक्ति वरि स्थापुनी ॥ १ ॥ आग्रें ब्रह्मअस्त्र मंत्रुनी तयाच्या स्थापिलें ॥ प्रलयभय तेज पाहुनी ॥ सर्वांसि वाटलें ॥ २ ॥ बिभीषणावाचोनीया सर्व वीर पळुनी ॥ बैसले गीरीकंदरीं भयेंकरुनि लपुनी ॥ ३ ॥ योजितां धनूस त्यास रामकार्णि येउनी ॥ सुधाकुपीसहीत बोले नेतों प्राण हरुनी ॥४॥ सोडितां तयास अमृतासहीत त्रयाशिरें ॥ छेदुनी पुन्हां परत रामतूणिं तो शिरे ॥ ५ ॥ छेदायास अन्य शिरां रामें बाण काढिला ॥ वारुनी तयास काय लक्ष्मण बोलला ॥ ६ ॥

### मा० प० सौमित्रवीरः—

न शिवेत आमचे बाण रावणें प्राण सोडिला ॥ आनां पुरे करा युद्ध जाऊं पाहुं त्याजला ॥ सांगोनि ऐसें रामक्रोध सौमित्रें अवरिला ॥चा०॥ विष्णुदास ह्मणे राम शांत जाहला ॥ ३ ॥

### सारिकाछंद ताल धुमाळी.

बंधूहातीं चाप तूण ॥ देउनि बोले रघुनंदन ॥ सरलें अवतार कारण ॥ पाहूं चल रावणा ॥ १ ॥ मग ते येती सर्वजण ॥ पाहूं रावणालागून ॥ हृदयीं बाणाछिद्र पाहून ॥ बहु आश्चर्य करीत ॥ २ ॥

### ॥ गीत ॥

दुःखित बिभिषण होऊनी ॥ ह्मणे कैचें मज सोडूनी ॥ गेला बंधू स्वर्गालागुनि ॥ शोकें अनिवार ॥ १ ॥ बहू प्रतापी बळी वीर ॥ संतति संपाति हो अनिवार ॥ परि अज्ञानें बुडूनि झडकर ॥ गेलें सर्व कीं॥२॥ राघव शांतवीत तयातें॥आली तों मंडोदरि तेथें ॥ अनीवार करि शोकातें ॥ कवळूनी पतिला ॥ ३ ॥ राम बिभीषण समजाऊनी ॥ धाडिति तिजला लंकेलागुनी ॥ और्ध्वदेहिक बंधूचें करुनी बिभीषण आला ॥४॥

### सारिकाछंद ताल धुमाळी.

तों विद्युजिव्हा प्रधान ॥ आला घेउनि उरलें सैन्य ॥ नगरवासिसह रामाशरण ॥ तेणें त्यातें गौरविला ॥१॥ मग बोले बिभीषणातें ॥ स्वस्थ राज्य करी लंकेतें ॥ केलें वचन म्यां तव पुरतें ॥ आणी तैसें सुरकाज ॥२॥

**पद राग मुलतानीधनाश्री ताल धुमाळी.**

नलगे राज्य मला बिभिषण बोलत रघुपतिला ॥ ध्रु० ॥ राज्यार्थीं हे पाय अंतरती वाटत दुःख मला ॥ १ ॥ सेवा निशिदिनीं करीन आपली अन्य नको मजला ॥ २ ॥

**॥ साकी ॥**

सुमुहुर्तानें लंकेमाजी करुनि मंगलस्नान ॥ अद्दा राज्यीं चला विनवि तो किंकर हात जोडून ॥ १ ॥

**पद राग सोरट ताल धुमाळी.**

रघुवीर बिभिषणास काय बोले ॥ न करि आग्रह ऐकचित्त देउन आपलें ॥ ध्रु० ॥ प्राणप्रीय भरताचे भेटीवीण ॥ मी न कदां करीन मंगलस्नान ॥ विरहदुःखें गहिवर आतें येऊन ॥ चा० ॥ येउन नगरामाजीं जें त्यां तूज दीधलें॥१॥पट्टाभीषेक करीतों मी तूज त्वरीत ॥ आग्रह न धरि किमपी मानसांत ॥ सुरवरांतें करी त्वरें बंदमुक्त ॥ चा० ॥ रामआज्ञेलागि बिभीषणें वंदीलें ॥२॥ रावणानें बहुतांच्या वस्तू हीरून ॥ ठेवील्या त्या ज्यांच्या त्यांस देऊन ॥ शास्त्ररीतीं करी प्रजेचें पालन ॥चा०॥ विष्णूदास ह्मणे बिभीषणें मान्य तें केलें ॥ ३ ॥

**मा० प० नलगे राज्यः—**

आज्ञा वंदुनि निघतां गहिंवर आला उभयांला ॥ ३ ॥

**ओवी.**

सौमित्र सुग्रिव हनुमंतातें ॥ बोले राम ह्या लंकेतें ॥ सुमुहुर्तानें राज्यावरतें ॥ जाउनि स्थापा बिभीषणा ॥ १ ॥

**मा० प० नलगे राज्यः—**

विष्णुदास ह्मणे बिभीषणासह निघती लंकेला ॥ ४ ॥

---

# सुरबंधमोचन, भरतभेट आणि रामास राज्याभिषेक.

### पद राग झिंजोटी ताल धुमाळी.

लंकापटिं स्थापियला बिभीषणा सुग्रिव सौमित्रानें सुमुहुर्ते ॥ ध्रु० ॥ गौरउनी नूतन लंकापति सोडित त्वरीत सूरवरांतें ॥ १ ॥ परवस्तू रावणें जित त्या देउन टाकी ज्यांच्या त्यांतें ॥ २ ॥ परोपरी तोषवी बिभीषण सौमित्र, सुग्रिव, हनुमंतातें ॥ ३ ॥ बोळउनी मग तीघां राज्य यथान्यायें चालवीत तें ॥ ४ ॥

### पद राग गुणकली ताल धुमाळी.

राज्यीं स्थापुन बिभीषणा लक्ष्मण येत सुवेळेतें ॥ ध्रु० ॥ सुग्रिव मारुति ज्याच्यासहीत ॥ कथीत रामा सकळ वृत्त ॥ सुरवर सर्व तों शीवसहीत ॥ येउनि भेटाति रामातें ॥ १ ॥

### पद राग कमोदकल्याण ताल धुमाळी.

सुवेळे बंदमुक्त सुरवर आले रघुविरास भेटले ॥ ध्रु० ॥ संकटिं आम्हि जाणुनिया रघूविरा ॥ धरिलें त्वां अवतारा ॥ मारुनि दुष्ट असुरसह असुरेंद्रा ॥ केला गोद्विजा थारा ॥ श्रमला आह्मांस्तव बहु सीतावरा॥पार नसे उपकारा ॥ चा० ॥ दिनास्तव स्वामि कष्ट तुह्मां झाले ॥ प्रेमें पदिं लागले ॥ १ ॥

### ॥ ओव्या ॥

रघुविरातें सुरवर स्तविती ॥ अप्सरा आनंदें नाचती ॥ मंगलवाद्यें मधुर वाजती ॥ आनंद झाला सर्वांसी ॥ १ ॥ तंव मनीं हनुमान ह्मणे राम कां मज अजून ॥ न सांगे आणू सीतेलागुन ॥ तों राम काय वदे ॥ २ ॥

### पद राग झिंजोटी ताल एका.

दासअंतर जाणूनि दिनोद्धार रघुपती ॥ बोलाऊनि मारुती कथित काय सापती ॥ ध्रु० ॥ दासा जा आणी त्वरित प्रिये सीतेलागुन ॥

बिभिषणास कथुन मंगलस्नान घालुन ॥ चा० ॥ आज्ञा घेउनिया यें-उनि कथी बिभिषणाप्रती ॥ १ ॥ मग बिभीषण घेऊनि सर्वे मंगलस्नान ॥ साहित्य वस्त्राभरणें अशोक वनिंयेउन ॥ चा० ॥ सर्व वृत्त कथन जानकीस दास करिती ॥ २ ॥

### पद राग खमाज ताल त्रिवट.

आनंदली बहू जानकी तीं मनीं॥ दशवदननिधन झालें ऐकूनी ॥ध्रु०॥ गौरउनी बिभिषण मारुतिप्रतीं ॥ मान्य करी दासवच जननी ॥ १ ॥ आनंदुनि मग शर्मा त्रिजटा ॥ सुवासीक अंगा लावित उटणी ॥ २ ॥ घालुनि मंगलस्नान तियेतें ॥ सजविती वस्त्राभरणेंकरुनी ॥ ३ ॥ विरहदुःखें ह्मणे जानकि त्यांतें ॥ पाहिन आतां तुह्मां कधीं फिरुनी ॥ ४ ॥ आच्छादित शिविकेंत सुखासनीं ॥ बसउनि वाजत जात घेऊनी ॥५॥ विष्णुदास ह्मणे पाहुनि कपी त्यां ॥ आडावित जाऊनी दंडें करुनी ॥ ६ ॥

### ॥ ओव्या ॥

निवारुनिया रामें त्यांस॥आला भेटाया सीतेस॥तों ती सोडुनि यानास॥ पहात लज्जित स्वप्रिया ॥१॥ रूपदीप्ती पाहूनि मनीं ॥ म्हणती सुरवर हिजलागूनी ॥ कैचा राहिला रावण सोडूनी ॥ स्पर्शिल्यावीण ही शंका ॥ २ ॥

### पद राग मल्हार ताल त्रिवट.

आणितां सीते हनुमंतें लंकेतून ॥ जाणुन सुरवरमानस काय तियेप्रति बोलत रघुनंदन ॥ ध्रु० ॥ सोडी सीते आमच्या तूं संगतीतें ॥ श्रम बहु झाले आजवरी मजसंगातें ॥ आतां करी इच्छीत तूज जें तें ॥ चा० ॥ राक्षस वधुनी सोडवीलें तूज बंदांतून ॥ १ ॥

### पद राग पिलु ताल दीपचंदी.

सीता बोलत काय विस्मयें दुःखीत मनीं प्रीय रघूपतीसीं ॥ बद्धाजुलि नमूनीया ऐकतां रामनिष्ठुरवचनासी ॥ ध्रु० ॥ वाटे आकाश कोसळलें अंगावरी दुःखें पडत धरणीसी ॥ श्रेष्ठ सुरवरां वानरां अकांत भासला मूर्छीत पाहूनी तिजसी ॥ कांहीं कालें सावध होऊनीया गडबडा लोळत चरणापाशीं ॥ चा० ॥ वाहे नेत्रांतूनी विमलाश्रूधारा टपटप

ही धरणीसी ॥ १ ॥ भोगूनी कष्ट आजवरी पावलें चरणासंनिध दी-मानाथा ॥ अजुन न सुटे कर्म कांहो दुरूक्तें ताडीतां अन्याय मजकडे नसतां ॥ प्रलयाग्नींतूनीं मंज काढून पुनरपी सागरीं कां लोटीता ॥ चाल ॥ आपल्या हातें मारूनी टाका मज तरी एकदां सुटेन भव-पाशीं ॥ २ ॥ जलचरांवरी नीर कोपलें तरी सांगा कोठें जावें त्यांनीं ॥ सांगा राहील कैचें मज प्रीया तरी तेज दीपा सोडूनी॥अग्नी चेतवा दिव्य करीतें पूत मी उडी त्यांत टाकूनी ॥ चाल ॥ चेतवीला अग्नी सांगूनी रामें त्वरें करून वानरांसीं॥ ३ ॥ जरी सत्य पूत मी दिव्य हें करीतें प्रीया तुह्मा स्मरूनी ॥ कंन्या गांजीत पाहून कापत मेदीनीं भ्याले सर्व देवमूनी ॥ जांबुवंत नळ नीळ मारुती रूदत प्रलय ऐसा पाहूनी ॥ चाल ॥ मग ती सीतासती स्मरूनी रघूपती अग्नींत टाकी उडीसी ॥ ४ ॥

॥ अभंग ॥

पाहुन ऐसें सुरवानर ॥ शोक करीती अपार ॥ तों एक क्षणानंतर॥ पूर्विंहूनी रूप सुंदर ॥ गळां टवटवीत हार ॥ येत ऐशि सिता बाहेर ॥ कपी सूर आनंदीत ॥ धाउंन राम प्रिये भेटत ॥ प्रेमें घेत अंकावरी ॥ विष्णुदास स्तविती भारी ॥ १ ॥

मा० प० सुवेळे वंदमुक्तः—

शिव ह्मणे प्यालों जयीं हलाहलातें ॥ तव स्मरणें सितिल तें ॥ झालें काय वर्णु एक्या मुखें तें ॥ जावें अयोध्येतें ॥ भावें नमीत ब्रह्मा ताता-तें ॥ स्तडाने निघे जायातें ॥ उपकार इंद्र ह्मणे मजवर झाले ॥ सांगा काज कांहिं आपुले ॥ २ ॥

॥ आर्या ॥

समया रथ तव आला झाला उपकार फार मजवरती ॥ आणखी प्रिय करूं इच्छिसी तरि उठवी युद्धिं मर्कटें मृत तीं ॥ १ ॥

सारिका छंद ताल धुमाळी.

आज्ञा वंदूनी देवेंद्र ॥ करूनी सुधावृष्टि सत्वर ॥ उठवीले ते सर्व वानर ॥ जेवी निद्रेतुन जागे ॥ १ ॥ नंतर राम बिभीषणास ॥ बोले

आतां अयोध्येस ॥ जातों तूं जाई लंकेस ॥ राज्य करी नीतीनें ॥ २ ॥ तो ह्मणे तुह्मांतें पोहोंचउन ॥ नंतर येइन मी परतून॥पुष्पकविमान मग आणून ॥ केलें सिद्ध बिभिषणें ॥ ३ ॥ राम सीता लक्ष्मण ॥ बसती वीमानीं वंदून ॥ बिभिषण मारुति कपीगण ॥ सहीत निघती अयोध्ये ॥ ४ ॥

## पद राग भूप ताल त्रिवट.

रघुवीर पुष्पकवीमानीं सेनेसह बैसुनि जात अयोध्येस ॥ ध्रु० ॥ जें विशेष ज्या ज्या स्थानीं झालें तें तें प्रेमें कथुनी ॥ दाखवीत आनंदुनी राम स्वप्रीयेस ॥ १ ॥ पाहे प्रीये लंकाभुवन निकुंबळा गे हें स्थान ॥ इंद्रजीताचें नीधन झालें या ठायास ॥ २ ॥ सुवेळा हें रणांगण येथें मारीला रावण ॥ पहा हा सेतू येथें बांधीला सागरास ॥ ३ ॥ मलयाचळ विंध्याचळ पहा हें किस्किंदानगर ॥ दिलें मारून वालीस राज्य हें सुग्रिवास ॥ ४ ॥ पंपा, गौतमी हा तीर मारीला दूषण खर ॥ पंचवटीं, मनकर्णीका, मुनी आश्रमास ॥ ५ ॥ विष्णुदास ह्मणे मग वर्णन करूनी बहू ॥ आर्यावर्तीं ऋष्याश्रम दाखवीत सीतेस ॥ ६ ॥

## ॥ साक्या ॥

प्रिये पहा हा अगस्तिआश्रम पैल कदलीवन ॥ भारद्वाजमठ मंदकीर्ण मुनिचें हें तपोवन ॥ चा० ॥ गूहक प्रीय सखा राहे याच शृंग बेळीं ॥ १ ॥ पहा पैल तें नंदिग्राम तेथें माझा भरत ॥ असेल सखये मम भेटीतें बाल काल मोजीत ॥ चा० ॥ पुढें पुण्यपुरी पहा अयोध्यानगरी ॥ २ ॥ येतां अगस्ति आश्रमसंनिध बोले राम प्रियेला ॥ पुसल्या तुज लोपामुद्रेनें सांग वृत्त तव तिजला ॥ चा० ॥ सेतुबंधन नं कथी आणिल मज न्यून ॥ ३ ॥

## ॥ अभंग ॥

जाणुनीया राममन येत विमान उतरून ॥ शिष्य सांगत अगस्तीस आले राम भेटायास ॥ ऐकुनी मुनि वर्तमान कवळी धाउन जगजीवन ॥ १ ॥

## ॥ आर्या ॥

बोले राम मुनीतें केला पूर्वी कथा आनादर कां ॥ आतां येउन प्रेमें

कां मज आलिंगिलें आली शंका ॥ १ ॥ शक्तीसह तूं आतां बोले मुने ह्मणुनिया बहू मानें ॥ भेटाया तुज आलों केला तुज सगुण या सितासतिनें ॥ २ ॥

॥ ओवी ॥

गौरवी मुनी रामातें ॥ भेटे लोपामुद्रा सीते॥ती ह्मणे सांग सखे मातें ॥ सर्व वृत्त झालें जें ॥ १ ॥

**पद राग काफी ताल दीपचंदी.**

कथी जानकी लोपामुद्रेसी ॥ वृत्त सर्व प्रेमें सद्गद मानसीं ॥ ध्रु० ॥ सखे रावणें मजलागून॥नेली कपटें पंचवटीहून ॥ शोध हनुमंता करवी करून ॥ आला राम सेतू बांधऊन ॥ चा० ॥ वृत्त विसरूनि सांगे हें मुनीस्त्रीसी ॥ १ ॥ मग सुवेळेलागी आला ॥ मारिले असुरां, रावणाला ॥ बिक्षीषणा लंकाराज केला ॥ घेउन पुष्पक अयोध्येला ॥चा०॥ निघालों सखये आह्मीं स्वनगरासी ॥ २ ॥

**श्लोक शुद्धकामदा.**

वदत जानकीतें ऋषिप्रिया ॥ शिणाविलें वृथा कां कपींस या ॥ अटविला निधी प्राणजीवनें ॥ अचमनें सखे सत्य गे क्षणें ॥ २ ॥

**मा. प. कथी जानकी:—**

विचारें तीज उत्तर देत ॥ ह्मणे तूझ्या पतीचें मूत्र ॥ शिवतील न वानर पूत ॥ ऐकोनी हो मुनीस्त्री लज्जीत ॥ चा० ॥ गौरवि विष्णूदास मुनीस्त्री तिजसी ॥ ३ ॥

**सारिकाछंद ताल धुमाळी.**

ऋषीआज्ञे यानिं बसून ॥ भारद्वाजाश्रामीं येऊन ॥ भेटुन त्यातें आग्रहें करून ॥ राहती सर्व आश्रमीं ॥ १ ॥ सांगे राम हनुमंतास ॥ येतों उद्या मी भेटीस ॥ जाउन भरत गूहकास ॥ सांग ह्मणतां तो निघे ॥ २ ॥ इकडे भरत दुःखेंकरून ॥ चौदा वर्षें चौदा दीन ॥ वाट रामाची पाहून ॥ प्राण द्याया सिद्ध हो ॥ ३ ॥ कुंडीं वैश्वानर चेतउन ॥ मनीं करीत रामस्मरण ॥ सिद्ध झाला द्याया प्राण ॥ काय पुढें तों वर्तलें ॥ ४ ॥ मारुति कळउन गूहकास ॥ आला त्वरें नंदिग्रामास ॥ पडतां विपरित हें दृष्टीस ॥ ह्मणे भरता राम आला ॥ ५ ॥

### पद राग झिंझोटी ताल त्रिवट.

परिसुनि मारुतिच्या वचनातें काय भरत ह्मणत परिसा त्यातें ॥ अहा !! प्राणअंतीं सखया पाजिलें अमृतातें ॥ ध्रु० कोठें सांग दीनदयाळु माझा कृपासिंधु रघुनंदन ॥ आलिंगुनि मारुतितें भरतें प्रेमें पुसलें वर्तमान ॥ सुवार्ता आणिली ही कपींद्रा कोठें सांग आहे दयाघन ॥ चा० ॥ निर्जळिं मीनापरि मी तळमळे काथि जगजीवनवार्तेतें ॥१॥

### ॥ ओव्या ॥

वदे मारुति भरतास ॥ आला जवळ जगन्निवास ॥ धाडिलें मातें कळवायास ॥ उद्यां भेटेल तुह्मांतें ॥ १ ॥ हर्षूनि मनीं भरत वीर॥बोले शत्रुघ्नातें सत्वर ॥ सांग नगरीं जा समाचार ॥ गुरु सुमंतादिकांतें॥२॥

### घनाक्षरी.

येऊनीया अयोध्येस ॥ कथितां वृत्त सुमंतास ॥ कळुनि नगरीजनांस ॥ आनंद होत चहूंकडे ॥ १ ॥ गुढ्या तोरणें उभारून ॥ घालिति कुंकुमचंदन ॥ सडे सर्व नगरांतून॥शृंगारीत सौधही ॥ २ ॥ वस्त्राभरणें लेऊन ॥ नगरनारी नटून ॥ ताटीं आरत्या घेऊन ॥ निघत पुढें सामोऱ्या ॥ ३ ॥ कळवितां सुमित्रे कौसल्येस ॥ आनंद न माये त्यांस ॥ निघती घेउन दलभारास ॥ रघुविरास सामोरे ॥ ४ ॥

### मा. प. परिसुनि मारुतिच्याः—

इकडे मारुती भरत त्वरित गतीं प्रातःकाळीं मग उठुन ॥ नित्य नियम सारुनिया निघती पहाया रघुवीरचरण ॥ तों येतां तें यान वरूनी भरत पुसे कपिलागून ॥ चा० ॥ स्वामी विमानसह रघुपती येत ह्मणत मारुति त्यातें ॥ २ ॥ उर्ध्व दृष्टि लागाले भरताची चकोर पाहे जसा चंद्रास ॥ तों स्वामीचें यान येउनी त्वरें उतरलें ऊर्वीस ॥ लोळत चरणीं गूहक भरत पार नसे आनंदास ॥ चा० ॥ जैशी बाळें स्फुंदत स्फुंदत येती भेटूं मातेतें ॥ ३ ॥

### ॥ अभंग ॥

प्रेम न आवरे रघुरायातें ॥ त्वरें आलिंगी भरतातें ॥ कुरवाळूनी वत्सवदन॥ह्मणे भागलासि बहु दीन ॥ नयनीं प्रेमाश्रू चालले ॥ तेणें ताहुलें माखलें ॥ स्फुंदस्फुंदूनी भरत ॥ रघुराया काय ह्मणत ॥ १ ॥

**पद राग देस ताल धुमाळी.**

राम प्रेमाची माऊली वत्सभेटी भरत ह्मणे धावलीस माय ॥ ध्रु० ॥ भरतें रघुवीरा देखून ॥ घाली चरणीं लोटांगण ॥ क्षाली नेत्रोदकें रामचरण ॥ चा० ॥ प्रभू चरणावरूनी वत्स उचली ॥ १ ॥

**॥ आर्या ॥**

राम ह्मणे हे वत्सा सात्विक प्रेमळ तुझ्यापरी जगतीं ॥ नाहीं; मम ध्यासानें बाळा तूं वाळलासि रे कीतीं ॥ १ ॥

**घनाक्षरी.**

झालें भरतशांतवन ॥ भेटत सुग्रिव बिभीषण ॥ आणि लक्ष्मणाला-गून॥जानकीस वंदि तो॥१॥गुहक वंदि रामचरण॥रामें त्यातें आलिंगून॥ मग सर्व मीळून ॥ अयोध्येस नीघती ॥ २ ॥

**॥ कटाव ॥**

बहु थाटें रघुनाथातें सामोरा रिपुघ्न येत ॥ ध्रु० ॥ सुमंत नागरिक दळसहीत ॥ बसुनि सुखासनिं माता त्वरित ॥ गुरुवसिष्ठांसहीत येत ॥ सोळा पद्में सैन्य चालत ॥ गज रथ कुंजरभार धांवत ॥ असंख्य वाद्यें सुस्वर वाजत ॥ वेत्रधार किति लाखोगणित ॥ भाट त्यांमधिं थाट व-र्णित ॥ हिरेजडित अंबाऱ्या झुलत ॥ अश्वपती थाटानें चालत ॥ शेष वार्णितां होय थक्कित ॥ चाल ॥ पाहूनि दूर ध्वज राम भरता काय हें पुसत ॥ १ ॥

**॥ अभंग ॥**

बंधुराया जें हें येत ॥ गुरु मातां प्रजेसहित ॥ येत तुम्हां भेटायास॥ रिपुघ्न हो आपणास ॥ ऐकतां हें त्वरें धाऊन ॥ आलिंगीत बंधुला-गूनं ॥ मग वंदूनी गुरूस ॥ लागे मातेच्या चरणास ॥ १ ॥

**पद राग भैरव ताल त्रिवट.**

बोले कौसल्या आलिंगुनि रघूनाथा ॥ वत्सा माझ्या आत्मारामा आ-लासी आतां ॥ ध्रु० ॥ कुरवाळी बाळवदन माता नेत्रीं निर आणून ॥ प्रेमाश्रूनें तों भिजला मातेच्या तो रघुनंदन ॥ फार सुदीन आजी पुत्रा देखीलें हें वदन ॥चाल॥ सुमित्रा कैकयीतें राम मग झाला वंदीत॥१॥

॥ गीत ॥

वदे सुमित्रा रघुरायातें ॥ कष्ट झाले फार तूंतें ॥ परि भाग्यें जोडूनि यशातें ॥ भेटलासि आम्हां ॥ १ ॥ नमितां रामें कैकयीस ॥ बोले आलिंगुनी तयास ॥ सुरकार्जीं आलें तुज यश ॥ झालें अपयशि मी ॥ २ ॥ सितें वंदितां कौसल्येसी ॥ प्रेमें आलिंगी हृदयासी ॥ घालुनिया स्वहार तिजसी ॥ ह्मणे भागलीस ॥ ३ ॥ मग वंदितां सुमित्रेसी ॥ कुरवाळुनि ती वदे तीजसी ॥ श्रमलीस गे तूं वनवासीं ॥ सुखी आतां होई ॥ ४ ॥ ह्मणे कैकयी तीस वंदितां ॥ वय लहान गे बाळे असतां ॥ भोगिलीस रावण संपदा ॥ रामा श्रमवीला ॥ ५ ॥ लज्जित सिता उत्तर दे न ॥ बसे श्वश्रुशीबिकेंत जाउन ॥ तों वंदी येउन लक्ष्मण ॥ कौसल्येलागी ॥ ६ ॥

ओवी.

हृदयीं त्यातें आलिंगून ॥ ह्मणे भागलासी प्रियप्राण ॥ खरा बंधू तूं सुगुण ॥ मग तो वंदी सुमित्रे ॥ १ ॥

पद राग लीलांबरी ताल धुमाळी.

होउनि आनंद सुमित्रेला ह्मणे मम बाळ भेटलें मजला ॥ ध्रु० ॥ आलिंगुनि मातें नेत्रोदकें सौमित्र भिजवीला ॥ १ ॥ बाळ लहान वनिं करून उपोषणें फारच कृश जहाला ॥ २ ॥ विष्णुदास ह्मणे मग लक्षुमण वंदित कैकयिला ॥ ३ ॥

मा० प० बोले कौसल्या:—

आनंदें सर्वहि मग शयुलिरिं येऊन ॥ वृक्षवाटिकेमाजी मंगलस्नानातें करून ॥ मिळूनिया करिती सर्व ते मिष्टान्नभोजन ॥ चाल ॥ ह्मणे सुमंत चला सूमूहुर्तें अयोध्ये आतां ॥ २ ॥

पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

रघुनंदनसंपति पामर वर्णित परिसा यथामती ॥ ध्रु० ॥ माता बंधू सेनाभार संगे राक्षस कपि अनिवार ॥ वाजत गाजत हो सुस्वर नगरासमीप पावती ॥ १ ॥ इंद्रपुरीहुन सुशोभीत सुंदर अयोध्या दीसत ॥ जींतिल गृहें गगनचुंबीत बागा ज्यांच्या सभोंवती ॥ २ ॥

जातां सर्व वेशीआंत नारी आर्या ओंवाळीत ॥ सुवर्णपुष्पं कर फेकीत
राजद्वारीं प्रभु येती ॥ ३ ॥ मग पुजूनी गजवदन कुलदेवतें नमून ॥
माता गुरुप्रती वंदून सभें आनंदें बैसती ॥ ४ ॥

### सारिकाछंद ताल धुमाळी.

गुरु भरत आणि सुमंत ॥ ह्मणती सिंहासनिं रघुनाथ ॥ बसऊं तंव
तो त्यास वदत ॥ बसवा राज्यीं भरतातें ॥ १ ॥ तव मातेच्या हेंच म-
नांत ॥ होतें, तों काय त्या भरत ॥ बोले राज्यीं तूं रघुनाथ ॥ बैस
सेवा करीन मी ॥ २ ॥

### मा० प० रघुनंदनसंपातिः—

आग्रहें राम करीत मान्य गुरुनी मुहूर्त मग काढून ॥ राज्यीं बसवि
रघुनंदन प्रजा सर्व आनंदे ती ॥ ९ ॥

### पद राग बागेसरी ताल धंमार.

सुमूहूर्तें सिंहासनीं अरुढे रघुवीर ॥ परीसा पूढें झालें काय चरि
॥ ध्रु० ॥ सुमंत लक्ष्मण भरत शत्रूघ्न ॥ करित हे प्रधान मुख्य चा
॥ १ ॥ सोहळा हो सोळा दीन तृप्त याचकजन ॥ फोडून करीत
आनंदें भांडार ॥ २ ॥ असंख्य नृपवीर देऊनी करभार ॥ गौरवित
रामें त्यांतें जाती सत्वर ॥ ३ ॥ आनंद करीत नगरीं नरनारी घरोघरीं
विष्णुदास वंदूनी तयातें फार ॥ ४ ॥

### ॥ दिंड्या ॥

विभीषण सुग्रिव नल जांबुवंत ॥ सह भोजन करीत रघूनाथ ॥ म
नेउनिया सभें सर्व वीर ॥ उभय राजांतें गौरवीत फार ॥ १ ॥ च
चामरें देउनी तयास ॥ देत राज्या नीरोप जावयास ॥ बोले वदतां
सोडितां आह्मांस ॥ आहे तुमच्या मनिं सदा रामवास ॥ २ ॥

### पद राग देस ताल दीपचंदी.

बोलत सीता प्राणपतीसी॥कांहीं न कां दिलें या मारुतीसी॥ध्रु
राम ह्मणे द्यावयास तयासी ॥ योग्य नसे कांहीं सये मजपाशीं ॥ १
रत्नहार जानकी ती काढूनी ॥ देत प्रेमें बाहूनीया कपीसी ॥ २
घेऊनी हार वृक्षीं जाऊनी ॥ फोडून टाकी तो रत्नें क्षितीसी ॥ ३

राम वदे व्यर्थ त्यातें सर्व हें ॥ आहे मम वास त्याचें मानसीं ॥ ४ ॥
ऐकुनी हें वच कापि हनूमंता ॥ दावी ह्मणत कोठें राम आह्मांसी ॥५॥
हृदय फाडुनि तेणें दावीतां तीतें॥नमी ती विष्णूदास आनंदें त्यासी॥६॥

॥ आर्या ॥

कौसल्ये सुमित्रे बिभिषण सुग्रीव वीर कपिसहित ॥ वंदुनिं निरोप घेउन कैकयिसदनासि ते त्वरें येत ॥ १ ॥ अडउनि निवारुनी त्या भरत सुमंतें आणूनी स्वसदनीं ॥ करितीं गौरव त्यांचा वस्त्राभरणें बहूत देऊनी ॥ २ ॥

## पद राग बिभास ताल धुमाळी.

वंदुनि रामा अशिर्वाद ते घेउनिया निघती ॥ दूरवर त्यां पोहोंचविण्यातें रघूपती येती ॥ १ ॥ ह्मणती आह्मां चरण कधीं हे पडतिल हो दृष्टी ॥ पहात मागें वरवर जाती होउनिया कष्टी ॥ २ ॥ चार दीन मग राहुनि किस्किंदेत बिभीषण ॥ जाउनि लंके राज्य चालवी रामचरण स्मरून ॥ ३ ॥ आनंदें राहिला अयोध्यें दास हनुमान ॥ विष्णुदास तो आज्ञाधारक सदा चरण नमुन ॥ ४ ॥

# अश्वमेधयज्ञ आणि लवकुशाऽऽख्यान.

## पद राग हमीर ताल त्रिवट.

करी राज्य अयोध्येसी ॥ एकादशसहस्र अब्दें राम ॥ ध्रु० ॥ दुःख दरिद्र न तें कोणातें मृत्यु रोग न ठावे जनातें ॥ त्रिकाल देती धेनु दुधातें पिकती धान्यें त्यासीं ॥ १ ॥ चार मास जाती सीतेतें गर्भचिन्ह समजुनि रामातें ॥ क्रीडेस्तव नेऊनि आरामीं पुसत दोहद तिजसी ॥ २ ॥ लज्जित उत्तर न दे त्यासी पुन्हां आग्रहें पुसतां तिजसी ॥ सांगे गोदातिरिं मुन्याश्रमिं रहावें वाटे मसी ॥ ३ ॥ पुढिल कार्य रामानें जाणुन न दे उत्तर तिजलागून ॥ परत तीजसह रथीं बसून येई नगरासी ॥ ४ ॥

## पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

झाली होणारापरि मति दुष्ट हो रघुनाथासी ॥ पुन्हां एकदां भासवि

अनर्थ प्रजाजनां जी सर्वांसी ॥ ध्रु० ॥ एके दिनिं हेरांतें आणुन काय पुसतसे रघूपती ॥ निंदिति कीं स्तविती हें सांगा सत्य नगरिजन मजप्रती ॥ शंका न धरा किमपि मानसीं मुभा आहे रे तुह्मांप्रती ॥चाल॥ कळेल चूक जरि तरी सुधारिन त्वरीत मी हो तीजसी ॥ १ ॥

## पद राग जोगी ताल धुमाळी.

ह्मणती नगरहेर रामातें ॥ स्तविती नगरीं सर्व तुह्मातें परी रजक एक आपणातें ॥ निंदित पापमती फार ॥ १ ॥ स्वस्त्री अपराधी म्हणुन ॥ घाली गृहाबाहेर मारून ॥ आणितां श्वशुरें तीज फिरून॥बोलत अधम काय तया ॥ २ ॥ मी नोहे रे रघुनंदन ॥ नेली असुरें स्त्री ती फिरून ॥ गृहीं नांदवित तो आणून ॥ मूर्खा जा घेउन इजला ॥ ३ ॥ रजकही स्वच्छ जाती फार ॥ परवस्त्रांचें डाग धुणार ॥ लाउं न स्वकुलासी अणुमात्र ॥ डाग मारिन रे तिजला ॥ ४ ॥ रजकाचें हें वर्तमान ॥ ऐकून कोपुन रघुनंदन ॥ बंधू लक्ष्मणासी बाहून ॥ काय वदत तयातें ॥ ५ ॥

## मा० प० झाली होणारा:—

लंकेतुन आणिली म्यां सीते ह्मणुनि रजक निंदित मातें ॥ सुरवरां देखत अग्नीमाजी झालें असतां दिव्य तें॥असो आतां उत्तम हें सखया सोडुन यावी वनिं तीतें ॥ चाल ॥ ऐक प्रिया या अपवादास्तव सोड वनीं नेउन तिजसी ॥ २ ॥

## ॥ साकी ॥

ओहा ! रामा काय मातें निष्ठुर आज्ञा करितां ॥ पूत दिव्यकृत जानकिमातें व्यर्थ तुह्मी कां छळितां ॥ चाल ॥ आज्ञा द्या मातें जाउन वधितों रजकातें ॥ १ ॥

## ॥ आर्या ॥

बोले राम तयातें रजकातें दंडितां जनीं दोषी ॥ होइन मी यापेक्षां हें बरवें मारि एकदां मजसी ॥ १ ॥

## ॥ अभंग ॥

ऐकुनीया ऐसें वचन ॥ दुःखी मानसीं होऊन ॥ सीतामंदीरीं तो

येत ॥ नमुन तीतें काय कथीत ॥ १ ॥ आज्ञा मातें रघूनाथें ॥ दिली न्याया वनिं आपणातें ॥ वदे सीता कथिलें होतें ॥ ह्मणुन धाडीलें तुह्मातें ॥ २ ॥ वैसे सामग्रीसहीत ॥ रथीं, सौमित्रा वदत ॥ येऊं परत त्वरीत ॥ तंव तो उत्तर न देत ॥ ३ ॥ अश्रू नयनीं वहात ॥ दूर वनीं रथ नेत॥विष्णुदास ह्मणे सीता ॥ काय वदे उन्मिलानाथा ॥ ४ ॥

### पद राग तोडी ताल दीपचंदी.

जाणवुनि वीपरित काय बोलत सीता ॥ भावोजी रथा कोणिकडे नेतां सांगा तरी तुह्मी मजसी आतां ॥ ध्रु० ॥ अपशकून मार्गी बहुत होती ॥ दीसती न मुन्याश्रम भागीरथी ॥ घोरवनिं व्याघ्रादीक वाटत भीती ॥ चा० ॥ तो न बोलतां थांबवुनी रथा झाला लक्ष्मण तिज उतरवीता ॥ १ ॥

### सारिका छंद ताल धुमाळी.

असनीं तीतें बैसऊनी ॥ बोले सौमित्र नमूनी ॥ रजकनिंदेतें ऐकूनी ॥ आज्ञा दिधली मज रामें ॥ १ ॥ सोड सीते वनिं नेऊन ॥ आज्ञा त्याची मीं मानून ॥ तुह्मा सोडिलें इथें आणून ॥ जातों ह्मणुनी रडत ये ॥ २ ॥

### मा० प० जाणवुनि विपरित:—

वाटे आकाश पडलें कोसळून ॥ किंवा वीज पडली काय कडकडून ॥ शोक करित वक्षस्थळ सीता पिटून ॥ चा० ॥ वनचरा प्रार्थून निघुनी लक्ष्मण येऊनी भेटे रघूनाथा ॥ १ ॥

### ॥ आ ॥

एकाकी पाहुनि राघें बंधूलें कारित शोक रघुवीर ॥ देउन खूण तयातें आणित सौमित्र त्वरित शुद्धिवर ॥ १ ॥

### पद राग यमन ताल धुमाळी.

सीता सावध होतां मुर्छेतूनी ॥ करि शोक ऐकून तो पशुपक्षी रडताती ॥ ध्रु० ॥ वनिं पक्षी धरिति छाया हो तीजवर ॥ चंचुनें उदक सिंचिति ते अंगावर ॥ ऐकून शोक वनिं होती पशु निर्वैर ॥ उठे लोळे शोकें धरणिवरी वरवर ॥ गेलासि कोठें सौमित्रा ये लवकर ॥ दुर्घट-

शासन हें कमलिनिला हो वज्र ॥ चाल ॥ शिष्यासह तों मुनि वाल्मिक वनीं येती ॥ १ ॥

### पद राग काफी ताल त्रिवट.

काय बोलले वाल्मीकमुनी परीसा सीतेसी ॥ ध्रु० ॥ कोण वनीं कामीनी यक्षीणी कीं राक्षसीणी दिसशी लावण्य कोणीं सोडिलें तूसी॥ १॥

### मा० प० जाणवुनि विपरित:—

मुनी नोहे यक्षिणि भूत वनदेवता ॥ मम वर रघुविर मी जनकदुहीता ॥ सोडोलें वनीं प्रीयें दोष नसतां ॥चा०॥ मुनि कृपावंता मम नाम सीता पाळा मज व्हा हो धर्मपीता ॥ ३ ॥

### मा० प० काय बोलले:—

जाणें मी रघूवीर मम मित्र मिथिलेश्वर ॥ माझी धर्मकन्या माये चल गुंफेसी ॥ २ ॥ जनकनंदीनीस नेउनी आश्रमास ॥ परोपरी मुनीवर्य शांतवी तीसी ॥ ३ ॥

### ॥ ओव्या ॥

तों संनिधचे सर्व ब्राह्मण ॥ ह्मणती वाल्मीकमुनलिागून ॥ सत्य आणिलें हें विघ्न॥तंव मुनी काय वदे ॥ १ ॥ नोंहे विघ्न महा सती ॥ राघवपत्नी ही निश्चितीं ॥ स्मरतां हीतें दोष जाती ॥ विप्र ह्मणती मग काय ॥ २ ॥ दूर दिसे या गंगेस ॥ आणील जरी या स्थळास ॥ तरी सती मानूं हीस ॥ नातर मारून घालउं ॥ ३ ॥

### पद राग पिलु ताल त्रिवट.

धाव माये भागीरथी सीता कर जोडुन विनवीती ॥ ध्रु० ॥ जन्हू-कुमरी जगदोद्धारी दे यश दीनाप्रती ॥ १ ॥ धाव त्वरित गे ऋषिजन मारे ॥ सत्व हरूं पहाती ॥ २ ॥

### अभंग.

गंगा येत ती धावत ॥ मुनी बुडूं लागाते तींत ॥ १ ॥ तिचे चरणीं लोळताती ॥ ह्मणती मूलें बाळें बुडतीं ॥ २ ॥ स्तावित सीतेलागी दीन ॥ सारी मागें हीज फिरून ॥ ३ ॥

**मा० प० धाव माये भागीर:—**

स्तवितां मग सीतें वळली भागीरथी ॥ सुखि विष्णुदास होती ॥ ३ ॥

**सारिकाछंद ताल धुमाळी.**

सीते सत्य सती जाणून ॥ नेती आश्रमीं वंदून ॥ कांहीं काळें भरतां पूर्ण ॥ दिवस होत ती प्रसुत ॥ १ ॥ शुभ नक्षत्रीं शुभ दीनीं॥येता सूर्य तो माध्यान्हीं ॥ दोन कुमार सीतेलागुनी ॥ झाले कळे हें वाल्मिका ॥ २ ॥ करीं लव कुश मग घेऊन ॥ श्रेष्ठ कुमारा अभिषेकून ॥ नाम त्याचें लव ठेऊन ॥ दुसऱ्या करिती अभिषिक्त ॥ ३ ॥ नाम त्याचें कूश ठेवित ॥ लालन पालन मुनी करीत ॥ पंच वर्षात्मक होतां सूत ॥ थाटें मुंजी करी मुनी ॥ ४ ॥

**॥ कटाव ॥**

आनंदें लव कुश सीता वाल्मिकआश्रमीं रहाती ॥ ध्रु० ॥ केलें त्यां धनुर्वेदज्ञाते ॥ चार वेद आणि सहा शास्त्रांतें ॥ सकल कला पुराणें त्यांतें शिकवून केलें पूर्ण जाणते ॥ मग एके दिनिं लहू घेऊन ॥ चाप करीं जा मृगयेलागुन ॥ पारधिसाठीं शोधित वन ॥ अकस्मात शृंगीतें पाहुन ॥ वधीत त्यातें बाण मारून ॥ आणीत मग आश्रमालागुन ॥ वदे मुनीतें तुह्मालागुन ॥ बसावया चर्मास्तव मारून ॥ आणिला मृग मुनि दुःखित होउन ॥ ह्मणे नव्हे हा मृग सुगूण ॥ वधिला माझा बंधू सूज्ञ ॥ दुःखें कथि जानकीस येउन ॥ वधिला तव सुतांनीं जाणुन ॥ मृग, मम बंधूलागून ॥ बोले सीता दुःखित होउन ॥ आपली कृति ही आपणालागुन ॥ फळली आतां कृपा करून ॥ काढा या ब्रम्हहत्येतून ॥ तों मुनि बोले तिजलागून ॥ सहस्र सुवर्णकमलें आणुन ॥ पुजितां गे शंकरालागुन ॥ होइल त्वरीत पातकदहन ॥ कमलें तीं गे अयोध्येस ॥ असतीं रक्षित रामदास ॥ कैची मिळतिल या बाळांस ॥ तों ते वंदुन त्वरीत त्यास ॥ त्वरीत येती अयोध्येस ॥ जिंकुनि कमलें रक्षकांस ॥ नेती पाहुन बहू मुनीस ॥ वाटे आश्चर्य सीतेस ॥ चा० ॥ पुजूनी गौरीनाथा पापांतुन मुक्त होती ॥ १ ॥

**॥ ओवी ॥**

तों इकडे अयोध्येस ॥ अवर्षणें प्रजेस त्रास ॥ होत पाहूनिया गुरूस ॥ कारण राम पुसतसे ॥ १ ॥

## घनाक्षरी.

म्हणे वसिष्ठ रामास ॥ निरपराधी सीतेस ॥ घालवीली वनास ॥ ते- णें धरा त्रासली ॥१॥ राम म्हणे वसिष्ठास ॥ सांगा कांहिं उपाय यास ॥ म्हणे मुनी राघवास ॥ अश्वमेध तूं करी ॥ २ ॥ मग देशदेशीचे नृप ॥ मिळऊनि ते अमूप ॥ सुग्रिव बिभिषणादि भूप ॥ सैन्यसह आणिले ॥ ३ ॥ मंडप शर्यूतीरास ॥ घालुनि सिद्धसामग्रीस ॥ करूनि निवडुनि अश्वास ॥ ऊर्वीवरी सोडिती ॥ ४ ॥ शिरीं पत्रिका बांधून ॥ धाडित दळसह रक्षण ॥ रिपुघ्नातें सांगून ॥ सोळा दिवशीं परत ये ॥५॥ सुवर्ण प्रतीमा करून ॥ जानकीचि रघुनंदन ॥ आरंभीत त्वरें यज्ञ ॥ इकडे काय वर्तत ॥ ६ ॥

## पद राग पिलू ताल धुमाळी.

चरण चूरितां सुपुत्र दोघे जानकिते पुसती ॥ कोण कुणाचे आह्मीं सीता काय तयां कथिती ॥ध्रु०॥ अयोध्येचे दशरथ नृपवर ते माझे श्वशुर॥ कुमर तयांचे प्रतापि भरत शत्रुघ्न सौमित्र ॥ श्रेष्ठ त्यांमध्यें लक्ष्मणाग्रज नामें रघुवीर ॥ तात तूमचे आणीक माझे ते हो भ्रतार ॥ पुसाल जरि मम ताता तरी तो जनक मिथिलेश्वर ॥ रजकानिंदा प्रियें ऐकुनी सोडिलि वनीं घोर ॥ सूपुत्रांनो अनय माझा नसतां आणुमात्र ॥ काल कंटिते तुम्हांकडे पाहूनी दुर्धर ॥ चा० ॥ रुदन करीत पाहुनि माते कुश लव शांतविती ॥ १ ॥

## ॥ अभंग ॥

पुढें कोणे एके दिनीं ॥ नाग लोकीं वाल्मिकमुनी ॥ वनरक्षण लहु सांगूनी ॥ जाई यज्ञा त्वरें करूनी ॥ एके दिनीं मुलांसहित ॥ लहू असतां वनांत ॥ अश्वमेधिक तुरंग येत ॥ लहू पत्रीका वाचीत ॥ क्रोधा- ऊनी मनीं फार ॥ बाधी तुरंग सत्वर ॥ नेउनीया कदलीवनीं ॥ आले रक्षक मागूनी ॥ १ ॥

## ॥ कटाव ॥

येतां वनिं शामकर्ण लहु त्या बांधुन ठेवीत ॥ ध्रु० ॥ मागुनि ये- ॥ बद्ध वनीं त्या वारु पाहुन ॥ पुसत मुनीवत्सांस दटाउन ॥ धरून ॥ सांगा बांधीला आणून ॥ वदती कानां हात ला-

उन ॥ न बांधिला तव आम्हीं शामकर्ण ॥ नेला त्या लहुनें धरून ॥ मग तो लवापाशीं येऊन॥दटाऊन वदे अश्वमोचन॥करी तंव तो बोले कोपुन ॥ न दे किमपी अश्व सोडुन ॥ सांग तुझ्या रामातें जाउन ॥ तोच जगीं कां वीर धन्य ॥ ये मजशीं तूं समरालागुन ॥ तों सेवक त्या मूल समजुन ॥ सोडूं लागति अश्वा जाउन ॥ तंव लहु एक्या बाणें-करून ॥ हस्त तयांचे टाकी छेदुन ॥ असंख्यात मग बाण सोडुन ॥ मारित सैना बहु कोपून ॥ बोले त्यातें तंव शत्रुघ्न ॥ माता तात तुझा रे कोण ॥ लहू वदे त्या युद्ध सोडुन ॥ मूर्खा पुसशी नातें येऊन ॥ ऐकतांचि हें कोपे रिपुघ्न ॥ रामदत्त प्रेरीत बाण ॥ बोले लहु त्यातें देखून ॥ कुश नाहीं करूं याचें वारण ॥ नंतर एक्या शरेंकरून ॥ टाकित त्याचा बाण छेदुन ॥ तों त्या बाणाचें लागून ॥ अर्ध पडे लव मूर्छा येउन ॥ रक्तें माखित त्या पाहून ॥ येउनिया उचलीत रिपुघ्न ॥ ह्मणे मानसीं स्नेह उपजुन ॥ आहा ! वधिला बाळ लहान ॥ दिसत पहा रामापरि सुगुण ॥ माता याची शोक दारुण ॥ करील हो हें वृत्त ऐकुन ॥ दाऊं या रामातें नेउन ॥ चा० ॥ घालुनिया रथीं तयातें अश्वासह अयोध्ये जात ॥ १ ॥

॥ आर्या ॥

जाउनि मग मुनिबालक कथिती सीतेस रडत हें वृत्त ॥ ऐकुनि दुःखित सीतासति शोकेंकरुनि धरणितें पडत ॥ १ ॥

पद राग पिलु ताल धुमाळी.

ऐकुनि शिशुमुखें वार्ता सीता धरणिवरी पडली ॥ शोकाकुल होऊनि सति मग काय बोलली ॥ ध्रु० ॥ गरिब लेंकरावरती वीरें शस्त्र कसें धरिलें ॥ बाल स्त्रियेवर शस्त्र धरिती अधर्मि नृप झाले ॥ कैसें करुनी मूर्छित वत्सा निर्दयिं हो नेलें ॥ कोठिल बल त्या मुळेंफळें वनीं खाउनिया श्रमलें ॥ कुश न संनिध पाहुनि सीतामन बहु कळवळलें ॥ काय ईश्वरा विघड बांधवामाजीं हें केलें ॥ चा० ॥ ऐसें बोलुनि पुनरपि सीता फारच गहिवरली ॥ १ ॥

॥ साक्या ॥

फलपुष्पार्थ वनामाजी असतां कुश तो गेला ॥ झेतां बहु अपश-

कुन तयातें मागें त्वरीत आला ॥ १ ॥ ह्मणे आई लहु कोठें गेला ऐकतांचि हें वचन ॥ स्फुंदत दुःखें कुशास सांगे माता बहु कळवळुन ॥ २ ॥

**सा० प० ऐकुनि शिशुमुखें:—**

नकळे लहुनें कोण्या वीराचा घोडा वानीं धरिला ॥ येतां मालक पुसूं तयाचा सेनावध केला ॥ हें मग पाहुनि कोप आला बहु त्यांतिल नृपाला ॥ तेणें मुर्छित करुनि लहूतें राथें घालुन नेला ॥ कोण आतां जाऊन सोडाविल तुजवांचुन त्याला ॥ ऐकतांचि हें वृत्त कुशातें बहुत क्रोध आला ॥ चा० ॥ वंदुनि निघतां तो सीतासति कांहिं शांत झाली ॥ २ ॥

**पद राग झिंजोटी ताल त्रिवट.**

लवकुश करिती युद्धासी परिसावें त्या चरितासी ॥ ध्रु० ॥ शरचाप घेउन हातांत ॥ मातेप्रति वंदुनि निघत ॥ बहु त्वरें येउनि रणांत ॥ हटकित तो शत्रघ्नासी ॥ १ ॥ ह्मणे चोरांनो या परत ॥ मजशीं युद्ध करा त्वरित ॥ सेनापति ऐकुन फिरत ॥ वाटे अकांत सर्वांसी॥२॥ सेनापति चालुन आला ॥ कुश वधि बाणें क्षणिं त्याला ॥ नागेंद्र सहोदर यांला॥क्षणांत धाडी मुक्तीसी ॥ ३ ॥ कुशें तीव्र सोडितां बाण॥ शत्रुघ्न येत कोपून ॥ करि त्या मुर्छित सह सैन्य ॥ कांहीं पळत अयोध्येसी ॥ ४ ॥ बंधुस मग रणिं शोधून ॥ मुखिं उदकातें घालून ॥ करितांचि सावध उठून ॥ चल घेउन ह्मणे अश्वासी ॥ ५ ॥ कुश ह्मणे न जावें येथून ॥ आतां येतिल वीर मागून ॥ त्यासी समरांगणि पाडून ॥ मग जाऊं आश्रमासी ॥ ६ ॥

**॥ ओवी ॥**

तों कांहीं घायाळ वीर ॥ येऊनि अयोध्ये सत्वर ॥ कथिती रामा समाचार ॥ रणांगणी जाहला ॥ १ ॥

**पद राग भूप ताल त्रिवट.**

रघविर यज्ञालागी बसले असतां विघ्न पुढें आलें ॥ ध्रु० ॥ दळसह ऐकून ॥ शोकें व्याकूळ रघुनंदन ॥ तंव वीर उठे लक्ष्

मण ॥ निघे सेनेसह चरण नमुन ॥ रणिं लहुकुशास पाहून मनामध्यें आश्चर्य वाटून ॥ चा० ॥ सौमित्र मन चकित झालें ॥ १ ॥

पद राग खमाज ताल दीपचंदी.

पाहूनी लकुवश शरसंधानातें आश्चर्यें शाबास वदे तयातें ॥ ध्रु० ॥ कालजीत असुर विचार काढीत ॥ एके ठायीं उभय हे न आटपत ॥ करुनी दोन भाग सेनेचे त्वरीत ॥ चा० ॥ जेष्ठा धरितों मी तुह्मी कनिष्ठातें ॥ १ ॥ वेष्टी चोहींकडुन सौमित्र लहूस ॥ अकळीत कालजीत कूशास ॥ असुर उडे घेउनी लवचापास ॥ आकाशीं, तों मारी लहु त्यासी ॥ २ ॥

पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

लहुकुश सेनेसह रघूवीरासीं झालें युद्ध परिसा त्या चरित्रासी ॥ ध्रु० ॥ लहुनें सेनावेढे छेदून टाकीतां कोपून लक्ष्मण ॥ सोडित लहुवरि पांच बाण ॥ ते तो खंडी शरेंकरून ॥ वदे गर्वें लक्ष्मणालागून ॥ नोहे रे हे असुरयुद्ध जाण ॥ चा० ॥ इंद्रजीता मारिलें वीर ह्मणवीसी ॥ १ ॥

मा० प० पाहोनी लहू:—

सौमित्र बोले सांगा कोठील तुह्मीं कोण ॥ धनुर्विद्या शिकला कोणापासून ॥ मज आली करुणा तुह्मां पाहून ॥ चा० ॥ ऐका द्यारे सोडूनी त्या अश्वातें ॥ ३ ॥

मा० प० लहुकुश सेनेसह:—

नोहे हे बा पुढें राक्षस पामर ॥ पूर्वीं वनीं श्रमलासी निद्राकर ॥ सरले असल्या पळानि जाय शर ॥ अयोध्येसी जा पाठवी रघुवीर ॥ वदोनिया ऐसें सोडी बाण अनिवार ॥ नीवारण योजीत असतां सौमित्र ॥ चा० ॥ रथासह उडवीला त्वरें तयासी ॥ २ ॥

पद राग बिहाग ताल दीपचंदी.

कोपें लक्ष्मण लहूशीं लढत ॥ निकरें होऊनीया सज्ज त्वरीत ॥ १ ॥ बैसोनी या आणुनी द्वितिय रथ ॥ गदाऽस्त्र लहुवरी प्रेरीत ॥ २ ॥

वज्रास्त्रें लहू त्या निवारीत ॥ सौमित्र तों पर्वतास्त्र टाकीत ॥ ३ ॥ पिं-ष्ट त्याचें करुनी सूर्यास्त्र ॥ येतां राहूअस्त्रें लक्ष्मण वारीत ॥ ४ ॥ कामास्त्र लहुनें त्वरें सोडीलें ॥ सौमित्रें तारक फेकीलें ॥ ५ ॥ त्यावरि षण्मुखास्त्र लवें योजीलें ॥ विघ्नआस्त्र लक्षुमणें घातलें ॥ ६ ॥ लवें हेरंबास्त्र मारिलें ॥ सागरास्त्र सौमित्रें प्रेरीलें ॥ ७ ॥ अगस्त्यास्त्रें लहुनें त्या नीवारीलें ॥ सौमित्रें अग्नयास्त्र टाकीलें ॥ ८ ॥ पर्जन्यास्त्रें लहुनें तें विझवीलें ॥ लक्षुमणें वातास्त्र सोडीलें ॥ ९ ॥ पर्वतें लहूनें तें कों-डीलें सर्व सैन्य मूर्छीत ते केलें ॥ १० ॥ मग नादअस्त्र त्वरें फे-कीलें ॥ नादीं गुंग सौमित्रा निजवीलें ॥ ११ ॥

## सारिकाछंद ताल धुमाळी.

इकडे तों कुश सैन्यासहित ॥ मारुनि राक्षस कालजीत ॥ बंधू-लागी तोषवीत ॥ काय अयोध्यें तों वर्ते ॥ १ ॥ बोलत भरतातें रघु-नाथ॥घेउन जाई सैन्य अगणित ॥ न मारितां कुमरांतें त्वरित ॥ आणू सांगे लक्ष्मणा ॥ २ ॥ येउनि तों ते हेर रडत ॥ कथिती रामातें सौ-मित्र ॥ सैन्यासह झाला मूर्छीत ॥ ऐकुनि राम शोक करी ॥ ३ ॥

## ॥ आर्या ॥

शांतउनी रघुनाथा घेउनि बहु सैन्य समरभूमीसी ॥ येत भरत हनु-मंतासूमंतासहित बंधुसहायासी ॥ १ ॥

## पद राग सोनी ताल त्रिवट.

वंदुनियां रघुनाथा येती रणीं सुमंत, हनुमंत, भरत ॥ काय झालें वृत्त पूढें विनयें सूजना विष्णुदास पद नमूनी कथीत ॥ ध्रु० ॥ बाळां पाहुनि भरत ह्मणे आश्चर्यें हनुमंता मज दीसती उभय हे रामासमान ॥ याच वनीं रे सीता होती सोडीली असतां गर्भीणी हे तिचे सूत वाटें अनुमान ॥ वाल्सहित यांतें धरुनि नेऊं या अयोध्ये पाहूनीया आनं-देल माझा रघूनंदन ॥ चाल ॥ ऐसें ते बोलत पाहुनि लहू कूशा पुसत समजलें कां रे हे तूज काय करीत ॥ १ ॥

## सा० प० लहूकुश सेनेसह:—

वाटे हे करिती कीं मसलत आह्मांसि गोवुनि युद्धांत ॥ सोडुनि अश्व

वज्रास्त्रें लहू त्या निवारीत ॥ सौमित्र तों पर्वतास्त्र टाकीत ॥ ३ ॥ पिष्ट त्याचें करुनी सूर्यास्त्र ॥ येतां राहूअस्त्रें लक्ष्मण वारीत ॥ ४ ॥ कामास्त्र लहुनें त्वरें सोडीलें ॥ सौमित्रें तारक फेकीलें ॥ ५ ॥ त्यावरि षण्मुखास्त्र लवें योजीलें ॥ विघ्नआस्त्र लक्ष्मणें घातलें ॥ ६ ॥ लवें हेरंबास्त्र मारिलें ॥ सागरास्त्र सौमित्रें प्रेरीलें ॥ ७ ॥ अगस्त्यास्त्रें लहुनें त्या नीवारीलें ॥ सौमित्रें अग्नयास्त्र टाकीलें ॥ ८ ॥ पर्जन्यास्त्रें लहुनें तें विझवीलें ॥ लक्षुमणें वातास्त्र सोडीलें ॥ ९ ॥ पर्वतें लहूनें तें कोंडीलें सर्व सैन्य मूर्छीत ते केलें ॥ १० ॥ मग नादअस्त्र त्वरें फेकीलें ॥ नादीं गुंग सौमित्रा निजवीलें ॥ ११ ॥

### सारिकाछंद ताल धुमाळी.

इकडे तों कुश सैन्यासहित ॥ मारुनि राक्षस कालजीत ॥ बंधूलागी तोषवीत ॥ काय अयोध्यें तों वर्ते ॥ १ ॥ बोलत भरतातें रघुनाथ॥घेउन जाई सैन्य अगणित ॥ न मारितां कुमरांतें त्वरित ॥ आणू सांगे लक्ष्मणा ॥ २ ॥ येउनि तों ते हेर रडत ॥ कथिती रामातें सौमित्र ॥ सैन्यासह झाला मूर्छीत ॥ ऐकुनि राम शोक करी ॥ ३ ॥

### ॥ आर्या ॥

शांतउनी रघुनाथा घेउनि बहु सैन्य समरभूमीसी ॥ येत भरत हनुमंतासूमंतासहित बंधुसहायासी ॥ १ ॥

### पद राग सोनी ताल त्रिवट.

वंदुनियां रघुनाथा येती रणीं सुमंत, हनुमंत, भरत ॥ काय झालें वृत्त पूढें विनयें सूजना विष्णुदास पद नमूनी कथीत ॥ ध्रु० ॥ बाळां पाहुनि भरत ह्मणे आश्चर्यें हनुमंता मज दीसती उभय हे रामासमान ॥ याच वनीं रे सीता होती सोडीली असतां गर्भीणी हे तिचे सूत वाटे अनुमान ॥ वाल्सहित यांतें धरुनि नेऊं या अयोध्ये पाहूनीया आनंदेल माझा रघूनंदन ॥ चाल ॥ ऐसें ते बोलत पाहुनि लहू कूशा पुसत समजलें कां रे हे तूज काय करीत ॥ १ ॥

### सा० प० लहूकुश सेनेसह:—

वाटे हे कांहीं की मसलत आह्मांसि गोवुनि युद्धांत ॥ सोडुनि अश्व

मेऊं इच्छीत रहा तूं सावध अश्व रक्षीत ॥ मारितों आतां मी या त्वरित ॥ चाल ॥ बोले भरता ये समरासी ॥ १ ॥

## घनाक्षरी.

क्रोधाऊनिया भरत ॥ अस्त्रें सोडी अगणीत ॥ कुशें नीवारूनि त्वरित ॥ कार्तवीर्य प्रेरिलें ॥ १ ॥ मग सोडि भार्गवास्त्र ॥ हाणी भरत अंधकास्त्र ॥ कुशें प्रेरिलें द्वादशामित्र ॥ सोडी भरत मसासुर ॥ २ ॥ त्र्यंबक भानु सोडि भरत ॥ भस्मासुरें कुश वारीत ॥ भानूशर सोडुनि त्वरित ॥ मूर्छित भरता पाडिला ॥ ३ ॥

## ॥ ओवी ॥

हनुमंता मारूनि बाण ॥ वदे कुश घायाळ करून ॥ श्रमलासि माताकार्जी ह्मणून ॥ आमुच्या तुज सोडिला ॥ १ ॥

## मा० प० रघुविर यज्ञालागीः—

बिभीषणाप्रती राम पुसत कोणाचे हे तनय समरीं भिडत ॥ अजुनी कां न ये भरत अशी जों चिंता मनीं करीत ॥ तों हेर आले रूदन करीत घाबरूनी राघवातें कथित ॥ चाल ॥ दळासह भरता रणीं पाडीलें ॥ २ ॥

## पद राग यमनीबिलावल ताल त्रिवट.

पडला परिसूनि भरत रणातें रघूवीर करीत काय पुढें परिसा तें ॥ ध्रु० ॥ मूर्छित होतां त्या बिभीषणें आवरीला ॥ सोडुनि यज्ञकंकण मग युद्धा नीघाला ॥ सुग्रिव जाबुवंत नळ नीळ घेउन जुत्पतीला ॥ अगणित दळभारासह रणीं त्वरें तो आला ॥ लहान बाळांनीं केलें मुर्छित पाहुनि बंधूंला ॥ आश्चर्यातें मनामाजीं बहू पावला ॥ चाल ॥ वानर लहूकुशांवर फेकिति अगणित पर्वतातें ॥ १ ॥

## घनाक्षरी.

लहूकुश बाणें करून ॥ वृक्ष शिळा टाकि छेदून ॥ मारुतिसह कपीगण ॥ भूमिस सर्व पाडिले ॥ १ ॥ येतां सुग्रिव धाऊन ॥ वदे कुश त्यालागून ॥ बंधूस्त्रीशीं करिशि गमन ॥ तुझा गुरूही अन्यायी

॥ २ ॥ मारितों आतां बाणेंकरून ॥ ऐसें वदुन मारूनि बाण ॥ पाडित सुग्रिवा हणून ॥ तसेंच जांबुवंतासी ॥ ३ ॥ हातीं घेउनि पर्वत ॥ येतां नीळ त्या धावत ॥ वदे नोहे सागरांत ॥ आतां सेतु बांधणें ॥४॥ बाणेंकरून त्या पाडीत ॥ येतां अंगद त्या ह्मणत ॥ जारीणीचा रे तूं पूत ॥ नोहे असुरयुद्ध हें ॥ ५ ॥ वदे अंगदा रघुनाथ ॥ पाड यांतें रे त्वरीत ॥ मारूनि बाण कुशें त्वरित ॥ त्यास धरणीं पाडिला ॥ ६ ॥ पुढें होउनि रघुनाथ ॥ मारूनि बाण असंख्यात ॥ गगनिं मंडप करीत ॥ लहुकुश ते निवारिती ॥ ७ ॥

## सारिकाछंद ताल धुमाळी.

पाहुनि त्या उभयांचें शौर्य॥संतोषे मानिं रामराय॥ह्मणे मागा इच्छित काय ॥ खेळ धन जें हवें ॥ १ ॥ बोलत लवकुश त्यालागून ॥ काय हवें तुज घे मागून ॥ भिसी समरीं रे येऊन ॥ कीर्ती व्यर्थ जगीं तुझी ॥ २ ॥ असुरयुद्धीं झाली कीर्ती ॥ न चले एथें तुझी गती ॥ त्यजिल्सि बलहीना सीता ती ॥ कशास व्यर्थ बोलसी ॥३॥ पुन्हां बोले राम तयांतें ॥ सांगा तुमचीं नामें मातें॥मायबाप आणि गुरू कोण ते ॥ शिकला काय काय रे ॥ ४ ॥ हसूनिया त्या लवकुश वदती ॥ वाटत असेल समरीं भीती ॥ जाय परत अयोध्येप्रती ॥ पुत्रकलत्रहीना तूं ॥ ५ ॥ हो आतां वा रे संन्यासी ॥ काय वदे तों राम तयांसी ॥ सांगा तुमच्या रे नामांसी ॥ युद्ध करीन मग मी ॥ ६ ॥ जानकीचे आम्हीं सूत॥लव कुश आह्मांसी रे ह्मणत ॥ ऐकुनिया हें पडे मूर्छित ॥ हा सीतें म्हणुनी राम ॥ ७ ॥ उभय कुमार समीप येत ॥ वंदुनि त्यांतें लिहून निघत ॥ वस्त्राभरणादी त्वरीत ॥ स्वमातेतें कथावया ॥ ८ ॥

## ॥ ओवी ॥

मग कुमार रथीं बसून ॥ पुच्छां धरूनि वानरगण ॥ ओढित खेळावयालागून घेऊन आश्रमा चालले ॥ १ ॥ तों जाम्रुवंत वदे मारुतीस ॥ अंग खरडून होतो त्रास ॥ तंव तो म्हणे स्वस्त बैस ॥ फार कठिण प्रसंग हा ॥ २ ॥ केला मूर्छित जगन्निवास ॥ काय आमुचा पाड त्यास ॥ जाउं पाहूं रे मातेस ॥ आश्रमसंनिध रथ तों ये ॥ ३ ॥

## ॥ अभंग ॥

उभय बालक येतां रथांतूनी ॥ सीता त्यां धाऊनी कवळीत ॥ १ ॥

बोलती ते माते आह्मीं खेळायातें ॥ कपी आणीले हे पहा छान ॥ २ ॥ चक्राकार कैसे फिरती अहा हे ॥ ओळखूनी त्यांतें ह्मणे माता ॥ ३ ॥ असूं नयेत हे वत्सांनो गृहांत॥ सोडूनी त्वरीत द्या रे यांतें ॥ ४ ॥ मातावचन हें ऐकतां त्वरीत॥भिरकऊनी देत त्यांतें बाळ ॥ ५ ॥ मग नेऊनीया अंतरगृहांत ॥ मातेसी कथीत सर्व वृत्त ॥ ६ ॥ मूर्छीत करूनी दळासह रामा ॥ आलों घेऊनीया तुरंग हा ॥ ७ ॥ विष्णुदास ह्मणे ऐकतां हें सीता ॥ रुदन करीत बोले वत्सा ॥ ८ ॥

मा० प० ऐकुन शिशुमुखें:—

बाळांनो आजि विपरित केलें ते मम प्राणपती ॥ त्यांसि स्वस्हतें मारून आला कैशी कालगती ॥ विपरित कैसें घडलें सूर्या गिळिला खद्योतीं ॥ सैन्यासह मम प्राणप्रियकरा कैचें वधिलेंती ॥ ह्मणे ईश्वरा घडे काय ही बालहातें गती ॥ काय कर्म ओढवलें समयीं गुरु गृहीं नसती॥चा०॥ विष्णुदास ह्मणे पुन्हां तीस काय बाळें बोलतीं ॥ २ ॥

॥ आर्या ॥

झालें निधन न मूर्छित उठतिल गे तात न करि शोकातें ॥ दुःखित सति; तों पावे वाल्मिकमुनि शांतवीत सीतेतें ॥ १ ॥

पद राग यमन ताल त्रिवट.

मूर्छित करिता लवकुशांनीं दळसह रघूनाथा ॥ पूढें झाली परीसावी काय ती कथा ॥ध्रु०॥ ऐकुन विपरित वाल्मिक आला त्वरें आश्रमातें॥ झाला ऐकता सीतामूखें सर्व वृत्त तें ॥ घेउनि कमंडलू मूनी आले त्वरें रणातें ॥ प्रोक्षूनीया ऊदक उठवी दळसह रामातें ॥ केलें नाहीं घोर युद्ध राम ह्मणे मी त्यातें ॥ शांतवीत मग मूनी रघूनाथातें ॥ चा० ॥ चरणावरी झाला मग बाळां घालीता ॥ १ ॥ आकाशीं तों झाली काय देववाणी ॥ आलिंगी त्या सुता रामा तुझ्या सुगूणी ॥ सर्व विद्या मुनिनें दाखवील्या पुत्रांकडूनी ॥ आनंदूनी मूनीतें राम गौरवि वचनीं ॥ घेत अंकीं राम सुपुत्रां हर्षेकरूनी ॥ भरत लक्ष्मण आणूं गेले सीतेलागूनी ॥ चा० ॥ ऐकुन वृत्त हर्ष आनंदें निघत सीता ॥ २ ॥

पद राग ललत ताल त्रिवट.

सीता रघुनाथा भेटूं जातां काय बदली हो ॥ ध्रु० ॥ कर जोडुनिया

ऋषिपत्न्यांसी आजवर सांभाळीलें मजसी येतें मी आतां ॥ १ ॥ वंदुनि सर्वां तपोधनां निघे रथावरि बैसून आनंदें माता ॥ २ ॥ पाहुनि प्राणप्रीया रथावरूनी उतरून आलिंगीत रघुनाथा ॥ ३ ॥

**मा० प० मूर्छित करितां लहू:—**

जवळी येतां होय सीता काय देववाणी ॥ सत्य सती ही अंकीं घे चापपाणी ॥ पुष्पवर्षाव होत घेतां अंकीं बसऊंनी ॥ ऋषीसहीत येत मग पूरालागूनी ॥ घेऊन स्त्रीपुत्रा राम लागे मातांचरणीं ॥ पूर्णाहूती स्त्रियेसह अग्नित देऊनी ॥ चा० ॥ झाला आनंदें यज्ञ तो सांग करीता ॥ ३ ॥

**पद राग बसंत ताल एका.**

अश्वमेध पूर्ण सिद्धी नेऊन बैसे सभे सिंहासनीं रघुनंदन ॥ ध्रु० ॥ लवकुश सव्यांकीं जानकी वामांकीं आनंदित होत सर्व पाहुन ॥ १ ॥ देउन अमूप धन बोळवी ब्राह्मण मुनी भूप मानेंकरून ॥ २ ॥ सुग्रिव बिभीषण कपी सैन्यसह धाडी वस्त्राभरणें देउन ॥ ३ ॥ विष्णूदास म्हणे पुढें स्वर्गीं नेली अयोध्या यानीं घालुन ॥ ४ ॥

---



## ःणजन्म आणि कालियाशकटासुरादिहनन.

### पद राग मल्हार ताल दीपचंदी.

हाय संकट जाणूनी नारायणें ऐका कृष्णरूप धरिलें ॥ सुमती सभा-
ऐका पूर्ण देऊनी अवधान आपूलें ॥ ध्रु० ॥ निजधामा गेल्यावरी
र असुरीं गोद्विजां त्रासीलें ॥ कंस चाणूर मुष्टिक अघ बक केशी
। असुर मातले॥शिशुपालें वक्रदंतें चैद्यें जरासंधें राजे बंदित टाकीले
ाल ॥ भौमासुर कालयवन बाणासूर मत्त फार जहाले॥ १ ॥पापभारें
' कामे गोरूपें जाऊनी विधिलागी प्रार्थीत ॥ संकटीं पडूनी विधी
ऋषीसह क्षीरसागरीं येत ॥ स्तवितां श्री विष्णूसी ते प्रसन्न हो-
काय त्यांसी कथीत ॥ चाल ॥ शेषासह जन्मूनी यदुवंशीं मी
हरीन आपूलें ॥ २ ॥ गाई गोप कांहीं व्हा यमवायुइंद्रादि कुंति-
ीं यावें ॥ तैसे गुरू द्रोण अग्नी धृष्टद्युम्न गौरीनें हो कृष्णा व्हावें ॥ वै-
ःपउदरीं कमला इणें रुक्मीणी या नामें यावें ॥ चाल ॥ तैसें पुढें
र तें कथितों ऐका चित्त देऊन आपुलें ॥ ३ ॥ वसुदेवा उग्रसेन
ी देऊन करील जामात ॥ उग्रसेनसुत कंस मिळऊनी असुर पीडा
त जगांत ॥ देवकीविवाहीं सुरवाणी होईल आहे मृत्यु तुझा निश्चीत
ाल ॥ अष्टमभागीनेयहातें सांभाळी दुष्टा प्राण आपुले ॥ ४ ॥

### ॥ ओव्या ॥

ुढें ऋषी देव सकल ॥ करूनि वंदन तात्काळ ॥ आज्ञा घेऊनि
पाल ॥ आनंदें जाती स्वस्थाना ॥ १ ॥ इकडे देवकीविवाह
। ॥ सुरवाणी कळतां कंसाला ॥ मनामाजी क्रोधावला ॥ मारूं
देवकीसी ॥ २ ॥

### ॥ गीत ॥

ासुदेवें कंसासि प्रार्थुनी ॥ सोडविली देवकीलागुनी ॥ सुत हिचे दे-
आणूनी ॥ सांगुनिया ऐसें ॥ १ ॥ पुढें दुष्ट कंसें दोघांतें ॥ आ-
टाकीलें बंदीतें ॥ कांहीं कालें देवकीतें ॥ झालें संतान ॥ २ ॥

आला कंस त्या मारायातें ॥ या न मारी आठव्यातें ॥ मारी ह्मणुनी बोधुनी त्यातें ॥ निवारी वसुदेव ॥ ३ ॥

**कटाव.**

कलहप्रिय नारदमुनीनें ऐका मग काय केलें ॥ ध्रु० ॥ मानुनिया वसुदेववाक्य तें ॥ जाय कंस जों स्वस्थळातें ॥ तंव मुनि नारद गेले तेथें ॥ ह्मणाति खचित कोणापासुन तें ॥ मृत्यू तव नकळे कोणातें ॥ मारूनी टाकी तूं सर्वांतें ॥ धावे कंस मग बंदिशाळेतें ॥ अपटुनि मारित भगिनिसुतातें ॥ पुढें आणिकही पंच झाले ते ॥ वधिले कळलें हें देवांतें ॥ आज्ञापी श्रीपति शेषातें ॥ कीं जावें देवकिउदरातें ॥ योगमाये धाडुनी अनंतें ॥ नेला गर्भ रोहिणिपोटीं ते ॥ बलिभद्र उद्भवला तेथें ॥ पुढें हरी देवकिउदरातें ॥ चाल ॥ येतांचि रूपें हरिच्या देवकि ती काय बोले ॥ १ ॥

**पद राग सोरट ताल एका.**

देहभान विसरूनी वसुदेवाप्रति काय वदे देवकी ॥ ध्रु० ॥ गर्भीं हरी तदनुकारी बोले माय कीं ॥ १ ॥ दैत्य आटिन कंसा वधिन भक्तघातकी ॥ २ ॥ दीनोद्धार करिन पार महत पातकी ॥ ३ ॥

**श्लोक मालिनी.**

वदन अनकदुंदूभी प्रियेचेंच झांकी ॥ न वद मम सखे गे वृत्त हें रक्षकां कीं ॥ कथितिल कळल्या हें वृत्त गे कंसराया ॥ क्षण न उशिर लावी घात तूझा कराया ॥ १ ॥

**॥ आर्या ॥**

इतक्यांत कंस आला दूतमूखें वृत्त हें कळुनि त्याला ॥ धांवत जाय भिऊनी पाहुनिया विष्णुरूप भागिनीला ॥ १ ॥

**पद राग झिंजोटी ताल त्रिवट.**

अवतरला कृष्णनाथ यदुवंशांत हो ॥ ध्रु० ॥ बुधाष्टमी वर्षाऋतु कृष्णपक्षीं शनिवारीं श्रावणांत माध्यान्हीसी हो ॥ १ ॥ अष्टवर्ष मूर्ति [illegible] हातीं शंख चक्र गदा धृत जनानि पहात हो ॥ २ ॥ शामसुं[illegible]ळ पाहुनिया बाळ आनंदें माय प्रार्थीत हो ॥ ३ ॥

**पद राग पिलु झिल्हा ताल त्रिवट.**

ाय विनावि ल्हान होई हरी ॥ बहुत पुत्र कंसें मारीले ठेऊं कोठें
ांग तरी ॥ १ ॥

**॥ आर्या ॥**

ा नंदगृहीं यातें जगतां पाहूं कधीं तरी बाळ ॥ देवाकि वदे पतीतें
इतुक्यांत कंस तो काळ ॥ १ ॥

**मा० प० माय विनावि:—**

करूनिया विचार मनीं ॥ बोले वसुदेवासी मायामोह सती यजुनी
॥ बंधमुक्त पिता हो हरीकृपेनें ॥ मायें निद्रित रक्षक असतां
ुनि द्वारें मुरारिस ने ॥ २ ॥

**श्लोक ललित.**

ेघवृष्टि ये सरिवरीसरी ॥ शेष तो हरीवरि फणा धरीं ॥ जात जों
ं त्वरित ये वरी ॥ भेटण्या रवीकुमरि त्या हरी ॥ १ ॥

**॥ ओंव्या ॥**

जों जों नीर लागे भारी ॥ बाळा पिता करी वरी ॥ उपाय नसे
नि करी ॥ चिंता फार वसुदेव ॥ १ ॥ जाणूनि त्याच्या चिं-
॥ दया येऊन हरीस ॥ पदांगुष्ठ लावितां जलास ॥ मार्ग होय
जाया ॥ २ ॥

**॥ अभंग ॥**

माया योगें सर्व निद्रिस्त ते जन ॥ गोकूळांत कृष्ण आला तेव्हां
१ ॥ मध्यरात्रीमाजीं नंदगृहीं जात ॥हरीसी ठेवीत सतीपुढें ॥२॥
ादेची कन्या योग माया तीला ॥ घेउनीया आला बंदीशाळें ॥३॥
मायें सर्व द्वारें बंद झालीं ॥ रडाया लागली योगमाया ॥ ४ ॥
जाऊनीया कंसा कळवीत ॥ येत तो त्वरीत बंदीशाळें ॥ ५ ॥
नी मायेसी आपटाया जातां ॥ झिडकारुनी हाता वरी गेली ॥ ६ ॥

**॥ आर्या ॥**

गगनीं जातां वदली वाढे रे तव रिपू व्रजामाजीं ॥ भरलें आयुष्य
यमसदना पाठवील तो गाजी ॥ १ ॥

### पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

झाला आनंद नंदयशोदेला ॥ ध्रु० ॥ अवचित निद्रेतुनी जागृत तों पाहूनि सुपुत्राला ॥ १ ॥ गोकुळीं वार्ता कळुनि सुवासिनी येती पहा-याला ॥ २ ॥ ओंव्या भारिती शर्करा वाटिती गुढ्या उभारील्या ॥३॥ बहु धन वाटुनि नंद गर्गमुनी पुसत जातकाला ॥ ४ ॥

### पद राग काफी ताल पंचमात्रिक.

जातक वर्णी गर्गमुनी ॥ ऐकत जन आनंदूनी ॥ ध्रु ॥ येशोदे सुयोगतव सुता ॥ भय या फार खेळतां ॥ होईल दैत्यदंडिता ॥ चोर गोरसभक्षर्णा ॥ १ खोड्या करिल घरोघरीं ॥ भोगिल बहुत सुंदरी ॥ अगणित युवतींते वरी ॥ प्रिय हा सर्व जनीं ॥ २ ॥ कंसासुर मर्दून ॥ करिल भक्तरक्षण ॥ गर्गमुनी करि कथन ॥ विष्णुदास आनंदूनी ॥३॥

### पद राग कालंगडा ताल धुमाळी.

येउनिया माबळभट तों वदे कंसा हो ॥ ध्रु० ॥ असुरराज जो आपुला वैरी ॥ गोकुळि वधितों मी निर्धारी ॥ ऐकुनि कंस गौरव करी ॥ निघे झटपट हो॥१॥टिळा माळा यज्ञोपवीत ॥ करुनी पंचांग धारण हातांत ॥ लटके भाव भटाचे करीत ॥ येत गोकुळीं हो ॥२॥ पुसे जनां नंदसदन ॥ कोठें दावा मजलागून ॥ कर्ता भूतभविष्य कथन ॥ आहें मी जनहो ॥ ३ ॥ पाहुनि चकित गौळिजन ॥ जाती भटजीतें घेऊन ॥ तों तो लागे करूं कथन॥नंदसदनीं हो ॥ ४ ॥

### पद राग पिलु ताल धुमाळी.

पडले वाईट ग्रह जन्मीं गे तुझ्या कृष्णाला॥अस्यानर्थं तुह्मांसह व्रजजनिं ओढवेल सर्वांला ॥ ध्रु० ॥ काळापरिस दुष्ट वर्ण याचा काळा ॥ जों जों वाढे तों त्रास या गोकूळा ॥ सोडुनि ममता बाहेर ठाकी याला ॥ चा० ॥ नोहे बाळ काळ हा कशाला देशी स्तनपानाला ॥ १ ॥

### ॥ कटाव ॥

मेणनी भगवंताशें अन्यायें मूढ वागती ॥ ध्रु० ॥ माता अंकीं कृष्ण-कपटि भटाची निंदा ऐकत ॥ अघटित करणी काय करीत ॥

वस्तूमात्रा आज्ञापीत ॥ समाचार घ्या याचा त्वरित ॥ मुसळें पाट स-मया अगणित ॥ उखळें घट रांजण विपरीत ॥ पक्षांपरि उडुनिया ला-गत ॥ घाबरूनी दैत्य बहूत ॥ फिटूनि वस्त्रें खालीं पडत ॥ रडत हरीतें शरण येत ॥ चा० ॥ श्रीकृष्ण क्षमा त्या करूनी ग्रामाबाहेर हकलीती ॥ १ ॥

### श्लोक पंचचामर.

हरीस मारण्यास कंस दुष्ट दैत्य पाठवी ॥ महाबळास मार देउनी मुरारि बोळवी॥वधावया हरीस पूतनेस तो विष स्तनीं ॥ तियेस धाडितां हरी वधीत रक्त शोषुनी ॥ १ ॥

### ॥ कटाव ॥

श्रीहरीस मारायातें कंसें बहु उपाय केले ॥ ध्रु० ॥ माबळभट पू-तंना फजति ॥ होतां धाडी शकटा त्वरित ॥ लाथेनें हरि त्यातें मा-रित ॥ पुढें धाडिला तृणावर्त ॥ ग्रीवा पिळुनी त्यातें मारित ॥ एके दि-वशीं बहु अद्भूत ॥ विश्व मुखीं मातेसि दावित ॥ गोरस बहु गोकुळीं चोरित ॥ परोपरीच्या खोड्या करित ॥ विमलअर्जुनालागि उद्धरित ॥ नौकाचरित अघटीत दावित ॥ अहि कालियासी मग मर्दित ॥ द्वादश गावें अग्न गिळीत ॥ करांगुलीं गोवर्धन धरित ॥ भौमासुर असुरासी मर्दित ॥ पितृद्रोहि देवांतक मारित ॥ तृणावर्त धेनुका उद्धारित ॥चा०॥ आनंदें ऋषिपत्न्यांनीं अन्नें त्या तृप्त केलें ॥ १ ॥

### ॥ ओवी ॥

पुढें कुमारी कात्यायनीव्रत्त ॥ हरीप्राप्तीलागी करीत ॥ वचन देउ-नी भगवंत ॥ बोळवीत गोपींतें ॥ १ ॥

---

## रासक्रीडा.

### पद राग कालंगडा ताल त्रिवट.

गोपीहेत पुरवावया शरदतुरात्रीं वृंदावनीं वाजवि हरि मुरली ॥ ऐकुन गोपींची चित्तवृत्ती हरली ॥ १ ॥

### पद राग झिंजोटी ताल धुमाळी.

सुचेना ह्मणती धंदा लागलों छंदा ॥ कसा वेणु मधुर वाजवी हरी ॥ ध्रु० ॥ क्षण एक न गमे आह्मां मंदीरीं विरही नारी ॥ १ ॥ कामव्यथा दुःसह काय तरी छळीत फारी ॥२॥ निघती त्या भेटायासी विष्णूदास वदे सुंदरी ॥ ३ ॥

### पद राग पिलु ताल धुमाळी.

पडतां वेणूरव कानीं रात्रीं निघती गोपीका ॥ त्वरीत निघती गोपिका ॥ कृष्णदर्शनउत्सुक भ्रमें काय करिती त्या ऐका ॥ ध्रु० ॥ भाळीं काजळ लावीती ॥ कुंकुम अंजनवत् लेती ॥ नाकीं बुगड्या घालीती॥कानीं नथा अडकवीती ॥ हातसर पायीं बांधीती ॥ स्वमतें थाटुनिया निघती ॥ चा० ॥ विपरित सजूनिया ऐशा विसरुनि घरच्यांच्या धाका ॥१॥ कोणी कुंचाकि नेसूनी॥लुगडीं कंचुकिचे स्थानीं ॥ गोपीथवे धावाति रानीं॥ऐकत वेणूचा ध्वनी ॥ हरि गांठूनि पुसत रमणी॥कां बाहिलें आह्मां ह्मणुनी ॥ चा० ॥ कामुकभावें भुलवाया नयनशर फेकिति गोपीका ॥ २ ॥

### पद राग यमन ताल धुमाळी.

मग व्रजवधु पहावया चित्त हरी वदे त्यांसी ॥ जा स्वगृहां सोडुनि आला कांगे पतिसी ॥ ध्रु० ॥ निशीं तुह्मांसि पहातां येथें येइल आळ॥ आह्मांवरी त्रासलों आतां नको हें गोकूळ ॥ पाहतां नादि लाऊं आह्मां करुनी धूळ॥संसारांची परबालक लाउनि खूळ ॥ चा०॥ फंद सर्व तुमचे हे परि घरिं मार आह्मासी ॥ १ ॥

### पद राग कालंगडा ताल त्रिवट.

हरहर विस्मयें वदत गोपी काय माधवासी ॥ कषटाळुनि तयासी लागुनि पायीं म्हणती दासी ॥ सिद्ध प्राण द्यावयासी झाल्या श्रीहरीपाशीं ॥ ध्रु० ॥ उतरुनी भ्रम आठवला गृहधंदा ॥ म्हणती कां बाहीलें मुरलीरवें नंदकंदा ॥ लागलों त्यजूनी पती गृह तुझ्या छंदा ॥ चा० ॥ आदि देउनि वचनासी दीना आतां कां सोडीसी ॥ १ ॥

मा० प० मग व्रजवधुः—

त्रासुनि गृहाचि आम्ही आलों या वनीं ॥ सौंगड्यांसहित

ोडतों वेणु वाजउनी ॥ येथें आलों तरी तुम्हीं आमुचि पाठ पुरऊनी ॥ ुड घ्याया आला मसलत सर्व करूनी ॥ चा० ॥ दुजा वनासि जाऊं भाडऊं नका आम्हांसी ॥ २ ॥

### पद राग झिंझोटी ताल एका.

एक चिमणी गोपिका पदर शालेचा ॥ धरुनि हरिस पुसती ॥ चतुर अती ॥ ध्रु० ॥ ठावा आहेस लटका हे ठका ॥ आतां नोहे मी नेणती ॥ १ ॥ अल्लड मजसि मथऊन फसऊन ॥ आतां कां तूं लोटिसी ॥ २ ॥ फुका सोंग करूं नका आयका॥विष्णूदासां धरा हातीं॥३॥

### पद राग झिंझोटी ताल त्रिवट.

बोले हरीसी सुगुणी कर धरूनी ॥ आहा ! ठका आतां फिरलासी ॥ ध्रु० ॥ प्रथम मसी झटीं॥धरुनी हनुवटी ॥ यमुनेच्या तटीं ॥ शपथ तरी मानी ॥ १ ॥ थिल्लर तुझ्या धंदे ॥ फसूनी तुझ्या छंदें ॥ वागलों आम्ही नादें ॥ पडुनिया मोहनी ॥ २ ॥ आतां झिडकारीसी ॥ न सोडूं तूजसी ॥ अंत कां पाहसी ॥ विष्णूदास मनीं ॥ ३ ॥

### पद राग कालंगडा ताल त्रिवट.

लाडकी गोपी हरी मिठी घाली लटकी न क्रूरता हरिमनीं ठरली ॥ ध्रु० ॥ बहाणें म्हणे आतां किति करशिल तरी ॥ ठकविद्याच मांडिली ॥ १ ॥ न कळतें मज तरी साजतें तुज हरी ॥ ओळख तूं मज भली ॥ २ ॥ विष्णुदास म्हणे हरीठकविद्या ॥ तीजपुढें संपली ॥ ३ ॥

### मा० प० मग व्रजवधुः—

जाणूनि गोपिंचें अंतर श्रीहरि द्रवला ॥ त्यांसह आनंदें रास पुढें मांडीला ॥ सभोंवत्या गोपी घालि मध्यें फुगडीला ॥ हसतांचि दुज्या मग त्यांच्याशींहि खेळला ॥ चा० ॥ गाती मृदंगटाळसह सुस्वर त्या गीतासी ॥ ३ ॥ गर्दी करित रंगाची फेंकिति गुलालाला ॥ क्रीडती परोपरि कालिंदीतीराला ॥ वरिवरि वारा घालिती कोणि कृष्णाला॥ स्वरूपगुणांचा गर्व युवतिंसी झाला ॥ चा० ॥ विष्णुदास म्हणे त्या वदती काय हरीसी ॥ ४ ॥

### पद राग गौरी ताल त्रिवट.

गोपि म्हणाति एकमेकीला ॥ आम्हां आधिन हा हरि झाला ॥ध्रु०॥ गुणरूपें त्या भुलवीला ॥ हव्या तशा वागऊं याला॥श्रमल्या त्रिभुवानें न सांपडे ॥ तो वेडे वांकडे संवगडे ॥ चा० ॥ सह खेळे लाज न याला ॥ १ ॥ नोहे प्राप्त तप केल्यानें ॥ योगयादिक साधनें ॥ मौन ध्यान जपमुद्रेनें ॥ कारितांही बहु साधनें ॥ चा० ॥ तो मूढापरि भुलवीला ॥ २ ॥ गृहपति त्या मग आठवला ॥ म्हणति व्यर्थ भुललों याला ॥ भय यासंगें आम्हांला ॥ विष्णुदास म्हणे श्रीहरिला ॥ चा० ॥ गोपींनीं झिडकारीला ॥ ३ ॥

### पद राग बिहागडा ताल धुमाळी.

मग गोपींते विनवि हरी ॥ त्यागूं नका मज ध्या पदरीं ॥१॥ कोण तुम्हांविण मजासि तरी ॥ क्षमा करा अपराधि जरी ॥ २ ॥ गोपि न ऐकति पाहूनी ॥ गुप्त होय एकीसह वनीं ॥ ३ ॥ गोपी गर्व हरायासी ॥ दास विष्णु म्हणे त्याजि त्यांसी ॥ ४ ॥

### श्लोक शुद्धकामदा.

कृष्ण नाहिंसा देखुनी सती ॥ खेळ सोडुनी धुंडु लागती ॥ बावऱ्या मनीं खिन्न होउनी ॥ शोक मांडिती हंसगामिनी ॥ १ ॥

### ॥ आर्या ॥

वदती त्या मग गोपी राधाकृष्णासि घेउनि गेली ॥ सोडुनि आम्हां सर्वां एकाटि ती त्यासवें करी केली ॥ १ ॥

### पद राग यमनकल्याण ताल त्रिवट.

हरहर फसलों गर्वें आम्ही गोपीका ॥ तेणें अंतरलों व्रजनायका का ॥ ध्रु० ॥ काय न्यून त्याला ॥ कशासी आम्हाला ॥ पुसेल बहू मिळतिल बायका ॥ १ ॥ रासानंदांत ॥ बोललों विपरित ॥ तेणें आला त्यासी रागझटका ॥ २ ॥ जिव्हा नोहे बरी ॥ कारि विपरीत परी ॥ विष्णूदास म्हणे जन ऐका ॥ ३ ॥

### पद राग लीलांबरी ताल धुमाळी.

कां उग्या काल दवडीतां गे॥चला वनें पाहूं हरिसि तरि गे

॥ ध्रु० ॥ रडुनिभेकुनि कां सत्य मिळेल हरी ॥ काय अशा ह्या बसलां गे ॥ १ ॥ यत्नावांचुनि सत्य प्राप्त न ॥ खिन्न मनें कां रडतां गे ॥ २ ॥ गर्वरहित व्हा भाव धरा मनिं ॥ विष्णूदासां भेटे गे ॥ ३ ॥

### पद राग मल्हार ताल त्रिवट.

गोपी मदनें विठ्ठल हरीप्रती बहाती ॥ दुखें बहुत स्फुंदूनी रडती ॥ ध्रु० ॥ ह्मणती नंदानंदा ॥ लाऊनी आह्मा छंदा॥गेलात मूकुंदा ॥ पुढें काय आमूची गती ॥ १ ॥

### पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

सखयांनो दाखवा गे मनमोहनासी आतां कोणी ॥ध्रु०॥ बाई आह्मां विरह साहेना॥चैन पडेना॥धीर धरवेना ॥चा०॥ लोळत धरणीं॥१॥ घाबऱ्या होत सुंदरी ॥ वदत हरी हरी॥शोकें सर्व नारी ॥चा०॥ विठ्ठळ होऊनी ॥ २ ॥ विष्णुदास ह्मणे यूवती सैरा धांवती ॥ वृक्षा पूसती ॥ चा० ॥ श्रमें नमूनी ॥ ३ ॥

### पद राग छायानट ताल धुमाळी.

गोपि पुसति वृक्षांला ॥ सांगा मुरहर कोणीकडे गेला ॥ ध्रु० ॥ मौन धरुनि बसला परि विरहिणि शापूं तुह्मांला ॥ १ ॥ आवळि नारळि केळि तोरणि जांबुळि बकुळि पोफळि कर्दळिला ॥ २ ॥ बदरि दाडिमि नारिंगी आणि अंजिरि शतावरि खजुरि वटाला ॥ ३ ॥ चंपक केतकि रेवति मालति देवदार करविरिला ॥ ४ ॥ पक्षि अपरमित पाहुनि त्यांतें पुसति कोणि शुद्धीला ॥ ५ ॥ न सांगती कोणि पाहुनि दुःखें युवति करिति रुदनाला ॥ ६ ॥

### पद राग पिलु ताल त्रिवट.

आह्मां क्षण करमेना हरीवीण बाई॥चैन जिवा नाहीं करावी गत तरी कायी॥धु०॥ बोलल्यों तुह्मांस गर्वें ह्मणुनी मन॥कीती हे निष्ठुर प्राण घेईल जाण॥कोण आह्मां दुजा तारिता तुजविण ॥ आह्मी गाई ॥ १ ॥ ये त्वरें भेटे आह्मांसि अनंता आतां ॥ करुनि क्षमा बृद सांभाळावें नाथा ॥ पदरीं घ्याव्या आपुल्या ह्या दीन कांता ॥ लीन पायीं ॥ २ ॥

### ॥ दिंडी ॥

गूणरूपें ग्यां कृष्ण भूलवीला ॥ गर्व ऐसा जाहला राधिकेला ॥

आणुनी हें सोडूनि तिला रानीं ॥ आला गोपी त्या बसत जये-स्थानीं ॥ १ ॥

मा० प० आम्हां क्षण:—

गर्वरहित भाव पाहुनि श्रीधर ॥ प्रगटुनि गोपीस भेटे सुरवर ॥ तों येत राधा शरण त्या सत्वर ॥ लागे पायीं ॥ ३ ॥

### टिपरीचें गाणें.

पद राग कालंगडा ताल त्रिवट.

पुनरपि गोपींसहित हरी ॥ मोदें कुंजवनिं क्रीडा करी ॥ १ ॥ काय वर्णुं त्या सुखासी ॥ खेळे परोपरि गोपीशीं ॥ २ ॥ आनंदुनिया मानसीं ॥ रते विलासें मग त्यांशीं ॥ ३ ॥ षण्मासांची रात्रि करी ॥ पुरवि गोपिहेत मुरारी ॥ ४ ॥ सुगंधि द्रव्यें लावीत ॥ गुलाल रंगा उडवीत ॥ ५ ॥ परोपरी क्रीडा करुनी ॥ काय वदे गोपिंलागूनी ॥ ६ ॥ जावें आपुल्या आतां घरीं ॥ चित्त असूं द्या मजवरी ॥ ७ ॥ सर्व कामना पुरवीन ॥ करितां मम नामस्मरण ॥ ८ ॥ चित्त ठेउनी हरिपाशीं ॥ आल्या गोपी गृहासी ॥ ९ ॥ न रुचे त्यां गृहपती ॥ सदां मुखें हरिगुण गाती ॥ १० ॥ विष्णुदास ह्मणे हरिभजनीं ॥ आसक्त तया न गमे जनीं ॥ ११ ॥

---

## कात्यायनीव्रतासह रासक्रीडा.

पद राग कानडा ताल त्रिवट.

शृंगाररस नाटकास्तव ॥ ब्रह्मवैवर्त कृष्णखंडांतिल घेतालि ही कथा ॥धृ०॥ गोकुळवासी राधाप्रमूख गोपीकृष्ण प्राप्तीकारितां॥करित्या झाल्या सर्वहि मिळुनी कात्यायनिवृत्ता ॥ १ ॥ पूजन आर्चन गौरीस्तवन करूं व्रताचें त्या संपूर्ण ॥ राधेसह शृंगारुनी स्नाना आल्या त्या ॥ २ ॥

पद राग सिंधकाफी ताल एका.

र्ण करावया व्रतासी ॥ आल्या यमुनास्नानासी ॥१॥ सकल

आणुनी हें सोडूनि तिला रानीं ॥ आला गोपी त्या वसत जये-स्थानीं ॥ १ ॥

मा० प० आम्हां क्षण:—

गर्वरहित भाव पाहुनि श्रीधर ॥ प्रगटुनि गोपीस भेटे सुरवर ॥ तों येत राधा शरण त्या सत्वर ॥ लागे पायीं ॥ २ ॥

### टिपरीचें गाणें.

पद राग कालंगडा ताल त्रिवट.

पुनरपि गोपींसहित हरी ॥ मोदें कुंजवनिं क्रीडा करी ॥ १ ॥ काय वर्णुं त्या सुखासी ॥ खेळे परोपरि गोपीशीं ॥ २ ॥ आनंदुनिया मानसीं ॥ रते विलासें मग त्यांशीं ॥ ३ ॥ षण्मासांची रात्रि करी ॥ पुरवि गोपिहेत मुरारी ॥ ४ ॥ सुगंधि द्रव्यें लावीत ॥ गुलाल रंगा उडवीत ॥ ५ ॥ परोपरी क्रीडा करूनी ॥ काय वदे गोपिंलागूनी॥ ६॥ जावें आपुल्या आतां घरीं ॥ चित्त असूं द्या मजवरी ॥ ७ ॥ सर्व का-मना पुरवीन ॥ करितां मम नामस्मरण ॥ ८ ॥ चित्त ठेउनी हरिपा-यीं ॥ आल्या गोपी गृहासी ॥ ९ ॥ न रुचे त्यां गृहपती ॥ सदां मुखें हरिगुण गाती ॥ १० ॥ विष्णुदास ह्मणे हरिभजनीं ॥ आसक्त तया न गमे जनीं ॥ ११ ॥

---

## कात्यायनीव्रतासह रासक्रीडा.

पद राग कानडा ताल त्रिवट.

शृंगाररस नाटकास्तव ॥ ब्रह्मवैवर्त कृष्णखंडांतिल घेतालि ही कथा ॥धु०॥ गोकुळवासी राधाप्रमूख गोपीकृष्ण प्राप्तीकारितां॥कारिया झाल्या सर्वहि मिळुनी कात्यायनिवृत्ता ॥ १ ॥ पूजन आर्चन गौरीस्तवन करूं व्रतांचें त्या संपूर्ण ॥ राधेसह शृंगारूनी स्नाना आल्या त्या ॥ २ ॥

पद राग सिंधकाफी ताल एक्का.

पूर्ण करावया व्रतासी ॥ आल्या यमुनास्नानासी ॥१॥ सकल

वस्त्राभरणें ठेउनि कडेवरी ॥ गेल्या जलाभीतरीं ॥ २ ॥ जलामाजी क्रीडा करित सुंदरी ॥ कळ्ळानें काय करि हरी ॥ ३ ॥ सर्वांतरजाणक सूत्र मुरारी ॥ लीला करित बहुपरी ॥ ४ ॥ गोपालांसहीत यमुने तिरीं ॥ येऊनीया लवकरी ॥ ५ ॥ शरण यावयासि सर्व सुंदरी ॥ वस्त्राभरणें तत् हरीं ॥ ६ ॥ चढे सर्व घेउनि कदंबावरी ॥ घाबऱ्या पहात सुंदरी ॥ ७ ॥

### पद राग मुलतानीधनासरी ताल धुमाळी.

चोरिलीं हरिनें सर्वहि वस्त्राभरणें गोपींचीं ॥ स्नानें करुनि त्याव-याचीं ॥ ध्रु० ॥ पहातांचि गोपि घाबरल्या ॥ चकित येत यमुनेंतुनि बरति ॥ ओलेल्या गुह्यें झांकुनि हातीं ॥ १ ॥ गोपांसह कृष्ण कदंबीं पाहुनि राधेसहीत स्थळिं त्या ॥ येउनि स्तुति करिती हरिची ॥ २ ॥

### पद राग पहाडीभैरवी ताल धुमाळी.

कृपाघना माधवा गोविंदा शेषशाई ॥ लाज राखीं आमुची शरण पायीं वस्त्रें देई ॥ १ ॥

### पद राग देस ताल दीपचंदी.

लटकें बोलाति पोरी भारी आह्मांवरी चोरी कांहो घालीती गोपांनों॥ काय गोकूळीच्या ह्या अतिशय थिल्लर घरघरच्या नारी बालव्या ॥ध्रु०॥ नेणतपणें आह्मी खेळत येथें ॥ काय चेष्टा करिती आमूच्या ॥ काय आह्मां समजतें परी या हावभाव करीती वृक्षतळीं ॥ भलतीं अंगें मो-कळीं वस्त्रहीन भुलवावया दाविती आह्मांसी ॥ तरुणी सुगुणी ह्या ला-वण्यखाणी चित्त आमचें वेधीती संकेतें ॥ नको गड्या आजपासून य-मुनातिर जाऊं दूजा वनाप्रती खेळाया ॥ चा० ॥ काय हो तुफान पुढें झालें न मागें लहान असुनि रचीती चोरव्या ॥ १ ॥

### पद राग सोरट ताल एका.

हींच वेळ काय मस्करिची सांग गोविंदा ॥ दे दे वस्त्राभरणें आ-मचीं त्वरित मुकुंदा असें प्रार्थित राधा ॥ ध्रु० ॥ आतां येतिल येथें वृध्दा वृध्द पाणियासी ॥ पाहुनि हंसतिल ते सर्व आह्मांसि आणि तू-ह्मसी ॥ वस्त्रहीन कसें रहावें सांग तरी आह्मांसी ॥ जहाल्याकरीं बय-क मग आह्मीं तुझ्या सदा ॥ हसति गोप खदखदा ॥ १ ॥

**पद राग झिंझोटी ताल त्रिवट.**

पोरिनो मागावीं आपुल्या भर्यां वस्त्राभरणें ॥ मागूं नये भलत्यांसी ॥ ध्रु० ॥ लहान वयांत परपुरूषाशीं कशा बोलता ॥ हावभावही क-रीता ॥ वस्त्रहीन कशा टकमका पुरूषां पाहता ॥ लहान पोरैंही गाठी-ता ॥ नाहीं कांगे स्वसापती आडवीते तुह्मां घरीं ॥ फिरतां मोकळ्या बाहेरी ॥ १ ॥

**मा० प० हींच वेळ काय:—**

पहिल्यापासुनि ठक चोर जार आहेस तूं हरी ॥ चावटपणें करिसि थोर बायकांचि मस्करी ॥ मारिलें यशोदेनें तूजलागि किती तरी॥चा०॥ कळल्यास हें घरच्यांस आमची करतिल आपदा ॥ सोड सोड मुकुंदा ॥ २ ॥

**मा० प० पोरींनो मागावी:—**

कोठें दावा गे वस्त्राभरणें ठेविलीं आह्मीं घेऊन ॥ बोलता गळीं प-डून ॥ कोण्या सोद्यानें वस्त्राभरणें घेतलीं तूमचीं हिरून ॥ तें छपवाया लागून ॥ सांगणार घरच्यांसी आह्मांवरी बालट घालून ॥ फार शाह-ण्या जा येथून ॥ २ ॥

**पद राग भूप ताल त्रिवट.**

राधा बोलत मनोहरा सुंदरा कां मनिं तुमच्या इतकी त्वरा ॥ ध्रु० ॥ हरि तव प्राप्तिकरितां आह्मीं आचरिलें कात्यायनिव्रतां अनंता ॥ परी कांहीं काळ धीर धरा प्रियकरा ॥ १ ॥ मोहुनि भ्रूसंकेतें त्यांणीं हरि आणिला वृक्षाखालता ॥ अलिंगिती श्रीधरा उपवरा ॥ २ ॥

**मा० प० गोपी पूर्ण करा:—**

कांहीं काळें सर्वहि आली मुकुंदा ॥ देह आर्पूं तुझ्या पदां ॥ ८ ॥ एकुनि वस्त्राभरणें हरि दे सर्वांसी ॥ लागति दासी चरणासी ॥ ९ ॥

**मा. प. पोरींनो मागा:—**

कांहीं काळें मूरलीरवें तुह्मां खूण करीन ॥ या गे सर्वही मिळून ॥ क्रीडा करूं कुंजवनीं रासमंडळीं जमून ॥ स्मरणीं ठेवा हें वचन ॥ संतोषानें निघती त्या हरिची आज्ञा घेऊन ॥ वस्त्राभरणें लेऊन ॥३॥

### मा. प. शृंगाररस नाट:—

स्नानें करुनी गोपी येउनि करिती देवीव्रत संपूर्ण ॥प्रसन्न होउनि अंबा त्यांतें अशिर्वाद देत ॥३॥भाग्यवान भोगाल गोपिका सदा तुह्मी गे त्या अनंता ॥ श्रीहरिप्राप्ति सदा होतसे विष्णुदासां गुण गातां ॥ ४ ॥

### मा० प० गोपी पूर्ण करा:—

गोपी सर्व मिळुनि जात गृहांसी ॥ स्तवित हरिसि मानसीं ॥ १० ॥ घरोघरिं स्वस्थ रहात सुंदरी ॥ चित्त ठेउनि हरिवरी ॥ ११ ॥ यापरि तीन वर्षें लोटल्यावरी ॥ उपवर जाहल्या सुंदरी ॥ १२ ॥ सर्वांतर जाणक सूज्ञ तो हरी ॥ करित काय यावरी ॥ १३ ॥

### श्लोक मालिनी.

वचन व्रजवधूंला माधवीं शुक्लपक्षीं ॥ स्मरत हरि दिलेलें सर्व संसारसाक्षी ॥ त्वरित मग हरी तो कुंजवाटीस आला ॥ कथित करि विधात्या केलिच्या साधनांला ॥ १ ॥

### ॥ साक्या ॥

ऐकुनि हरिच्या वचनालागीं भिन्न भिन्न तीं सदनें ॥ नऊ लक्ष तो निर्मी धाता रत्नखचित इच्छेनें ॥ १ ॥ करुनि ऐशा रासमंडळा फलपुष्पितवृक्षांला ॥ भरी सुगंधीं द्रव्यानें तीं शेष वर्णितां थकला ॥ २ ॥

### पद राग धनासरी ताल धुमाळी

अतिरमणीय सुशोभित वृक्ष कुंजवनांत ॥ पशूपक्षिही अनेक जाती सारसिं विहार करित ॥ ध्रु० ॥ फणस नारळी तोरणि जांभळी ताड माड यां आले पाड हो गेले गगनचुंबीत ॥ १ ॥

### पद राग वसंत ताल त्रिवट.

गोपीमनोरथ पुरवावया हरीनें ॥ शरदतूरात्रीं एके कुंजवनीं वृंदावनविहारी वाजवी मुरली ॥ मधुरध्वनी ॥ध्रु०॥ ऐकत चंद्र स्थीर समीर यमुनाजळ वृक्ष पशू पक्षी शांत रहाती ॥ डोलतां फणी वाटे पडेल धरणी ऐकुनि कामोद्दीप्त तरूणी ॥ हरीस्मरणीं ॥ १ ॥

### पद राग काफीजिल्हा ताल दीपचंदी.

गोपी एकीमेकीस सुचवीती राधे घेऊनी कुंजवनीं ॥ कारितसे मधुर

ध्वनी ॥ चला कामीनी मूरलीची गे हरी तो ॥ ध्रु० ॥ ऐकल्यानें हरिच्या वेणूनादा ॥ न सुचे कांहीं गृहीं कामधंदा ॥ चला भेटाया त्वरित मुंकुदा ॥ रमता काय ॥ १ ॥ कोणी हारतुरे घेऊन ॥ कोणी सुगंधिद्रव्यें भरुन ॥ ताटीं आरत्या तांबूल घेऊन ॥ धावत वनीं ॥ २ ॥ तेजें चमकत वीजेपरी ॥ पायीं नूपूरें वाजतीं भारी ॥ विष्णुदास वदे जाती सुंदरी ॥ मृगनयनी ॥ ३ ॥

### पद राग पिलु ताल दीपचंदी.

जमल्या गोकूळींच्या वयस्क मुली ॥ ध्रु० ॥ तरुणी सुगुणि अती रूपवती त्या ॥ राधा घेउनि चालली ॥१॥ विरहज्वरें पीडीलें तयांसि मन ॥ मोहूनी भ्रांति पडली ॥ २ ॥ चमकती तेजें वस्त्राभरणें ॥ प्रभा भूमिस पडली ॥ ३ ॥ सहजगती हावभाव पाहूनी ॥ मदनमती ती चकली ॥४॥ लाज विवर्जुन गृह पती सोडुन ॥ एकिमागें दुजी चालली ॥ ५ ॥ कामोद्दीपक हारतुरेफळांदि सवें ॥ सुगंधी द्रव्यें घेतलीं ॥६॥ उतावळ्या हरीभेटी राहुनि शांत ॥ जात ऐकत मुरली ॥ ७ ॥ विष्णुदास ह्मणे श्रीधरें गोपींची ॥ चित्तवृत्ती हरिली ॥ ८ ॥

### पद राग झिंझोटी ताल त्रिवट.

एकीमेकीस काय बोलती मृगनयनी ॥ माधव वाट पहात बोलाऊं तेणें धाडिली कुंजवनीं मुरलीध्वनी ॥ ध्रु० ॥ लाऊं नका उशिर आतां साजणि जावयालागुनी ॥ १ ॥ नका बोलण्यासी गुंतूं राग येईल हरीलागुनी ॥ २ ॥ सर्व त्वरेनें नीघाल्या विष्णूदासांचा तो ज्या वनीं ॥३॥

### पद राग मुलतानीधनाश्री ध्रुवपदाचा ताल दीपचंदी, कडव्यांचा त्रिवट.

वेणूनाद ऐकत कामीनी ॥ आल्या हरी धुंडीत कुंजवनीं ॥ ध्रु० ॥ लागुनि पुरल्या नादा त्यागिति सर्वही गृहधंदा ॥ निशिदिनिं नंदनंदन दिसे नयनीं ॥ १ ॥ कामें पीडित होती झाली भ्रमीत चित्तवृत्ती ॥ धांवति अतिशय त्वरीत गतीं काननीं ॥ २ ॥ पळती रानोरानीं थांबुनि ऐकत वेणूध्वनी ॥ जाती वीरहें करूनी थकुनी ॥ ३ ॥ ईतुक्यांत हरिमूर्ती पाहुनि चरणीं लोळताती ॥ विष्णुदास आनंदानें त्या अती ॥४॥

### पद राग काफीजिल्हा ताल त्रिवट.

आनंद न मावे गगनीं हरिरूप तें देखूनि भूल पडली गोपिंस ॥ तल्लिन होउनि खेळति रास त्या नसे कांहीं पाड हो सुखास ॥ ध्रु० ॥ वंदीती त्या हरीचरणास ॥ देउनीया आलिंगनास ॥ पहाति आनंदें रासमंडळास ॥ वृंदावनास॥१॥निरनिराळीं नउ लक्ष सदनें ॥ नानापरींचीं क्रीडाकुंजस्थानें ॥ वस्त्राभरणें सुगंधी द्रव्यानें ॥ तोषे मानस ॥२॥ ॥ ३ ॥ रमणीय पाहूनी कुंजवन ॥ झाल्या गोपि पीडित मदन ॥ विष्णूदास ह्मणे जगजीवन ॥ न दिसे त्यांस ॥२॥

॥ ओवी ॥

इतक्यांत हरी राधे घेउनी ॥ गेला क्रीडावयालागूनी ॥ हें पाहूनि गजगामिनी ॥ ह्सूनि काय बोलती ॥ १ ॥

### पद राग भूपकल्याण ताल दीपचंदी.

शिव शिव व्यर्थ फसलों साजणि येऊनी ॥ नाटकि हरी गेला राधेसि घेऊनी ॥ ध्रु० ॥ राधा चेटकि आह्मां ठाऊक तीनें वेडें केलें हरिलागूनी ॥ १ ॥ पहिल्यापासुनि ठावका हा नव्हता काय तीच आवडे मनापासूनी ॥२॥ एक वेळ गाठूं पुसूं गे त्यासी विष्णुदास मिळूनी ॥३॥

### पद राग यमनकल्याण ताल दीपचंदी.

माधवासी कोणी सये सांगा जाऊनी ॥ आह्मी जातों गृहिं बैस राधे घेऊनी ॥ ध्रु० ॥ इतक्या नाहीं झालों अज्ञुनी फुकाच्या अर्जव करिसि घरोघरिं येऊनी ॥ १ ॥ दाऊं नको बडिवार तुझे हे राहूं स्वस्थ पतिशीं रमूनी ॥ २ ॥ ऐशा संगें हो खेद वारंवार विष्णूदास जाणा मनीं ॥३॥

### पद राग भूप ताल एका.

दुति सांगूनि हरीसी येथें घेऊनि त्वरें ये गे ॥ ध्रु ॥ पल युगपरि भासतसे ॥ काम बहू जाचितसे ॥ रात्रंदिन चैन नसे सत्य आह्मांसी ॥२॥

॥ ओवी ॥

दुती सांगे येऊनि हरीसी ॥ आतां पुढें काय करिसी ॥ गोपी हसूनि जाती गृहासी ॥ बैस राधे घेउन ॥ १ ॥

### श्लोक यूथिका.

घावक्कनें उठला मग श्रीहरी ॥ येउनी व्रजवधू विनवी परी ॥ त्या हि त्यास झिडकारूनि बोलती ॥ यावरी न बरवी तव संगती ॥ १ ॥

### पद राग सोनी ताल त्रिवट.

कोणी एकही शब्द बोलूं नका हरीशीं ॥ ध्रु० ॥ अर्जव करी परी तूह्मी पहा गे ॥ कसा कपटें रते हा राधेशीं ॥ १ ॥ पुसलें असतां भलतें सांगत ॥ कळलें परी सर्व तें आम्हांसी ॥ २ ॥ त्यापायीं आह्मीं गृहें पती त्यजिलें ॥ पारि करी कपट विष्णूदासांशीं ॥ ३ ॥

### श्लोक विभावरी.

युवतिंते पुनरपी विनवी हरी ॥ मज कथा घडलिया अनया तरी ॥ वचन हें परिसतां बहु क्रोध ये ॥ वदति गोपि कपटी हरि तूं स्वयें ॥३॥

### पद राग यमनकल्याण ताल धुमाळी.

खरोखरी सांग कोठें दडि दिधली होतीस गोपाला ॥ तुझ्या वियोगें कीरे झालों सकळ विकल अबला ॥ ध्रु० ॥ कस्तुरी तिलक काय भाळींचा चोळटला ॥ दांत कोण्या सवतिचे रुतले तुमच्या गालांला ॥ काय लागलें काजळ कुंकुम पहा हें मुखकमलाला ॥ अभरणें तोडीलीं वस्त्रें काय फाडोलीं पहा शेला ॥ अगदिंच तुमचा आजि नुर उतरुनिया गेला ॥ दम भरला किती घामानें डवडवला॥अशि कोण सवत विवशी ती भेटोली तुजला ॥ जिनें सर्व बहार हा तुझा लुटुनिया नेला ॥१॥

### पद राग काफी ताल दीपचंदी.

कांगें मनीं आणुनीं भलभलतें ॥ बालट व्यर्थ घालिता मजवरतें ॥ ध्रु० ॥ धुंद तुमचे नेत्र जवळीचें न दिसे ॥ आला इकडे चित्त भलतीकडे॥तुमचें कळलें मज हें पूरतें॥लाघवि बोल दिसती हे तोंडापुरते ॥ १ ॥ मूरलीवादनश्रमें घाम हा येऊन ॥ केशरकस्तुरिडाग लागलें तोंडावरते ॥ व्यर्थ ह्या रुसण्याला कोण पुसते ॥ २ ॥ वेणू वाजवीतां ा न राहून ॥ माझीं अंगुलिनखें रुतलीं माझ्या गालावरते ॥ लपवी मांगूनी ऐशातें ॥ ३ ॥

॥ ओंव्या ॥

न खपे ठक विद्या जाणून ॥ हरी विनवी गोपींलागून ॥ एक वेळ मज क्षमाकरून ॥ सोडा राग मनींचा ॥ १ ॥ ऐकून हरीचें भाषण ॥ कळवळूनिया गोपीमन ॥ आलिंगिती तयालागून ॥ ह्मणती राधेशीं न बोल ॥ २ ॥ आह्मांसी शरण आल्याविना ॥ न घेऊं राधेसी सत्य जाणा ॥ इतक्यांत राधा मृगनयना ॥ हरीस येऊन काय बोले ॥ ३ ॥

पद राग बहिरवी ताल त्रिवट.

हरि कां हो रूसला मशीं बोला ॥ राधा विनयें पुसत माधवाला ॥ ध्रु० ॥ काय चुकलें सेवेला ह्मणुनी त्यागीली दासीला ॥ अपराध काय झाला पदरीं घाला ॥ १ ॥ प्रीतिंत आड पडदा जरी कैशी प्राण ठेऊं तरी ॥ दिवस कंटू कोणावरी सांगा मजला ॥ २ ॥ हरिनें दिधली झिडकारून ॥ बसली वृक्षतळीं खिन्न ॥ विष्णूदास ह्मणे काय सांगे दुतीला ॥ ३ ॥

पद राग भूपकल्याण ताल दीपचंदी.

समजावूनी हरि आणी एथवरी ॥हवि त्यापरी विनवणी करूनी तरी ॥ ध्रु० ॥ सांग सहस्र अपराध क्षमा मज ॥ करूनी घ्यावी दासी त्वरें पदरीं ॥ १ ॥ व्यर्थ गर्वें मीं निंदीलें देवा ॥ गोपीनो मी तुमची दासी खरी ॥ २ ॥ विष्णूदास ह्मणे राधे निर्मत्सर ॥ पाहुनी गोपी धरिती त्या करीं ॥ ३ ॥

॥ ओंवी ॥

पुढें हरीनें एका गोपीसी ॥ दृढ कवळितां ह्रदयाशीं ॥ सुंदरी लीलावती तयासी ॥ चतुर काय बोलत ॥ १ ॥

पद राग मुलतानीधनासरी ताल त्रिवट.

नुसतें खेळूं या हरी ॥ध्रु०॥ करूं नको असें विपरित परी॥पहा लहान मी आहें किती तरी ॥ कां करशी आतांच बळजोरी ॥ विडा घे रहा दूरचेदुरी ॥ १ ॥

पद राग पिलु ताल धुमाळी.

फुगडिंत फीरफीरून ॥ पडशिल घेरी येऊन ॥ धरावें तुजलागी

ह्मणुन ॥ हात लाविला तो तूं कांगे टाकिसि झिडकारून ॥ १ ॥ तूं काय लहान सकुमार ॥ मी काय तुजहुनि बहु थोर ॥ दांडगा मजहुनि तव वर ॥ उगाच राहत असशिल त्याशीं मशिं नखरे फार ॥ २ ॥

**मा० प० नुसतें खेळूं:—**

राग आला हरिस जाणुनी ॥ विनोद हा सहज ह्मणुनी ॥ धरुनी हरी दृढ कवळुनी ॥ कडेवरी घेत सुंदरी ॥२॥ मग एकांतिं नेऊनी हरीसी ॥ चुंबनादिक सर्व विलासीं ॥ रिझऊनिया हरीमनासी ॥ विष्णुदास ह्मणे आली बाहेरी ॥ ३ ॥

**पद राग पिलु ताल त्रिवट.**

इकडे कृष्ण गोपींसवें कुंजवनीं खेळे ॥ आले गोप हे कळूनीं ॥१॥ पेंद्या वडूज्या गडीमिळुनी धांवत ते आले ॥ हुडकीत हरीसी वनीं ॥२॥

**॥ आर्या ॥**

आनंदें कुंजवनीं खेळत गोपींसवें हरी रास ॥ शोधित गोप आले त्यां पाहुनि ये गोपिंना बहू त्रास ॥ १ ॥ ह्मणती त्या श्रीकृष्णा देई लाऊनि यांस गा परत ॥ कळल्या गोपां करतिल बोभाटा कीं तुह्मीं आह्मी सक्त ॥ २ ॥

**पद राग कालंगडा ताल त्रिवट.**

सांपडलासी आतां हरी ॥ होतास काय करित ऐथें तरी ॥ ध्रु० ॥ हुडकीलें तुज वेळभरी ॥ खुळावलास पाहुन पोरी ॥ सांग वश तुज आहेत तरी ॥ नित्य खेळुं आह्मां बाहासि हरी ॥ आज पडलि तुज कशि विसरी ॥ १ ॥

**पद राग गौरी ताल त्रिवट.**

गड्यांनो पहा तेथें येउनी ॥ किती मजवरि तल्लिन त्या कामीनी ॥ ध्रु० ॥ हवी तशी मस्करी करीतों,मशीं परी खेळती आनंदूनी ॥१॥ स्वस्थ तुह्मी रहा जाऊनी खेळाया मी ॥ घेववितों तुह्मांलागूनी ॥ २ ॥

**मा० प० इकडे कृष्ण गोपींसवें:—**

॥ घेउन हरी कुंजामाजीं आले ॥ विनवीत मग तो गोपींसी

॥ ३ ॥ आह्मांसवें खेळायासी गोपाळ हे आले ॥ खेळाया घ्यागे तुम्हि त्यांसी ॥ ४ ॥

**पद राग सिंधकाफी ताल त्रिवट.**

सोड झटुं नको अंगासी ॥ गोपी वदती माधवासी ॥ध्रु०॥ या क्रीडास्थानासी ॥ कां आणिलें त्वां गोपांसी ॥ लाज वाटे पाहुन आम्हांसी॥ जातों आपुल्या गृहासी ॥ १ ॥

**पद राग पिलु ताल त्रिवट.**

तुह्मी सांगाल तें तें पुरवीन इच्छीत ॥ ध्रु० ॥ बहू आर्जवें हरी सर्व गोपींलागी प्रार्थित ॥ १ ॥ करूं नका गोपांपुढें तुह्मी ऐसें मज फजित ॥ २ ॥

**मा० प० सोड झटूं नको:—**

रमणीय वनाप्रती ॥ पुष्पार्थ आलों युवती ॥ तुज तिल्लर पोरसंगती दांडगाइ न करी आम्हांशीं ॥ २ ॥ सोड कारख्यांची संगती ॥ आह्मि सुचवावें तूज किती ॥ करूं इच्छीसी आमूची फजिती ॥ लाज वाटे ना कशी रे तुजसी ॥ ३ ॥

**मा० प० तुह्मी सांगाल तें:—**

मजला छंद लागला त्यांचा नाहीं सोडवत ॥ ३॥ बोलूं देत हवें त्यापरीं तुह्मीं न आणा मनांत ॥ ४ ॥ उगाच माकडचेष्टा करितें हवें तैसें बडबडत ॥ ५ ॥ परोपरीं ककुळतीनें हरी गोपींलागी विनवीत ॥ ६ ॥ विष्णुदास म्हणे न ऐकत पाहुन वचनस्मरण त्यां देत ॥ ७ ॥

**मा० प० सोड झटुं नको:—**

कोणी दिलें वचन तुजला ॥ सोडुनीया भ्रतारांला ॥ कोण पुसत गुराख्याला ॥ लाज वाटेना बोलायासी ॥ ४ ॥ दाखवाया थोरवी पोरांसी ॥ वारंवार आह्माशीं बोलशी ॥ ठकवीला ऐशी हरीशीं ॥ करितां संकट पडे देवासी ॥ ५ ॥

**मा० प० इकडे कृष्ण गोपींसवें:—**

गोपालांसी ऐसें वृत्त सांगत तो हरी ॥ न बधती गोपी मजसी ॥ ६ ॥

**पद राग कालंगडा ताल त्रिवट.**

उगाच थोरवि सांगसि येउन हरी आपुली ॥ गोपी न पुसती तुजला ॥ लाज वाटे पाहूनी हें आह्मांला ॥ १ ॥ स्वरूपगर्वें निंदिती हवें तसें बोलती ॥ तुज आणि आह्मांला ॥ काय सोनें रुपें लागलें त्यांला ॥ १ ॥ भुलतील आह्मांवर शेकडो यांहुनि सुंदर ॥ काय तोटा पडला ॥ कोण वश न होय यां फरज्यांला ॥ ३ ॥ व्यर्थ पाठीं लागसी अर्जवें करीसी ॥ काय न्यून तुजला ॥ ह्मशी देऊं आणुनी खेळायाला ॥ ४ ॥

**मा० प० इकडे कृष्ण गोपींसवें:—**

पहातो आणिक सांगून ह्मणुनी हरी गेला ॥ पुन्हां विनवी गोपींसी॥६॥

**मा० प० सोड झटुं नको:—**

तुजसंगें न करूं भाषण ॥ जाऊं संसारा मुकुन ॥ किती करिसी चढोरपण ॥ राग आला विष्णुदासांसी ॥ ६ ॥

**॥ आर्या ॥**

झिडकारित हरि गोपी परि त्यांतचि शिरत तो बळेंकरून ॥ परत न येई पाहुन विषयांधा हरि बहात आरडून ॥ १ ॥

**मा० प० इकडे कृष्ण गोपींसवें:—**

मग गोप धाऊनीया गोपींसन्निध आले ॥ कृष्ण कोठें पुसत तयांसी ॥ ७ ॥ कपटी गोपी मग त्यांनीं त्यांस झिडकारिलें ॥ बोलत काय ते गोपींसी ॥ ८ ॥

**मा० प० उगाचे थोरवि:—**

चोरट्या वैरिणी जारिणी पापिणी गोपींनो॥हरि दडवुनि बसला॥द्या नातर बंडवूं सत्य तुह्मांला ॥ ५ ॥ सभोंवतीं हिंडती गोपी मध्यें दडविती ॥ पितांबर दिसला ॥ गोपाळ ओढितीं धरून हरीला ॥ ६ ॥ पुन्हां [illegible] हटवीत ॥ गोपाळां दटावित ॥ धीर न त्यांजला ॥ प्राण देऊं

[illegible]

मा० प० इकडे कृष्ण गोपींसवें:—

गोपमन एक गोपी बोले ॥ एका दैसें नेलें हरिसी ॥ ९ ॥
ा गोपां ऐसें रडें कोसळलें ॥ पीटीती ते वक्षस्थळासी ॥ १० ॥
निष्कपट प्रेम गोपीमन द्रवे ॥ आनंदती बहु मानसीं ॥ ११ ॥
ो त्यां भेटउनी सर्व एक झाले॥आरंभिती मग क्रीडेसी ॥ १२ ॥.

पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

ावनीं गोपीगोप हरीसवें नानापरिच्या क्रीडा करिती ॥ ध्रु० ॥ ा झिंमे आणि कोंबडे लपंडाव कांहीं खेळती॥१॥चेंडुफळी विटि-ेघोडी डाव खोचा कोणि मांडीती ॥ २ ॥ अंधळिकोशिबिर ागडी शेळ्यामेंढ्या हे खेळ आरंभिती ॥ ३ ॥ एकमेकांवरी गुला- पिचकारीनें रंग उडविती ॥ ४ ॥ विष्णुदास मन रिझेंऊं श्री- ानंदें गोपींमध्यें मिसळती ॥ ५ ॥

पद राग पिलु ताल त्रिवट.

डे गे बाई एकहाती फुगडी खेळूंगा जरा गे बाई॥ध्रु०॥त्वरीत करधर गे चिर हरवेल बाळीबुगडी ॥१॥ रासानंद हा दुर्लभ इतरां पुन्हां ऐसी घडी ॥ २ ॥ विष्णुदास ह्मणे खेळुन श्रमतां बसती कुंजीं ं ॥ ३ ॥

पद राग यमन ताल धुमाळी.

फू फुगडी खेळुं जरा चिमणि म्हणाति राधे सुंदरा ॥ ध्रु० ॥
रि गिरिरिरी गिरकी आली ॥ वस्त्राभरणें विगलित झालीं ॥
कें काय ही भीति उपजली॥म्हणाति खेळ न हा हो बरा ॥ १ ॥
ड बुका वरि वरि फेकिति ॥ केशर कस्तुरि रंगें भिजती ॥ कडकड
त्यां काकडती ॥ आलिंगिती मग रमावरा ॥ २ ॥ अनंतरूपें म्ह-
आम्हांशीं ॥ खेळ खेळतो हरि गुणराशी ॥ षण्मासांची कल्पनिया
॥ अलभ्य विष्णुदासां इतरां ॥ ३ ॥

॥ ओवी ॥

ंग गोपगोपी घेऊनी ॥ चक्राकार उभे करूनी ॥ सुस्वर गान गा- ॥ गोफ टिपऱ्या खेळती ॥ १ ॥

# गोफटिपऱ्यांचा खेळ.

### टिपरी १ पद राग यमनकल्याण ताल त्रिवट.

एक टिपरी घे दुसरि संभाळ गे ॥ देउन तिसरि दे चौथी मागं ॥ पांचवी देउन सहावीस फिर गे ॥ सातवी बदल ॥ १ ॥ हरिसि खेळतां आनंद चित्ता ॥ गूण त्याचे गातां अघटित रे ॥ लिहावया धरणी न पुरे॥यथामति वर्णु त्या ॥ २ ॥ मुरलि अधरिं धरि सुस्वर भारी॥ वादन करि हरि प्रेमभरें ॥ भुललों गोपगोपी सारे ॥ अशि हरिमाया ॥ ३ ॥ ऐकतां तो कानीं मधुर मधुर ध्वनी ॥ चैन न सदनीं आह्मांसि गे ॥ धाउन आलों आह्मि फार त्वरें॥भेटावया त्या ॥ ४ ॥ पाहतां हरिमुख झालें अतिशय सुख ॥ विसरलों सर्व दुःख आह्मि सारे ॥ असें हरिमोहकरूप हें ॥ दृष्ट होइल कीं त्या ॥ ५ ॥ एक्या दृष्टीकरून पाहील्यानें तृप्ती न ॥ वेधीलें हरीनें मन अतिशय रे ॥ वाटे तुच्छ याविण जग सारे ॥ ओवाळूं हीं काया ॥ ६ ॥ हरिसंगतीचा लाभ ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ झाला आह्मां सूलभ जगदीश रे ॥ जप तप करिती त्रिभुवनिं रे॥प्राप्त न होय त्यां ॥ ७ ॥ येथें आला प्रेमपाड अमृतापरीस गोड ॥ घोटीती सुरवर लाळ सारे ॥ उच्छिष्ट आमुचें तो खातरे ॥ प्रेमपाशीं बद्ध ॥ ८ ॥ क्षणांत निर्मि जो ब्रह्मांडें अगणित ॥ तो हरि खेळत आह्मांशिं रे॥घालुनि डाव गोप छळिती रे॥मारही देत त्या॥९॥ हा हरि पहा गे किति वेश धरी गे ॥ अघटित कांति याची कोण वर्णि गे ॥ किति पाहिल्यानें तृप्ती न होत गे॥वैरीणी ह्या पापण्या ॥ १० ॥ खेळतांनां श्रमले असतिल थकले ॥ अति मृदु हरिपद सखयांनो गे ॥ स्थीर रहा थोडा वेळ चुरूं तरि गे ॥ किती निर्दय तुह्मी ॥११॥ हरिपदिं पैंजण वाजत रुणझुण ॥ शब्द तो मंजुळ अतिशय गे ॥ ओंवाळूं काया तरि हरिवरुनी गे॥सर्व व्रजस्त्रीया ॥ १२ ॥ आह्मी भाग्यवान पोरी खेळतों परोपरी ॥ श्रीहरिबरोबरि वनांतरीं ॥ स्वर्गसुखा याची नाहीं सरी॥सत्यसत्य गडे गे ॥ १३ ॥ योगयागसाधनें करिति प्राप्तिकारणें ॥ मौनध्यान धरुनी गुहांतरीं ॥ परी त्या सत्य प्राप्त नोहे हरी॥ [illegible] यापक हा ॥ १४ ॥ जेणें चित्त आर्पिलें हरीपायीं आपुलें ॥ [illegible] हरिलें कसें जारे ॥ न्यून त्या न कांहीं पडे सत्य सुंदरी॥

अंतीं स्वर्गसुख त्यां ॥ १५ ॥ लाभ अलभ्य झाला हरीचा हा आ-ह्मांला ॥ प्रेमें सर्व आलिंगा गे त्याला ॥ मिठी घालूं आह्मी त्याचे पा-यांला॥करूं लिंबलोण ॥ १६ ॥ आनंदीं सर्व दंग होउनि निसंगः ॥ फेकीत गुलालबुक्का हरीवरी ॥ विष्णुदास ह्मणे क्रीडा परोपरी॥कामीनी करिति त्या ॥ १७ ॥

## टिपरी २ पद राग बिभास ताल त्रिवट.

व्रजयुवती टिपऱ्या खेळती ॥ हरि पाहुनि आनंदें नाचताती ॥ आनंदीत हरिगुण गाती ॥ धन्य जयांतें हरिसंगती ॥ वामांगि जाती बळें रागें अती ॥ हरि हसती मग राग सोडिती ॥ त्या सुमती गोविंदीं प्रीती ॥ नाचति कामिनि गजगतीं॥बहु विनोद हरिशीं करिताती ॥१॥ हरिपायीं मन केलें आर्पण ॥ नको आह्मां साधन यावीण ॥ न आवडे आह्मां अन्य ॥ ह्मणती निश्चय हा पूर्ण॥इंद्रादिका न तें आह्मां साधन॥ कृपाघन बहुपरि करून ॥ शांतवीत मन आनंदघन ॥ रमणीय अतीं हें कुंजवन ॥ नंदन वन या पुढें न्यून ॥ २ ॥ बहु रूपें हा एक क्ष-णांत ॥ घेउन आह्मांशीं खेळत ॥ लहान होत जारि मनांत ॥ वेष धरितही अगणीत ॥ प्रतापवंत आह्मांशिं खेळत ॥ वधिले जेणें बहु दैत्य ॥ कालिया जिंकिला क्षणार्धांत॥वेदा न अंत पुराणें थक्कित॥ वर्णितां शेषही शिणत ॥ ३ ॥ काय घन रमणीय पहा गे कुंजवन ॥ वृक्ष लागले गगन चुंबीत ॥ सुगंधि आमोदयुक्त ॥ स्थीरगतीं वायू व-हात ॥ कमलें विकासित ॥ सरोवरीं बहुत ॥ पक्षि उडत मंजुळ स्वन करित ॥ मयूर नाचति आनंदांत ॥ वैर विसर्जित प्रेमें खेळत ॥ व्याघ्र मृगांदी या स्थळांत ॥ ४ ॥ चंद्र स्थीर गति वेणुरव ऐकत ॥ कालिंदि शांत गतिरहित ॥ देवास्त्रियांसह विमानांत ॥ पाहुनि हें मोहित होत ॥ पतिसि आलिंगित कामें पीडित ॥ विलासयुक्त चुंबन देत ॥ तल्लिन होती पतिशिं रत॥ते त्या वारित परि न ऐकत ॥ मदनें विव्हळ त्या हो मत्त ॥ ५ ॥ वैरिणि रात्री जाईल झडकरि ॥ करा त्वरागे प्रार्था हरी ॥ रात्रीकालगति स्थीर करी ॥ इच्छा आमुची तृप्त करी ॥ खेळाति टिपऱ्या पुन्हां मग लवकरी ॥ दुर्बल धन परि क्षण पल सुं-दरी ॥ मानित जात त्याहो चतुरी ॥ जारि दमल्या परि न दाविती हरी ॥ म्हणाति घडि न ये ही वारिवरी ॥ ६ ॥ खेळावारि न चित्त टि-

ऱ्या चुकत ॥ हातावरि परस्पर मारीत ॥ खेळ न त्यांते अवड
हरिपायीं लागलें चित्त ॥ निमित्तासि खेळत कामें सर्व व्याप्त ॥ ३
पुलकित उच्छास टाकित ॥ हरिसी मोहें विसरत ॥ गुलाल फे
गेला नेत्रांत ॥ क्षणभरि शांत रहा म्हणत ॥ ७ ॥ या मनमे
मुरलीवादन ॥ सुस्वर स्वरें मन मोहून ॥ होउनिया आम्हि तल्ली
आर्पीलें तन मन धन ॥ लाज विवर्जुन गृहपति सोडुन ॥ आलों
मची निंदा जन ॥ करून करून गेले थकुन ॥ विष्णुदास चरणीं ल
निंदोत वंदोत नास्तीक जन ॥ ८ ॥

## गोफ आणि टिपरी ३ पद राग कालंगडा ताल त्रिवट.

गोपी ताल टिपरी चुकाशिल पाउलांला ॥ तूंच संभाळ नको
आतां गड्या मजला ॥ १ ॥ दिमाखानें नका बोलूं चुकाल सुंदर
चुकायासि नव्हे आम्ही गुराखी पोरी ॥ २ ॥ बलहिन तुम्हि बाय
आतां दमाल ॥ कोण दमतें समजलें आम्हां रे काल ॥ ३ ॥ व
अंग सणसर झाला तुम्हि पोरी ॥ लगबग तुमची दावा गोपांनो
तरी ॥ ४ ॥ सोडुनि आला नवऱ्यांस तुम्हि दांड पोरी ॥ काय तु
पंचाइत रे ही सांगा तरी ॥ ५ ॥ कृष्णासवें खेळतां किती गमतीनें
घेउ नका अशि भलतीं हीं तुफानें ॥ ६ ॥ नकळे पोरें हीं कैशीं
वडलीं हरिला॥सुंदरि जरि तरि कां गे आला झक मारायाला ॥ ७
बोलुं नका काय कळतें तुम्हां पोरांला हुडका जा तरि एखाद्या दां
ग्याला ॥ ८ ॥ पहा कृष्णाकडे बोलूं नका जा आम्हांशीं ॥ चुक
आम्हीच कां खेळावें पोरांशीं ॥ ९ ॥ रागें भान न राहुन त्या टिप
चुकती ॥ ऐकानि गोपवच खेळ रागें त्या सोडीती ॥ १० ॥ विष्णुद
म्हणे विनउन त्यां परोपरी ॥ समजि करुनि पुन्हां आणित खेळ
हरी ॥ ११ ॥

## टिपरी ४ पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

नमुनी हरी वदती कुमारी लाज भारी॥वाटे, खेळुं पोरी पोरी ॥ ध्रु
सोडुनि लाजेला कशा दंग झाला हरीला ॥ भुलला सोडुनि पतिला
गावि पोरें मोठि चटोर धीट फार ॥ देउं मार चोर जार ॥ १
म्हि खेळतां तो गुरें राखित सदा चोरीत॥अशावरि कां
घाणेरीं हीं हो पोरें उचमळतें ॥ दूर तरि जारे सारे॥

तुमचा अमोद येत मिलिंद सरेल गंध ॥ जपुन ठेवा दुर्गंध ॥ हात पाय वाकडे शेंबडे चिपडे घाणेरडे ॥ अभद्र बोलत वेडे ॥ ३ ॥ असो आम्हां आमुचें काय तुम्हां त्याचें ॥ गळिं पडतां अर्जवें ज्याचें त्याचें ॥ हरिविण कोणाशीं खेळुंन पराशीं भलत्याशीं ॥ जाउ न आशीपाशीं॥ ४॥ यासि देह अर्पीले मनापरि जाहलें त्यानें वरिलें ॥ आवडे न गृह दादले ॥ आतां सोडा मत्सर गोपांनो यावर शपथेवर ॥ खेळुं मोदें हरि बरोबर ॥ ५ ॥ कोणि भांडण काढीलें तुह्मि आह्मां निंदिलें कां पहिलें ॥ राहूं दे तें मागलें ॥ कोण तुह्मां आह्मांपरी धन्य क्षितीवरि प्राणि तरी ॥ खेळत हरिबरोबरी ॥ ६ ॥ तुम्हि आम्हि गातां भक्तिनें अनंता वश्य करिते ॥ झालों पहातां पहातां ॥ यापुढें हीन दुजा अनंद मूकुंद ॥ नाचे छंदें नदानंद ॥ ७ ॥ न सौख्य सुरांगनां रंभादि देवांगनां मनमोहना ॥ जिणें व्यर्थ वाटे त्यांनां ॥ या गीतास गाउनि विष्णुदास दीन पदास ॥ हरिच्या लागति दास ॥ ८ ॥

## टिपरी ९ पद राग पिलु ताल धुमाळी.

बहु आनंदें वदती गोपि गोप एकमेकांसी ॥ काय खेळ परोपरि हरी खेळे आह्मांशीं ॥ ध्रु० ॥ ह्मणती गोपि ठावें आह्मांसि नव्हतें कांहीं॥आतां गोडि लागली आह्मां सोडवत नाहीं ॥ गोपाळ ह्मणत न आठवत बाप आई॥काय चट लागली गुंतलों आह्मि या पायीं ॥ गोपी वदत आम्हां स्मरे न घर बाई॥काय भूल घातली करावें याला कायी ॥ चा० ॥ कसे गुंतुनि पडलों गुंग दास दासी ॥ १ ॥

## २ गोफ साधा पद राग यमन ताल धुमाळी.

लाल पदर आह्मि हातिं धरितों ॥ गड्यांनो पहा आंतून जातों ॥ गंडेरि गोफातें करितों ॥ तुह्मि अपसव्यकडुन चला ॥ १ ॥ सफेत आमच्या करीं पदर ॥ जातों आंतून पहा कसे झर झर ॥ बघा पदर तुमचि लागेल नजर ॥ चुकूं नका आतां खेळायाला ॥ २ ॥ दिमाक उगा या पोरांस ॥ कोण घेत होतें खेळायास ॥ हरिनें विनविलें आह्मांस ॥ ह्मणुन सोसणें हें आह्मांला ॥ ३ ॥ काय खेळुं आह्मां गडि नसती ॥ केले हरिनें अर्जव किती ॥ ह्मणुन घडली ही तुह्मां संगती ॥ त्याकडे पहाणें आह्मांला ॥ ४ ॥ कसे अवडती हे न कळे हरी ॥ का-

रटीं शेंबाडें वोडें विद्रि तरी ॥ समजुत पहा ही काय सुंदरी ॥ सदा वाटाति हे प्रिय याला ॥ ५ ॥ न प्रीय दुजे तो भक्ताधीन ॥ व्यर्थ थाटमाट चांगुलपण ॥ न वश हा कपटेंकरून ॥ आहे भावाचा भुकेला ॥ ६ ॥ तुह्मिच श्रेष्ट काय भक्तांत ॥ तुमच्या हरी काय हातांत ॥ धरितां गर्व फुका मनांत ॥ हिणऊं नका व्यर्थ आह्मांला ॥ ७ ॥ हा मोहित मन सर्वांचें ॥ अंतर तुह्मां न कळे याचें ॥ मन रिझवी जरि सर्वांचें ॥ वेड्या मानू नका या आपुला ॥ ८ ॥ समजपणाचा गर्व किती ॥ फुका पोरांनो तुह्मांप्रती ॥ काय आह्मि अगदीं मंदमती॥न कळे हरीचित्त काय आम्हांला ॥ ९ ॥ याची माया हो दुर्धर ॥ थोरथोरां पाडी विसर ॥ अबला तुह्मि काय पामर ॥ तुह्मा भुलविणें सहजीं त्याला ॥ १० ॥ गड्यांनो तुमचा बोध ठसला ॥ शरण आह्मि तुह्मां सर्वांला ॥ मायें आम्हां हो भ्रम पडला ॥ अगम्य याची खरी लीला ॥११॥ गोपींनो न धरा मनिं मत्सर ॥ मूर्ति सर्व तो एक घडविणार ॥ कोण वाइट चांगलें त्या म्हणणार॥हाच माया भ्रम तुह्मां पडला ॥१२॥ गोपांनो तुमचें सत्य वचन ॥ एक सर्वांकारिता निर्माण ॥ आहे व्यर्थ आह्मां हें मीपण॥त्यागीलें त्यागीलें अभिमानाला ॥१३॥ असति मृत्तिकाघट अनंत ॥ घडवित एक त्यां भगवंत ॥ राहे प्रत्येकीं अंशभूत ॥ व्यर्थ खेद मोह देहाला ॥ १४ ॥ हर हर गड्यांनो सर्व आह्मी कोण ॥ एक रूपि व्यक्ति मात्र भिन्न भिन्न ॥ गर्वरहित झालों करा कथन ॥ कांहीं तरणोपाय आम्हांला ॥ १५ ॥ नाम स्मरा नको मग कांहीं अन्य ॥ करूनि षाड्रिपुचें आकलन ॥ होइल प्राप्त हरि तुह्मांलागून ॥ कथित विष्णुदास युवतींला ॥ १६ ॥

### ३ गोफ दुरंगी कटारी पद राग कालंगडा ताल धुमाळी.

दूरंगि कटारी गोफ कराया शिकलों आह्मी नारी ॥ तुम्हि किती हि चुकवा परी न चुकुं सुंदरी॥१॥कृष्णाकडे पाहुन भुललां चित्त नाहीं खेळावरी ॥ टिपऱ्या मारीता आमुच्या हातांवरी ॥ २ ॥ लटकेच आळ घालिता तह्मी गोपांनो आम्हांवरी ॥ दांडगाइ धक्के काय मारितां तरी आह्मांसि दाविता चित्त दांडग्यांवरी ॥ लौकिकांत गरी ॥ ४ ॥ शेंबडे घाणेरडे गोप तुह्मां पाहूनि ारि येत शीसारी ॥ ५ ॥ अर्गजा

अत्तरें तुह्मांपासुन होत काय मृगच तुह्मी कस्तूरी ॥ ठावक्या आह्मां अहां किति निर्मळ सुंदरी ॥ ६ ॥ बोलून चटोरांशीं ऐकावीं उणीं उत्तरें सारीं ॥ उग्या रहा खेळा गे आनंदें क्षणभरी ॥ ७ ॥ सोडूनि गृह वर किति गे झाला चावट तुह्मी पोरी ॥ मुळ कथा तुमची ठावि असे आह्मां सारी ॥ ८ ॥ विष्णुदास ह्मणे ऐकुन हें गोपी रागावल्या भारी ॥ घेऊन निघाल्या कृष्णातें झडकरी ॥ ९ ॥

---

## कंसवध.

### पद राग काफी ताल दीपचंदी.

कंसा मृत्यूभय फारची वाटूनी ॥ करमे न कोठें दुःखी निशीं दिनीं ॥ १ ॥ हरी माराया यत्न बहू करी ॥ फसुनी सर्व वैरी वाढे व्रजांतरीं ॥ २ ॥ बहु कपटें योजी धाडी आक्रूरासी ॥ गोकूळीं राम हरी आणायासी ॥ ३ ॥

### पद राग तोडी ताल दीपचंदी.

अक्रुर राम हरी न्यावया आला ॥ नंदगृहिं हें कळलें गोपींला ॥ध्रु०॥ बोले नंदा धनुर्याग पाहू कंसें ॥ व्रजवासीसह बाहीलें हरीला ॥ १ ॥ नंद म्हणे कंस नाना यत्न हरी ॥ वधा करीत कैसें धाडूं त्याला ॥ २ ॥ शोक यशोदा करी अक्रूर निवारीं ॥ घेऊनी उभयांतें चालला ॥ ३ ॥ गोपी धाउनि येत अक्रुरा निंदीत ॥ शोक करित अडविती रथाला ॥ ४ ॥ निवारूनी त्यासी आले मथुरेपाशीं ॥ भयें करित कंस बहु चिंतेला ॥ ५ ॥ हरीमय कंसा ब्रम्हांड भासत ॥ दचकूनी देत आरोळीला ॥ ६ ॥ कृष्णबलीभद्रसंगें गोवळेभार ॥ पुष्पवर्षाव नगरिं जनिं केला ॥ ७ ॥ कंसगृहीं येत चाप तें भंगीत ॥ क्रोधें वधुन टाकीती दैत्यांला ॥ ८ ॥ ताडूनी रजकासी घेती ते वस्त्रांसी ॥ पुष्पकें हरिलागी पूजीयेला ॥ ९ ॥ करी रूपवती कुरूप कुब्जेप्रती ॥ पाहूनी गोपी मत्सर मनाला ॥ १० ॥ पुन्हां परत येत उपवनीं राहत ॥ कंस युद्धा मिळवीत दैत्यांला ॥ ११ ॥

### पद राग कानडा ताल धमार.

बोळउनि नारदमुनी सुधर्मसभेंतुनि ये ॥ हरी पुष्प घेऊनी रुक्मीणी-सदनां ॥ध्रु०॥ सुवासें गगन भरी दिधलें रुक्मिणिकरीं ॥ आनंदली सुंदरी पाहूनी मनीं ॥ १ ॥

### पद राग पिलुजिल्हा ताल धुमाळी.

नारायण नामाच्या छंदें नाचत नारदमुनी ॥ फिरे मग भामासदना जवळुनी ॥ १ ॥ लगबग सेवका ह्मणे बहात पहा भामा मजलागुनी॥ सेवक न सोडुं वदे येक्षणीं ॥ २ ॥ बहु गडबडिचें काम निकडिचें भामे कथा ना तरी ॥ तिजला कळल्या विपारितपरी ॥ ३ ॥ विणा पुढें मग करुनि लवकरी जाउं पाहे अंतरीं ॥ सेवक ढकलितात बाहेरी ॥ ४ ॥

### ॥ आर्या ॥

रुक्मिणिला फुल दिधलें नारद भामेस वृत्त हें कळवी ॥ कलहप्रिय धातासुत मन तीचें सवतिमत्सरीं वळवी ॥ १ ॥

### मा० प० नारायण:—

तुजसम आजवरी अभागि दुसरी नसेच गे क्षितिवरी ॥ हरि रुक्मिणिचे आर्जव करी ॥ ५ ॥ स्वर्गीं अमोलिक पारिजातकफुल दिधलें मीं हरिकरीं ॥ घेउनि तो दे रुक्मिणीमंदिरीं ॥ ६ ॥ हें मज कळुनी हळहळलों मानीं चैन न पडे अंतरीं ॥ कां तर योग्य तुझ्या तें मंदिरीं ॥ ७ ॥ सत्यभामेप्रति क्रोध अमीत आणुनि नारदमुनी ॥ जाई लगबगिनें तेथुनी ॥ ८ ॥

### पद राग परज ताल त्रिवट.

मग परीसुनि नारदवचनासी ॥ सत्यभामा वदे काय दासीसी॥ध्रु०॥ कपटी हरि खोटा बहु कठोर ॥ बहू हत्या केल्या आजवर ॥ अग्नीविष भक्षी अनिवार ॥ बहू जार पती प्रतिमारासी ॥ १ ॥ बहु ठक नाटकि चेटकी हरी ॥ प्रीति वरवर दावी मजवरी ॥ कोठें सांग प्राण मी ठेउं तरी ॥ त्यागीत आभरणें धरणीसी ॥ २ ॥ स्फुंदत स्फुंदें नयनीं निर वहात ॥ अहा ! मरण त्वरें येवो म्हणत ॥ झाली विव्हळ अलक चिर-

### पद राग पिलु ताळ धुमाळी.

पुन्हां मथुरा नगरीं ।। यावया नीघती हरी ।। १ ।। कुवलया मार्गीं तांडुनी ।। जाती वेशी उघडुनी ।। २ ।। वहू दैत्य मारीत ।। जातां पाहे नग मस्त ।। ३ ।। उपडुनि दंत मारीत ।। दुष्ट माहुतासहीत ।। ४ ।। येतां ते सभेमाझारी ।। कंस भयें चिंताकरी ।। ५ ।। मुष्टिक चाणुर क्रोधाऊनी ।। येती युद्धालागुनी ।। ६ ।।

### पद राग यमन ताल त्रिवट.

चाणुर मुष्टिक ते अनेक रितीं ।। मल्लयुद्धीं राम हरिशीं झुंजती ।।१।। युद्धामाजी चाणुरा हरी वधीत ।। अपटुनि मुष्टीका राम मारीत ।। २ ।। ऐसे दैत्य अगणित मारीत ।। कंसा असनावरूनि ओढीत ।। ३ ।। हरी देत सबळ त्या मुष्टिघात ।। होई तेणें कंसप्राणअंत ।। ४ ।। निर्जर बहुत आनंदूनी ।। करिती पुष्पवृष्टीलागूनी ।। ५ ।। करूनिया बंदीवान मुक्त ।। कंसकलेवर दहन करीत ।। ६ ।।

### ।। गीत ।।

उग्रसेन पितृव्यें तेक्षणीं ।। मथुराराज्यीं हरिस स्थापुनी ।। येति सर्व भेटाया जननी ।। वसूदेवासी ।। १ ।। देउनि वस्त्रें अलंकार ।। लागति चरणीं राम श्रीधर ।। माता आनंदूनी फार ।। गहिवरें दाटे ।।२।।

---

## पारिजातकाऽऽख्यान.

---

### पद राग कालंगडा ताल धुमाळी.

वद वद वाचें जीवाचें सार्थक साचें ।। गुरु नारायण जय हरि नारायण ।। ध्रु० ।। एके दिनीं नारदमुनी स्वर्गिंहुनि हातिं पारिजातफूल आले हरिसभेस घेऊनी ।। १ ।।

### ।। आर्या ।।

…पानि पूजि तो हरी स्वकरीं ।। मुनि आर्पित …त परीं ।। १ ।।

विगलीत ॥ सहावेना लोळे धरणीसी ॥ ३ ॥ मज दर्शन त्याचा स्पर्श नको ॥ मी मेल्यावर त्या शिवडं नको ॥ मम प्रेतहि सवतिस दाऊं नको ॥ विष्णुदास म्हणे हें कळे रुक्मिणिसी ॥ ४ ॥

### पद राग झिंजोटी ताल धुमाळी.

श्रीहरी निजल्यावरि शय्येंत रुक्मीण ॥ येऊन वदे सत्यभामे काय हिणऊन ॥ ध्रु० ॥ दासीप्रति पूसे कोण घरीं हें झोटिंग ॥ विपरित भ्यासुर गे लोळत मजला सांग ॥ त्रिदिलागि ओढुनी तुह्मि टाकाना कांग॥ खरडुन जाऊं दे या भूताचें अंग ॥चाल॥ सत्यभामा उठुनी वदत क्रोध येऊन ॥ १ ॥

### श्लोक वसंततिलका.

लेशांश सत्य नसतां कशि सत्यभामा ॥ पामेपरी हरिस तूं जडलीस रामा ॥ त्यासी अगत्य नसतां खरि तूं सकामी ॥ पट्टाभिषिक्त ह्मणसी स्वाहितार्थ कामीं ॥ १ ॥

### पद राग भूपकल्याण ताल त्रिवट.

परिसुनि रुक्मिणि दुरुक्ति सत्यभामा वदे काय तिला ॥ ध्रु० ॥ चढ तुज बसला ॥ हरि हातीं आला ॥ हाड न मुखाला ॥ हवें तसें भलतें बोलाया लाज न तुला ॥ १ ॥

### मा० प० श्रीहरिः—

तव पिता स्यमंतकचोरी हरिवर घाली ॥ हें असत्य मग तुज देऊनि समजी केली ॥ अशा पूर्वपार तुझ्या कुळांत हलक्या चाली ॥ अवचित दैवें तुज हरिनें स्वकरीं धरिली ॥ चा०॥ कां रुसासि कुलास्तव पुसतें तुजला कोण ॥ २ ॥

### मा० प० परिसुनिः—

तूं अवडीची ॥ जरि कृष्णाची ॥ निंदा आमुची ॥ कां गे करिशी अव गे गे निडेला ॥२॥ वाडिला विरुद्ध तें ॥ त्वां स्वमतें ॥ कामशांतितें॥ ॥ ३ ॥ प्रीती तुजवरी ॥ बस हरिचे

शिरीं ॥ मिरव क्षितीवरी ॥ सवती किति तरि ॥ माज आला आज तुला ॥ ४ ॥

### मा० प० श्रीहरी:—

उगी पाठिं लागसी हरि तुज खल्लड म्हणत ॥ न धरी मनिं मत्सर बैस आतां वृद्धांत ॥ एकादे दिवशिं हरि दैवें तुजकडे येत ॥ दूरुनि बोलत जा घाणीनें त्रासत॥चा०॥स्पर्शिशि तरि तुजला न दुसरें दर्शन॥३॥

### मा० प० परिसुनि:—

जा जा येथून ॥ न करी भाषण ॥ देइन प्राण ॥ ऐसें वदुनी धरणीला देह त्यजिला ॥ ५ ॥

### मा० प० श्रीहरी:—

पुढें वदतां अकांत जाणुनि रुक्मिणि आली ॥ न कळत हरिसन्निध येऊनिया मग निजली ॥ अंतरजाणक हरिमूर्ती जागी झाली ॥ तिस पुसतां तीनें दुजी बतावणि केली ॥ चाल ॥ विष्णुदास म्हणे हरि उठले शेजेवरुन ॥ ४ ॥

### मा० प० परिसुनि:—

घाबरे दासी ॥ दु:खित मानसीं ॥ कळवि वृत्तासी ॥ भामामंदिरिं येतांची श्रीहरिला ॥ ६ ॥

### पद राग बिहाग ताल त्रिवट.

कळुनि दासिमुखें वार्तेला ॥ मनिं श्रीपति घाबरला ॥ घेउन अंकिं समजावि तिला ॥ ध्रु० ॥ काय म्हणे कारण गे रुसण्याला ॥ पडसि कां ऐशी तूं धरणीला॥सांवरुनि वसनभूषणें अलकांला॥चा०॥ कुर्वाळुनि पुसे कारण तिला ॥ १ ॥

### पद राग पिलु ताल त्रिवट.

हरी ही कशास तरि दाविता ॥ वर वर माया प्राण हराया ॥ध्रु०॥ कपट पूर्णपणें समजलें तुमच्या मनींचें ॥ उघड कृतीचें ॥ रात्रंदिस अर्जवांत सादर तुम्हि रुक्मिणिचे ॥ सेवेकरि तिचे ॥ वदूं मी काय

प्राणांतकारि भाषण त्या सवतीचें ॥ मस्तकिं नाचे ॥ चा० ॥ भामा बहुक्रोधें झिडकारित मग प्रभुराया ॥ १ ॥ फार जरी आवड तुह्मास तिची तरि तिजचि वरावी ॥ मज कां करावी ॥ आतां तिजकडुनि विटंबना ऐशी न करवावी ॥ मज मारावी ॥ मम प्राणांतावरि पट्टराणी हवि ती करावी ॥ उशिर न लावी ॥ चा० ॥ मी मृत झाल्यावरि सवतीसी पाहुन घेईन या ॥ २ ॥

**मा० प० कळुनि दासि:—**

नारदें दिलें फुल हातिं अवचीत ॥ भामे तुज द्यावें हें मनांत ॥ दिधलें विसरुनि रुक्मिणिहातांत ॥चा०॥ नव्हे हें खोटें तुज रुसण्याला ॥२॥ हरी नाटकि भाषणें करून ॥ प्रीत तुजवरि ह्मणे आण वाहून ॥ रुदन करी कळवळे भामामन ॥चा०॥ उठुनि समजावी ती हरिला ॥३॥ फुल तिज दिलें परी तव घरीं ॥ लाविन वृक्ष वदे तिज हरी ॥ शांतवि भामेला यापरीं ॥चा०॥ आनंदें करित विलासाला ॥४॥

**मा० प० हरीहीः—**

शांत झाली सत्यभामा हरि श्रृंगारी ॥ तिजसी स्वकरीं ॥ गौरवें हरिच्या तिस क्रोधाची पडुनी विसरी ॥ आलिंगित हरी ॥ विलासिक सुगंधि द्रव्येंकरुनी त्या उपचारीं ॥ पूजित सुंदरी ॥चा०॥ विष्णूदासा आवडे हरिलीला वर्णन कराया ॥ ३ ॥

---

# कचदेवयानीआख्यान.

---

### पद राग धनासरी ताल एका.

ऐका श्रोते सावधानें करून ॥ रसिक आख्यान कचदेवयानि यांचें पावन ॥ १ ॥ देवदैत्यांमाजिं पूर्वींपासुन ॥ असे भांडण पीडीती ते बहू सुरांलागुन ॥ २ ॥ मृत दैत्यां करी शुक्र संजिवन ॥ तयांलागुन सदा येत असे जय म्हणून ॥ ३ ॥ देव इंद्रासहित विचार करून ॥ म्हणति धाडुन कचा प्राप्त करूं मंत्र संजीवन ॥ ४ ॥ बृहस्पतिलागी इंद्रें विनऊन ॥ कचा आणुन धाडीती ते सर्व कपट सांगुन ॥ ५ ॥

॥ अभंग ॥

पितृआज्ञा मग घेऊनी ॥ कवी अश्रमा येऊनी ॥ म्हणे त्यातें विनयें नमुन ॥ आलों करूं अध्यायन ॥ बृहस्पतीचा मी सूत॥द्यावें विद्यादान ह्मणत ॥ १ ॥

सारिकाछंद ताल धुमाळी.

देवगुरूचा रे तूं सूत ॥ अवघड सेवा करणें येथ ॥ होंहि असो परि कळल्या दैत्य ॥ वैर साधतिल आपुलें ॥ १ ॥ गुरुसेवेविण कदा न प्राप्ती ॥ कोणासहि हो सुविद्या ती ॥ तो ह्मणे होवो कैशीहि गती ॥ विनंती ही मान्य करा ॥ २ ॥

पद राग भूप ताल त्रिवट.

रूपयौवनगुणसंपन्न पाहुनीया कचातें ॥ मन वेधूनी देवयानीचें विनवित ती तातातें ॥ ध्रु० ॥ पित्या असो हा कोणाचा सुत द्यावें विद्यादान हें उचित ॥ अहा ! किति पहा तरी विनययुक्त ॥ सुरूप गुणी तरि यातें ॥ १ ॥ विद्या शिकूं शिष्य आला शिकवीणें अवश्य गुरुला॥ विन्मुख धाडणें योग्य न तुजला ॥ तरी ठेउन घ्या त्यातें ॥ २ ॥ शरणांगत हा तुजला आला करिं धरूनी द्या आश्रय त्याला ॥ पाहिजे एवढा हट्ट पुरविला ॥ विष्णुदास ह्मणे कवितें ॥ ३ ॥

पद राग सोरट ताल त्रिवट.

ऐके देवयानी ॥ध्रु०॥ कच, कन्यावच परिसुनि शुक्राचार्य वदे प्रिय वाणी ॥ १ ॥ तूं गे मज प्रिय प्राणाहूनी तुझें वचन मी मानी ॥ २ ॥ तुजसम यालागूनी मानिन न करिन कृत्रिम करणीं ॥ ३ जरि हा देवांकडुनी आला कांहीं मीसें करूनी ॥ ४ ॥ अभय आहे यालागुन शिकविन विद्या मी या सुगुणी ॥ ५ ॥

पद राग बिभास ताल झंपा.

हे गीष्पतीसूत होतील मनोरथ पूर्ण तव हें सत्य स्वस्थ राहे ॥१॥
आहांत आपण षडशास्त्रि नीपूण चौसष्टकलिं पूर्ण काय थोरी ॥ २ ॥
आपुल्या कृपेंकरून साधीन बहु गूण केला हा आर्पण देह चरणीं॥३॥
बोलत सुरयानी सौंदर्य गे खाणी दयाळु तूं मनिं तरुणि भारी ॥ ४ ॥

कर्ड मनधरणी प्रेमें सुरयानि विद्याकला गूणि कच शिकवी ॥ ५ ॥
कचरूप आणि गूण पाहूनि करि प्रेम न गमे तयावीण क्षणभरी ॥६॥

**पद राग असावरी ताल धुमाळी.**

कच विद्याप्राप्ती हा अर्थ ॥ धरूनि देवयानिस तोषवित ॥ तों ती धरित विपरित हेत ॥ मनिं त्या वरण्याचा ॥ १ ॥ जेव्हां जेव्हां ते द्वय घरीं असत ॥ तेव्हां तेव्हां ती कामचेष्टित ॥ भावें त्याच्याशीं वागत ॥ समजुनि तो चाले ॥ २ ॥ अन्य शिष्य करती कुरकूर ॥ झाला हा कच प्रीय फार ॥ गोरक्षणपाळी आज त्यावर॥ह्मणति गुरू धाड ॥३॥ शिष्यांचा आग्रह पाहून ॥ ह्मणत वनीं जा गो घेऊन ॥ ऐकुन हें सुरयानी खिन्न ॥ फार मनीं झाली ॥ ४ ॥ मग बांधुनि उत्तम शीदोरी ॥ देउनि त्यातें ह्मणे झडकरी ॥ सूर्यास्ताआदीं माघारी ॥ या हो जपुन चला ॥ ५ ॥

**पद राग काफीजिल्हा ताल धुमाळी.**

बहु देवयानीचें मन दुःखित झालें ॥ विरहेंकरुनी कचाचे ॥ध्रु०॥
आशानें शयनीं क्षण न गमे सदां ॥ ध्यान तिज तयाचें ॥ १ ॥

**पद राग पिलु ताल धुमाळी.**

धाडीलें संजीवनी मंत्र शिकवायासी ॥ गुरूसुत कचासी ॥ १ ॥
कपटें देवेंद्रानें दैत्यगुरू कवीपाशीं ॥ कळलें हें दैत्यांसी ॥ २ ॥

**पद राग आनंदभैरवी ताल धुमाळी.**

वृषपर्वा बहु क्रोधाऊन ॥ सांगे असुरांतें जाऊन ॥ टाका कचातें मारून ॥ गुप्त वनामाजीं ॥ १ ॥ जाउनिया त्वरें ते वनीं ॥ वधिती कचातें गाठूनी ॥ मांस तयाचें तुकडे करुनी ॥ देती पशूंतें ॥ २ ॥ वृषपर्वा संतोषे ऐकुन ॥ इकडे तों गो आपल्या आपण ॥ सूर्यास्ताआदिं वनांतून ॥ कचविरहित आल्या ॥ ३ ॥ दुःखित कविकन्या हें पाहुन ॥ बहुतची मनिं घाबरून ॥ पित्याकडे त्वरीत जाऊन ॥ काय तया वदत ॥ ४ ॥

**मा० प० बहु देवयानीचें:--**

पित्यास ह्मणे ती धेनुसंगातीं ॥ कच न आले कां भय तत्प्राणाचें ॥२॥
त्वरें शोध करि चैन न अंतरिं ॥ दैत्यघातक भारी विष्णुदासांचे ॥३॥

## पद राग मुलतानीधनासरी ताल धुमाळी.

त्वरीत कच जर दृष्टि न पडला ॥ जाइल प्राण माझा ताता॥ध्रु०॥ अरी मारीला असला संजीवन करा त्याला ॥ हाहादेवा ! घात झाला माझा आतां ॥ १ ॥

### मा० प० ऐके देवयानी:--

गुरुनी त्वरेंकरुनी ॥ जपुनी मंत्र मग संजिवनी ॥ ६ ॥ आणिला कच उठऊनी ॥ कथि तो वृत्त गुरु नमूनी ॥ ७ ॥

### मा० प० कच विद्याप्राप्ती हा:—

एके समयीं कचास वनीं ॥ आणूं धाडिलें पुष्पें गुरुनीं ॥ वृषपर्व्यालागी हें कळुनी ॥ मारविला त्यातें ॥ ६ ॥ जिवंत केला पुन्हां गुरुनीं ॥ एके वेळीं पुन्हां धाडुनी ॥ देतां दैत्यराया कळुनी ॥ काय करीत ॥७॥ धाडूनी वनांत दैत्य ॥ गाठूनी त्यातें मारवीत ॥ जाळुनि त्याची राख सुरेंत कवि मिसळुनि देती ॥ ८ ॥ ह्मणती झाली आतां निश्चिती ॥ आतां गुरु त्या काय उठविती ॥ होती आनंदीत बहु चित्तीं ॥ ते सर्व असुर ॥ ९ ॥ इकडे गेला सूर्य अस्ता॥परि न ये कच परत पहतां ॥ दुःखित होउनि भार्गवदुहिता ॥ पित्याप्रती पुसत ॥ १० ॥ गुरुनी जों ध्यानें पाहीलें ॥ तों असुरांनीं तयांस वधिलें ॥ भस्म तयाचें करुनि पाजिलें ॥ सुरेंतुनी आपणा ॥ ११ ॥

### मा० प० ऐके देवयानी:—

वधुनी कच दैत्यांनीं ॥ कपटें केली अघटित करणी ॥ ८ ॥ त्याचें चूर्ण करुनी॥दिधलें मजला सुरेंतूनी ॥ ९ ॥ मी मेल्यावांचूनी॥जिवंत न निघे उदरांतूनी ॥ १० ॥ कोण हवें यांतूनी ॥ मी कीं तो तुज सांगे रमणी ॥ ११ ॥

### मा० प० त्वरीत कच न:—

दोघे मज प्रिय प्राणाहूनी ॥ न मरावे यांतुन हो कोणी ॥ योजूनीया यूक्ती त्या उठवा आतां ॥ २ ॥ शुक्र कन्याप्रेमेंकरुनी ॥ ह्मणे मंत्र तिजसांगूनी ॥ सांगे कचा हा बाहेर येतां ॥ ३ ॥ मंत्र हा जपूनी उठविल मातें तो सुगुणी ॥ आनंदे विष्णुदास भार्गवदुहिता ॥ ४ ॥

**मा० प० ऐके देवयानी:—**

मग मंत्र जपूनी॥ वाहे कवी कचालागूनी ॥१२॥ कुक्षी वीदारूनी॥ येई तेजस्वी आदिहूनी ॥ १३ ॥ मंत्र तया सुरयानी॥सांगुनि उठवी ताताला-गुनी ॥ १४ ॥ उभया जिवंत पाहुनि॥विष्णुदास लोळे चरणीं ॥१५॥

**॥ अभंग ॥**

हृदयीं कचा आलिंगून ॥ वदे कवी प्रेमेंकरून ॥ दिलें मजला जीवदान ॥ बीजसहीत संजीवन ॥ प्राप्त झाला तुजलागून ॥ आतां संतोषेंकरून ॥ देव इंद्रादीक गुरुतें ॥ जाइ स्वर्गा भेटायातें ॥ साधि आतां सुरकार्य ॥ मारा दुष्ट निशाचर ॥ मद्बळें हे दैत्य मत्त ॥ केलें मजला मानहत ॥ फळेल ही त्यांतें करणी ॥ विष्णुदास बोले वाणी ॥ १ ॥

**॥ गीत ॥**

वंदुनिया मग गुरूचरण॥अंतरगांहीं आनंदें येऊन ॥ बोले सुरयानीलागून ॥ बृहस्पतीसूत ॥ १ ॥

**॥ साकी ॥**

दिली आज्ञा गुरूनीं स्वर्गालागी जाया मजला ॥ आलों ताई तुला पुसाया दे आज्ञा जायाला ॥ चा० ॥ झाले बहूदिन ॥ तातामातें पाहून ॥ १ ॥

**पद राग मल्हार ताल धुमाळी.**

अहा ! कचा किती निष्टुर झाला सोडुनि जातां कां मजला ॥ जाणे तरि आपल्यासह न्यावी कृपाकरूनि मज स्वर्गाला ॥ ध्रु० ॥

**पद राग बहिरवी ताल त्रिवट.**

सजुनि तात आणि धाम ताइ कां फुका स्वर्गी तरि येसी ॥ ध्रु० ॥ काय काम तव तिथें असे गे कारिन सांग तें मजसी ॥ यावें ऐसें मनीं असे तरि नेइन मम लग्नासी ॥ १ ॥ कृपा करुनिया देई आज्ञा जाया गे गृहासी ॥ झाले बहु दिन तात, माता, आप्तांच्या भेटीसी ॥ २ ॥

**मा० प० अहा! कचा:—**

भेटू येवे तुम्हांसवे हो माझ्या मीही आप्तांला ॥ १ ॥

मा० प० त्यजुनि तातः—

कोण कोण तव आप्तसोयरे असती या ठायासी ॥ सांग ताइ मग नेइन मजसह खचित तुला स्वर्गासी ॥ २ ॥

मा० प० अहा! कचाः—

मामंजी आणि स्वसादिकां हो येतें मी भेटायाला ॥ २ ॥

मा० प० त्यजुनि तातः—

झालें नसुनी लग्न तुझें कां भलतें मजला कथिसी ॥ दे आज्ञा गे आतां पुन्हां मी येइन भेटूं तुजसी ॥ ४ ॥

मा० प० अहा ! कचाः—

भलें वेड पांघारिलें सखया काय अहा ! बहाणा आपला ॥ ३ ॥ आपुले माता तात माझे सांगा नव्हत कोणी कां मजला ॥ ४ ॥ साधुनि आपुलें काम दुःखित कां टाकुनि जाता ही हो अबला ॥ ५ ॥ आजवरि माझा हेतू सांगा नाहीं कां आपणा कळला ॥ ६ ॥

पद राग मुलतानीधनासरी ताल धुमाळी.

व्यर्थ ताइ कां भलतें वदसी असुनी सज्ञानी॥शिव शिव ! ! तव वच ऐकवे न कानीं ॥ ध्रु० ॥ श्रेष्ट गुरूची कन्या सुगुणी तव मम तात एक सुज्ञानी ॥ होय माझि तूं भगिनी ॥ १ ॥

मा० प० अहा ! कचाः—

देवविली संजीवनि केलें जिवंत कीतीदां आपुल्याला ॥ ७ ॥ केलें आपुलें काज तयाचें बक्षिस कां देतां हें मजला ॥ ८ ॥ धरुनि तुझा वरण्याचा हेतू काल काजवरि म्या कंठीला ॥ ९ ॥ देववितें पित्राज्ञा कांता दोष न मज वरितां आपणाला ॥ १० ॥

मा० प० व्यर्थ ताइ कां भलतें:—

अशास्त्र कथिसी कैसी करणी ॥ सकल शास्त्रपारंगत असुनी ॥ न वरिन तुज मी तरुणी ॥ २ ॥

मा० प० अहा ! कचाः—

नामापरि तव कुटील करणी मनोभंग कीं त्वां मम केला ॥ ११ ॥

शाप तुला घे रे हा नीचा कीं होवो संजीवनि विफला ॥ १२ ॥ विष्णुदास ऐकुनिया वच हें क्रोधें तिजसी काय वदला ॥ १३ ॥

**सा० प० व्यर्थ ताइ कां भलतें:—**

शापें निर्फल मज संजीवनि ॥ फलित करिन मी दुजां शिकउनी ॥ गुरुकृपेंकरुनी ॥ ३ ॥ शाप घे हा तुजलागुनी ॥ कीं तुज न वरिल विप्र कोणी ॥ सत्याचे गे पापीणी ॥ ४ ॥ शाप ऐसा तिज देऊनी ॥ जाई कच स्वर्गालागुनी ॥ विष्णुदास आनंदूनी ॥ ५ ॥

**॥ ओवी ॥**

कच येतां इंद्रपुरीसी ॥ आनंदूनी सुरवर मानसीं ॥ सामोरे जाऊनी तयासी ॥ गौरव करिती अपार ॥ १ ॥

---

# ययातिआख्यान.

**पद राग हमीर ताल त्रिवट.**

कां दासी देवयानीची शरमिष्ठा हो झाली ॥ परिसा कथा हो पुढली ॥ ध्रु० ॥ वृषपर्वाकन्याशर्मिष्टा रूपवती सहस्त्र दासिसहित ॥ देवयानि मैत्रिणीसह एक दिनें जलक्रीडार्थ बालोद्यानसरसीं आली ॥ १ ॥ वस्त्राभरणें तिरीं ठेउनी गाननृत्य आनंदेंकरूनी ॥ क्रीडती इंद्रें पाहुनि वायु सोडुनि विनोदार्थ वस्त्रें तिरिचीं तीं उडविली ॥ २ ॥

**श्लोक वसंततिलका.**

चिन्हें बघूनि अवघी मग वादाळाची ॥ झालीं भयाभित मनें अवघ्या मुलींचीं॥ध्याया त्वरें युवति वस्त्र तटासि आल्या ॥ नेणोनिया स्व वसना भलत्यास घ्याल्या ॥ १ ॥

**॥ ओवी ॥**

स्वचीर पाहे देवयानी ॥ तों तें शर्मिष्ठा नेसूनी ॥ बसली पाहूनि-या नयनीं ॥ क्रोधें तिजसी कायदे ॥ १ ॥

**पद राग कानडा ताल एका.**

अशी पाहुन विपरीत करणी क्रोधें बोले देवयानी ॥ ध्रु० ॥ चिर माझें भ्रष्टविलेंस शरमिष्ठ मातलीस ॥ बोल कां हें नेसलीस नीच मदें करुनी ॥ १ ॥

**पद राग झिंजोटी ताल त्रिवट.**

मी राजकन्या शर्मिष्ठा तूं द्वीजकन्या देवयानी ॥ बोलसि कां मर्यादा सोडुनि ॥ध्रु०॥ घाईंत बदललें चिर मी नेसलें॥कसें भ्रष्ठलें सांग क्षणीं॥ बोल जिव्हा आटपूनी ॥ १ ॥

**मा० प० अशी पाहुन विपः—**

योग्यायोग्य न जाणसि राज्यमदें बडबडसी ॥ दास्यत्वाचे योग्य तुजसि जन्म नीचयोनि ॥ २ ॥

**मा० प० मी राजकन्याः—**

विप्रकन्येला दासी कशाला ॥ भिकारडे तुज कोण मानी ॥ खाशिल मार अंगभरुनी ॥ २ ॥

**मा० प० अशी पाहुनिः—**

दैत्यकन्ये नीतिहीन दुष्ट तुमचें आचरण ॥ आमुचे प्रतापें बाचून विष्णुदासा न मानी ॥ ३ ॥

**मा० प० मी राजकन्याः—**

मग देवयानिस रागें ताडुन ॥ कुपीं ढकलुनी देउनी ॥ विष्णुदास ह्मणे येइ ती सदनीं ॥ ३ ॥

**॥ ओव्या ॥**

इकडे ययाती नृपवर ॥ मृगया करितां थकूनि फार ॥ उदकार्थ आला कूपावर ॥ कवीकन्या होती जेथें ॥ १ ॥ दीन रुदनस्वर ऐकूनी ॥ पाहे कूपीं जों डोकाउनी ॥ दिव्यकन्या तों दृष्टीपडुनी ॥ रायमन कळवळे ॥ २ ॥

**पद राग पिलु ताल धुमाळी**

भिऊं नको हा ययातिराजा काढीतों वर तुजसी बाळे ॥ सांग कोण

या भग्नकुपीं गे पडुनीया तूं रडसी ॥ध्रु०॥ जलस्थल देवी किं यक्षिणी कीं अपराधी ह्मणुन ॥ कीं चोरांनी अभरणें हरून कुपीं दिली ढकलून ॥ १ ॥

**पद राग यमन ताल धुमाळी.**

काढा राजा मी कन्या शुक्राचार्याची मनुज साची बहुमान्य ॥ध्रु०॥ मी शर्मिष्टासंगें सखया ॥ आलों वनीं या हो क्रीडाया ॥ उभयांमध्यें कलह झाला आज ॥ १ ॥ ताडुनि ती मज कुपीं ढकलुनी ॥ गेली काढा कृपाकरूनी ॥ पात्र तुह्मी हा हस्त धरूनी मज ॥ २ ॥

**मा० प० भिऊं नको:—**

राजा परम आनंदें काढी तिजला कर धरून ॥ पाहुनि रूप चकीत मानसीं ह्मणे अनूपम रत्न ॥ २ ॥ अंग पुसून बोलत तिजसी प्रेमेंकरूनी- वचन ॥ असों द्यावें या वचनाचें मानसांत तव स्मरण ॥ ३ ॥

**मा० प० काढा राजा:—**

मज शाप असे हो कचाचा ॥ कीं द्विज कोणी न वरिल साचा ॥ आला घडुनी प्रकार तैसा सहज ॥ ३ ॥ मग रायाचे चरण नमून ॥ घडविन ह्मणे तातातें कळउन ॥ विष्णुदास ह्मणे नीघे करून हितगूज ॥ ४ ॥

**पद राग देस ताल एका.**

शर्मिष्टाकृतकरणी स्मरूनि देवयानि काय करित जाउनी ॥ ध्रु० ॥ नगरास संनीध येत ॥ धात्रिलागि सर्व कथित ॥ सांग पित्या ह्मणे त्वरित दुष्ट करणीं ॥ १ ॥ सोडा दैत्यसंगतीस ॥ त्यागिन नातरि प्राणास ॥ दृढनिश्चय हाचि खास सांग जाउनी ॥ २ ॥

**॥ ओंव्या ॥**

धात्री कवीस येऊन ॥ सांगे सकल वर्तमान ।. ऐकूनि मुनी क्रोधाऊन । दैत्यसभें पातला ॥ १ ॥ तों वृषपर्वा आदरेंकरून ॥ करावया येतां पूजन ॥ शुक्रें त्यास धि:कारून ॥ ह्मणे पुरे हा आदर ॥ २ ॥

**पद राग सोरट ताल एका.**

संगतीसी ॥ राहून मानहानें या

शुक्राची झाली खाशी ॥ ध्रु० ॥ तव कन्यें देवयानिस आति निर्भर्त्सुन॥ भग्न कुपामाजि होती दिली ढकलुन॥मम शिष्य कचघात बहुदां करुन ॥ चूर्ण करुनि त्याचें दुष्टा पाजिलें त्वां मजसी ॥ १ ॥ जळो तुझी दुष्ट संगत आतां सोडुन ॥ कन्ये घेऊनि जातों त्यास वनालागुन॥कालक्रमण करूं तेथें आनंदेंकरून॥ आजवरि कृतउपकार योग्य फेडिलेसी ॥ २ ॥

**पद राग झिंजोटी ताल धुमाळी.**

शुक्राचार्या गुरुवर्या या वृषपर्व्यावर करावी दया ॥ ध्रु० ॥ अपराधी मी अनन्य शरण तुह्मावरि हें राज्य ओवाळीन ॥ दास सर्व आह्मि तुमचे दीन ॥ धरि पायां ॥ १ ॥ शर्मिष्ठेचें योग्य शासन ॥ सांगाल तें मी आज करीन ॥ नाहीं त्राते तुह्मावीण ॥ ताराया ॥ २ ॥ आपुल्या कृपें आह्मी जिवंत ॥ आपण त्यागितां होईल अंत ॥ योग्य वाटे तरि करा अनाथ ॥ कविराया ॥ ३ ॥

**मा० प० रे वृषपर्व्या:—**

देवयानिचें समाधान होइल जेणेंकरून ॥ करिशिल तरि आतां ऐक एथें राहिन ॥ नातरि मी तीज घेउन वनीं जाइन ॥ यावीणे युक्ति नसे स्वहितसाधनासी ॥ ३ ॥

**मा० प० कां दासी देवयानी:—**

वृषपर्वा दैत्य वनीं येउनि स्तउनि देवयानिलागि वंदुनि ॥ क्षमाकारि बोले पदर पसरुनी मानि दीन शर्मिष्ठा ही दासी आपुली ॥ ३ ॥

**सारिकाछंद ताल धुमाळी.**

द्व्यसहस्र जरि युवतींसहित ॥ देशिल तव कन्या खचीत ॥ मम दास्यत्वा तरी आनंदित ॥ तातगृहीं मी येइन ॥ १ ॥ मान्य करुनी दैत्यें वचन ॥ द्व्यसहस्र दासीसह आणुन ॥ शर्मिष्ठे करुनी अर्पण ॥ ह्मणे त्राती तूं हीची ॥ २ ॥ मग आनंदें देवयानी ॥ गेली पितृगृहालागुनी ॥ कांहीं कालें पुढें त्या वनीं ॥ दासीसह ये क्रीडार्थ ॥ ३ ॥ तेथें षडरस अन्नें खाउनी ॥ माधावि मदिरा प्राशन करुनी ॥ क्रीडा करित आनंदेंकरूनी ॥ तंव काय वर्तलें ॥ ४ ॥ मृगया कारितां श्रांत होउनी ॥ ययाती आला त्या वनीं ॥ दासीसह कविकन्ये पाहुनी ॥ प्रेमें काय पुसतसे ॥ ५ ॥

### पद राग देस ताल दीपचंदी.

सांग कोण तूं आनंदें क्रीडसी या वनीं ॥ कुमरीसमूह सवें घेऊनी ॥ अति लावण्य मनोहर तरूणी ॥ धु० ॥

### पद राग बिहाग ताल एका.

शुक्राचार्याची मी कन्या देवयानि ह्मणती मजसी ॥ शर्मिष्टा ही दैत्यकन्या दोनसहस्त्र कुमारिसहित माझि दासी ॥ धु० ॥ वाटतें पाहिलें पूर्वी मीं तुम्हास हो कोठें तरी ॥ कृपाकरूनी सांगा काय नाम आपुलें मनसी ॥ १ ॥

### मा० प० सांग कोण तूं:—

नहूषात्मज मी ययाती गे नृपवर मृगयें श्रांत आलों या उद्यानीं ॥ ऐकूनी नाम तुझें मज स्मरतें कीं काढीलें तूज कूपांतुनी ॥ त्वां जें दिलें मज वचन त्यावेळीं पूर्ण करी आतां आनंदूनी ॥ चाल ॥ या दासी कोण सांग मजलागूनी ॥ १ ॥

### मा० प० शुक्राचार्या:—

वृषपर्वा दैत्यानें त्या अपराध दंडनीं ॥ दासिसहित शर्मिष्ठाही आर्पिली हो मजसी ॥ २ ॥ नाम आपुलें ऐकतांचि वचन स्मरलें मजसी ॥ झालें कुपांतूनि काढितां पाणिग्रहण आपुल्याशीं ॥ ३ ॥

### मा० प० सांग कोण तूं:—

क्षत्रीयें परि द्विजकन्या वरणें हें अयोग्य आणीक हें गे असे दुजें ॥ अति कोपिष्ट ब्राह्मणाची तूं कन्या कोपल्या तो पुढें कठिण माझें ॥ तशांत तयाचे आज्ञेवांचूनी बोलणें सर्व हें व्यर्थ तुझें ॥ चाल ॥ वाटे अशक्य हें मजलागूनी ॥ २ ॥

### मा० प० शुक्राचार्यांची:—

क्षत्रियानेःपात पूर्वीं होतां पुन्हां ते द्विजांकडुनी ॥ झाले तैसे द्वीजलोपामुद्रा त्या क्षत्रियेसी ॥ ४ ॥ मम पित्यानें आर्पण केल्या दोष नलगे आपणासी ॥ विष्णुदास म्हणे धाडी बोलऊं ताता धात्रीसी ॥ ५ ॥

### मारिकाछंद ताल धुमाळी.

पाला वनालागुन ॥ रायें त्यालागी

पाहून ॥ विनयें वंदन करित ॥ १ ॥ बोले सुरयानी कवीस ॥ पूर्वी वरिलें मीं हो यास॥यावीणे मी दुजा वरास ॥ न वरिन ताता सत्य हो ॥ २ ॥ तिचा आग्रह बहु पाहून ॥ बोले कवी ययातीलागुन ॥ करी हिजसह पाणिग्रहण ॥ दोष तुझा मी निवारिन ॥३॥ परी ऐक या शर्मिष्ठेसी ॥ देतों कन्या शुश्रुषेसी ॥ परी कदा न संग हिजशीं ॥ करी सत्य राजेंद्रा ॥ ४ ॥ आज्ञा त्याची मान्य करून ॥ कविजा शर्मिष्ठेस घेउन ॥ दासीसह स्वनगरालागुन ॥ जाई राय आनंदें ॥ ५ ॥

॥ ओवी ॥

कांहीं कालें कविजेस ॥ होतां सुत खिन्न मानस ॥ होऊनि शर्मिष्ठा सखीस ॥ काय बोले सुंदरी ॥ १ ॥

## पद राग पिलु ताल दीपचंदी.

शर्मिष्ठा वदत सखे गूणवती विचित्र ही दैवगती ॥ झाली यौवन प्राप्ती कामपीडा होती कशी करूं सांग गती ॥ १ ॥ सुरयानी सुतवती प्राप्त अधोगती मज न होता संतती ॥ वरिला नाहीं पती तारूण्य रूप माती झाली कर्मे अहा ! ती ॥२॥ देवयानीपती म्यां तोची नृपती वरिला आहे चित्तीं ॥ परिं मदनव्याप्त प्राण जाऊं पहात सांग कांहीं युक्ती ॥ ३ ॥ अघटीत ईशकृती राय ययाती आला त्या वनाप्रती ॥ पुजुनी तयाप्रती कामें व्याप्त अती लीनपणें बोले ती ॥ ४ ॥ करि ऋतूशांती विनयें त्या कथी ती धिःकारी तिज नृपती ॥ पुन्हां ती तयाप्रती कामदुःखें अती रूदत काय ह्मणती ॥ ५ ॥

## पद राग आनंदभैरवी ताल धुमाळी.

शर्मिष्ठा अनाथेच्या नाथा ॥ हे ययाति राजा दोष तुझा न मज अंगीकारितां कां भीता वृथा ॥ ध्रु० ॥ मम सखीस तुह्मि जेव्हां वरिलें तेव्हांच पति म्यां तुह्मा मानिलें ॥ या दास्यत्वींच बद्ध झाले ॥ सांगा कोण मज त्राता ॥ १ ॥ आहे जर आपल्या मी दास्यीं ॥ कसा दुजा पति वरील मजसी ॥ विरहदुःख ठाउक आपणासी ॥ अंगिकारा मज हो आतां ॥ २ ॥ पुरवा माझे त्वरें मनोरथ ॥ करा मजसी दुःखमुक्त ॥ ना तरि करीन प्राणअंत ॥ मदनें विव्हळ ही कांता ॥ ३ ॥

**पद राग यमनकल्याण ताल एका.**

काय ययातीस योग्य ही गे करणी॥शर्मिष्ठे गे तूंहि मनिं आणी ॥ध्रु०॥ अनयशास्ता नृप मी असूनी ॥ पातक कां करणी करूं सत्य त्यजुनी ॥ १ ॥ परी माझें व्रत याचकां ईप्सीत देणें हें निश्चीत देतों भोग तुजलागुनी ॥ २ ॥

**मा० प० शर्मिष्ठा वदत:—**

आनंदें शर्मिष्ठेस भोगदान नृपती देउनी करी शांती ॥ मग संतोषवृत्ती येत नगराप्रती कांहीं दीन या लोटती ॥ ६ ॥ शर्मिष्ठा तों सती झाली पुत्रवती आनंदे चित्तीं अती ॥ वारंवार ऐशी होतां नृपसंगती पुत्र तीज तीन होती ॥ ७ ॥ द्रुह्यु अनु पुरु ऐशीं नामें त्यांचीं असतां कळे हें कवीजप्रती ॥ येउनी वना काय रागें मग शर्मिष्ठेतें पुसत सती ॥ ८ ॥ झालें कैसें सुत तुजसी हे केलीस पापीणी भ्रष्ट कृती ॥ तों ती तीज म्हणे अवचीत मुनी एक आले या स्थळाप्रती ॥ ९ ॥ भावें पूजीतां म्या मागवर मज प्रसन्न होऊनी ह्मणती ॥ व्हावी मज पुत्रसंतत्ति ऐशी त्या केली म्यां विनंती ॥ १० ॥ देतां भोग मज गर्भ राहूनीया झाले मी पुत्रवती ॥ सत्य सत्य सखे तुजला मी सांगतें घडली नाहीं अनीती ॥ ११ ॥

**॥ ओव्या ॥**

इकडे देवयानीस दोन ॥ झाले सुत त्यांलागून ॥ यदू तुर्वसू आनंदून ॥ नामें ऐशीं ठेवि ती ॥ १ ॥ देवयानी रायासहित ॥ एकदिनीं ज्या वनांत ॥ होती शर्मिष्ठा तेथें येत ॥ शर्मिष्ठा सुत तों खेळती ॥२॥ पाहतां त्यांनीं रायास ॥ आले धावत भेटायास॥तों राया ढकलीत त्यांस॥ लज्जित होऊनी पलीकडे ॥ ३ ॥ शंकित देवयानी मानसीं ॥ रूपरंग पाहूनी त्यांसी ॥ रायासमक्ष कपटी मानसीं ॥ काय पुसती जाहली॥४॥

**पद राग बाहिरवी ताल एका.**

शर्मिष्ठेच्या सुता पुसत कपटें देवयानी कोण सांगा तात तुमचे मज ...नी ॥ ध्रु० ॥ खाउ देइन खेळाया देइन बाळानो आणुनी ॥ १ ॥
२ ॥ कोण अंकीं घेत प्रेमें
त्यास आंचा फुगउनी ॥४॥

॥ आर्या ॥

ह्याचि जनक गे आमुचा दावित हस्तेंकरूनी रायातें ॥ ऐकुनि स- वतीमत्सर दुःसह ने कविसुतेस कोपातें ॥ १ ॥

पद राग काफी ताल एका.

प्राणपती केलि तुह्मीं दासिसंगें संग करूनि खचित अनीती ॥ध्रु०॥ रंगरूपेंकरूनि सूत आपणापरि हे दिसत ळळा आपला यां खचीत ॥ लोटितां कां घ्या हो आलीं बाळें रडत तीं ॥१॥ तरिच नित्य वाटिकें- त येत होता नीयमीत ॥ सवत मला ही केलीत ॥ नीच दासि दैत्यक- न्या जारिणी अती ॥ २ ॥ पुरुषजात नीच खरी छपविलें हें आजवरी॥ पाप कदा छपे न परी ॥ अकृत्रिम प्रेम आपलें हीजवरती ॥३॥ वि- ष्णुदास ह्मणे सतिस राय धरूनी हनूस ॥ अपराध हा सखे मज ॥ क्षमा करी सोडि राग करित वीनती ॥ ४ ॥

पद राग अलैयाबिलावल ताल एका.

दुःसह हें कृत्य कसें सोसवेल या गे देवयानी ॥ ध्रु० ॥ प्राणपती कुमति अनिति आचरूनी ठेविलें छपाउनी ॥ भ्रष्ट दुष्टा नष्टा लज्जाही- ना तूजलागुनी जातें सोडुनी ॥ १ ॥ शर्मिष्ठे गे नष्ट दुष्ट जारिणी या ययातिपासुनी ॥ झाले सुत हे असतां तुजसि कथिलें मजसी अनृत बनउनी हीन पापिणी ॥ २ ॥

पद राग मालकंस ताल एका.

कांहिं नाहिं आनूचीत आचरिलें मीं देवयानी ॥ ध्रु० ॥ या शर्मिष्ठे- चा वृत्तांत ऐकल्यावरि ह्मणासिल उचित ॥ तव वराधीन मी ह्मणुनि तोचि माझा वर जाणी ॥१॥ आहे जरी तुझी दासि दुजा कोण गे वरिल मजसी ॥ काय ठावी नाहिं तुजसि मदनपीडा राणी ॥२॥ पितृहितास्तव ही दासि अबला कैंचि दया न तुजसी ॥ न धरि क्रोध सखे मानसिं विष्णुदास ज्ञानी ॥ ३ ॥

मा० प० दुःसह हें:—

कदा न राहिन जाउन कथिन तातासि कृत्य जें त्वां केलेंसी ॥ गेलि ऐसें वदुन विष्णुदास ह्मणे देवयानी त्यास सोडुनी ॥ १ ॥

**पद राग बसंतबहार ताल एका.**

काय विपरित आचरण घडलें शुक्राचार्य ऐशा मुनीहातुनी ॥ परि-सा देवयानि ममत्वेंकरूनी ॥ ध्रु० ॥ देवयानी येत शुक्रातें वंदीत ॥ ययातीही येत तिजमागूनी ॥ उभा म्लान वदन खिन्न मनीं॥१॥ देवयानी कथी रायाची अनीती ॥ येणें शर्मिष्ठेस भोग देऊनी ॥ पुत्र तीन झाले तिज यापासुनी ॥ २ ॥ तवाज्ञा मोडून मशीं कृतम कर्म ॥ केलें आतां सत्य ठेवी न हा प्राण ॥ आलें दुःसह दुःख कथाया लागुनी ॥ ३ ॥ कोप ये ऋषीला राजासी शापीला ॥ दुर्धर्ष जरेला पाव ह्मणुनी ॥ झाला राजा व्याप्त जरेंकरूनी ॥ ४ ॥

**॥ गीत ॥**

दिधला मजला शाप दुर्धर ॥ परी सखी सुरयानी सुंदर भोग भोगिले हिणें आजवर ॥ तृप्त न हो झाली ॥१॥ तैसा मी यौवनीं अतृप्त ॥ उभयां आपला शाप दुःखद ॥ द्या उःशाप करा मुक्त ॥ कृपाकरुनि आम्हां ॥ २ ॥ कृपा उपजली शुक्रगुरूसी ॥ ह्मणे जरा ही ज्या तूं देशी॥होइल प्राप्त त्वरित तयासी ॥ मुक्त तूं होशी ॥ ३ ॥ राय ह्मणे जो माझा सूत ॥ घेइल जरा त्यासि निश्चित ॥ राज्य असावें कृपावंत ॥ मान्य मुनी करिती ॥ ४ ॥

**पद राग मांडजिल्हा ताल धुमाळी.**

स्त्रीसह राया आला आनदें वंदुनिया श्वशुराला ॥ त्वरें स्वनगराला ॥ ध्रु० ॥ आणुनि सर्व सुता ह्मणे द्या यौवन कोणी मला ॥ घ्या ही जरा देइन राज्य त्याजला ॥ १ ॥ कोणि न घे तत्जरा परी पुरु सूज्ञ सुत तो खरा ॥ घेउनी जरा देता यौवन जाहला ॥ २ ॥ दे राज्य त्याजला आनंदें भोगित यौवनभरा ॥ त्रिभुवनीं विष्णुदास गाजला ॥३॥

---

## हिडिंबवध.

---

**पद राग पिलु ताल त्रिवट.**

चारित्र पुढें काय काय जरा-

ले ॥ ध्रु० ॥ भीमस्कंधीं बसून साही विवर क्रमीत ॥ एक प्रहर निशीस भागीरथी देखीत ॥ पैल जावया न गती धर्म तीतें स्तवीत ॥ चा० ॥ विदुरें प्रेषित तों कर्णधारें धर्मा वंदिलें ॥ १ ॥

**श्लोक वसंततिलका.**

धर्मासि काय वदला मग कर्णधार ॥ भागीरथीमधुनिया करण्यास पार ॥ तुह्मांसि हो मजासि पाठविलें विदूरें ॥ नेऊन पार कळवीन तयास सार ॥ १ ॥

**घनाक्षरी.**

येतां सर्व पैलपार ॥ मानिति विदुरऊपकार ॥ जात वंदुन कर्णधार ॥ पांडव मार्गा लागले ॥ १ ॥

**॥ आर्या ॥**

स्कंधीं घेउनि माते बंधूसह भीम तो पुढें चाले ॥ मार्गी श्रमूनि कुंती निशिसमयीं काय ती सुता बोले ॥ १ ॥

**पद राग यमन ताल त्रिवट.**

काय वचन बोले कौंती ऐकुन भीममानस द्रवलें ॥ ध्रु० ॥ श्रमलासी स्थीर राही क्षणेक तूं ॥ पाजी उदक सर्वां तृषेनें व्यापीलें ॥१॥

**साक्या राग जोगी ताल धुमाळी.**

दुःखें ल्हानां थोरांही जन हो जगिं यासम असतीं ॥ध्रु०॥ तृषाक्रांत आणि क्षुधित वृक्षतळिं निजउनि पांचिजणांला॥दुःखित अंतःकर्णे वृकोदर शोधित जात जळाला ॥ १ ॥ पाहि उदक परि न्यावयास तें संनिध नसे हो पात्र ॥ नेता झाला मग भिजउनिया आपलें उत्तरी वस्त्र ॥ २ ॥

**॥ साक्या ॥**

बंधू माता व्याकुळ होउनि लोळत धरणीवरतीं ॥ पाणी ! पाणी ! ऐसें बोलुनि श्रीकृष्णा आठविती ॥ १ ॥ ऐकुनि शोका भीमाचें तें मानस बहु कळवळलें ॥ झडकरि पाणी पाजुनि सर्वांलागी सावध केलें ॥ २ ॥ हा ! हा ! दैवा काय जिणें हें आसुनि मी जीवंत ॥ माता बंधू माझे ऐशा दुःखातें भोगीत ॥ ३ ॥

### पद राग काफी ताल एका.

वृक्षनाळिच्या रुदनास ऐकुनि हिडिंब बोलला ॥ ध्रु० ॥ ताइ हेडंबी -ले आलें भक्ष्य तुला ॥ जाई खाई आणी आणि माझा कंठ शोषला ॥ ऐकुनि बंधूवचनासि आली वृक्षतळाला ॥ चा० ॥ देखुनी भीमा मोहित वि-रादास बोलला ॥ २ ॥

### पद राग यमन ताल धुमाळी.

हेडंबी पाहुनि भमिप्राति कामातुर जहाली ॥ सुंदर रूप धरून भीमाप्रती काय बोलली ॥ध्रु०॥ काय नाम सांगा आपुलें ॥ मी पाहुनि मोहित जहालें ॥ वरा मज हेतूनें आलें ॥चा०॥ अवचित मजला लाभ जहाला दासि करा आपुली ॥ १ ॥

### पद राग भूपकल्याण ताल अर्धधमार.

क्रोध येउनि भीम काय हिडिंबिस बोले ॥ ऐकुनि तें बहू तिजसी भय वाटलें ॥ ध्रु० ॥ कां गे मम नामासि पुससी भीम ह्मणाति मला ॥ कोण तूं कोठील स्त्री गे सांग नामाला ॥ काय इच्छा धरुनि मानसि पुससी तूं मजला ॥ राक्षसी कीं देवस्त्री निशीं फिराशी भय न तुला ॥चा०॥ न करि गडबड माय बंधू श्रमुनि हे निजले ॥ १ ॥

### मा० प० हेडंबी पाहुनि:—

असुर हिडंब याची मी भगिनी ॥ न भ्या रक्षिन तुम्हालागुनी ॥ सत्य मी मम बंधूासि प्रार्थुनी ॥ चा० ॥ घ्या मज पदरीं चरणातें धरि भीमें झिडकारिली ॥ २ ॥

### ॥ ओवी ॥

हिडंबी ह्मणे भीमाप्रती ॥ बळी हिडंब या वृक्षावरती ॥ आहे भक्षिल तो सर्वांप्रती ॥ संभाळुनि ऐस आतां ॥ १० ॥

### मा० प० क्रोध येउनि:—

बंधुबळ हेडंबि वर्णिशि मारिन मी त्याला ॥ कोटि राक्षस साह्य जरि गे तुझ्या बंधूला ॥ न वरि तुज मी कदा दुष्टे मरण योग्य तुला ॥ जारिणी तव हेतु न कळे सत्य गे मजला ॥ भीम आणि हिडंबि भाषण हिडंबें ऐकीलें ॥

## कटाव.

ऐकून हिडंबीवच तें हेडंब अती कोपला ॥ ध्रु० ॥ उडी टाकुनी वृक्षतळासी ॥ रागें बोलतसे भागिनीसी ॥ दुष्ट जारिणी रतसी याशीं ॥ लाज नसे तव किमपि मानसीं ॥ बहुभाग्यें आल्या आहारासी॥ आड येशि खाइन मी तुजसी ॥ आणिक गिळिन मी या साहांसी ॥ ऐसें क्रोधें बोलुन तीतें ॥ वृक्षघाय हाणि भीमावरतें ॥ पिष्ट करित भीम हि वृक्षांतें ॥ करिती दोघे मल्लयुद्धातें ॥ झाले गलब्यानें पांडव ते ॥ जागृत सोडाया बाणांतें ॥ पहाती तों भीमानें त्यांतें ॥ स्थीर करुनि ह्मणे पहा युद्धातें ॥ पायिं धरुनि मग निशाचरातें ॥ मारित हपटुनि क्रोधें लत्तें ॥ पाहुनि हर्षित बहु पांडव ते ॥ चाल ॥ येउनि मग भीम आनंदें वंदित कुंतीधर्माला ॥ १ ॥

### मा० प० हेडंबी पाहुनिः--

हिडंबीस कामें व्यापिलें ॥ म्लान वदनें भीमा बोले ॥ मजविषयीं मन निष्ठुर केलें ॥ चाल ॥ होई अनाथेचा तूं भर्ता ह्मणुनी गहिंवरली ॥२॥

### ॥ ओवी ॥

भीमें झिडकारितां हिडंबीस ॥ म्लान मुखें येउनि कुंतीस ॥ परोपरीनें विनवुनि तीस ॥ काय ऐका बोलली ॥ १ ॥

### साक्या राग जोगी ताल धुमाळी.

पांडवचरित्र तें परिसा रसज्ञ सर्व तुह्मी ॥ ध्रु० ॥ मग ती कुंतीप्रति हिंडबी काय कथितसे नमुनी ॥ विनविलें भीमाप्रति माते परी न तो मम मानी ॥१॥ वेळोवेळीं साह्य करिन मी तैसा सुत मम उदरीं॥ होइल तो श्रीकृष्णा देखत रक्षिल अर्जुन समरीं ॥ २ ॥ ऐकुनि हिडंबीवच ऐसें कुंतीमन कळवळलें ॥ पुढिल कार्य जाणुनिया माता भीमाप्रति मग बोले ॥ ३ ॥

### मा० प० काय वचन बोलेः—

हिडंबिहेतू पुरवावे त्वां ॥ धर्मआज्ञें भीमें लग्न लाविलें ॥ ॥ २ ॥

### घनाक्षरी.

बोलत कुंती हिडंबीस ॥ दिवसा भीमा क्रीडायास ॥ नेइ रात्रिं पाठवि यास ॥ रक्षायासि आह्मांतें ॥ १ ॥

### ॥ ओंव्या ॥

हिंडबीस बोले वृकोदर ॥ तुज झाल्यावरी एक कुमर॥सत्य न मी गे तुझा वर ॥ हा निर्धार जाणपा ॥ १ ॥ मानऊानि हो गंधर्वलग्न ॥ हिडंबी भीमा स्कंधीं घेऊन ॥ क्रीडत वनीं उपवनीं जाऊन ॥ रात्रीं आणून पोहोंचवित ॥ २ ॥ एक संवत्सर हिंडबीला ॥ क्रीडा करितां पुत्र जाहला ॥ ठेवी घटोत्कच नाम तयाला ॥ उपजत शस्त्रें अवगत त्या ॥ ३ ॥

### पद राग बिहाग ताल त्रिवट.

पुढिं कर्णशक्ति निवाराया घटोत्कचा हरें निर्मीला ॥ ध्रु० ॥ हिडंबि पुत्रासवें घेउनी ॥ कुंतीसह त्या पांडवचरणीं ॥ घालितां वदे हस्त जोडुनी ॥ काय तो धर्माला ॥ १ ॥ जे समयीं संकट आपणाला ॥ स्मरणचि करितां दास आपुला ॥ सैन्यासह सत्वर साह्याला ॥ येइल हा सेवेला ॥ २ ॥ आज्ञा घेउनिया बलिवंत ॥ राज्य स्थापुनी राहे स्वस्थ॥ मातेसह त्या घोर अटवींत ॥ स्मरित दास विष्णूला ॥ ३ ॥

---

## बकासुरवध.

### घनाक्षरी.

भीम मातें स्कांधि घेत ॥ बंधु सर्व सवें नेत ॥ वनें उपवनें क्रमीत॥ साहिजण चालले ॥ १ ॥ कृष्णभजानीं सदा रत ॥ मार्ग क्रमिती इतुक्यांत ॥ भेटाति व्यास आकस्मात ॥ सर्व त्यासी नमीती ॥ २ ॥ व्यास आशिर्वाद देत ॥ एकचक्र नगरांत ॥ सर्व मातेसाहित येत ॥ रहात [illegible] ॥ ३ ॥ अन्नभीक्षा आणीत ॥ अर्ध भीमा सर्व देत ॥ काय वर्तलें ॥ ४ ॥

॥ आर्या ॥

राहत ज्या विप्रगृहीं रूदनस्वर आयकूनि एक दिनीं ॥ चकित मानासीं कुंती झाली तों विप्र शब्द ये कानीं ॥ १ ॥

॥ दिंडी ॥

विप्र प्रीयें बोलला गहिंवरून ॥ जाउं दे मज बक पाळिलागी जाण ॥ रक्षि आतां बालकें हीं लहान ॥ असे त्राता तुजवीण त्यांस कोण ॥ १ ॥ पत्नि बोले भर्त्यास तुह्मावीण ॥ काय करूं हो ठेऊन सत्य प्राण ॥ ह्मणे जातें पाळीस मी बकाच्या ॥ गळीं पडुनी रूदते स्वप्रियाच्या ॥ २ ॥

॥ साक्या ॥

ऐकुनि शोका बोलत कुंती कां हो रूदन करिता ॥ ब्राम्हण बोले दुःख आमुचें काय विचारूनि करिता ॥ १ ॥ कुंती बोले सांगे मजला उपाय योजिन कांहीं ॥ गहींवरूनी विप्र बोलिला ऐके आतां बाई ॥ २ ॥

श्लोक शिखरिणी.

वसे या आरण्यीं निबिड बक नामा निशिचर ॥ कदा द्यावें दुःखा नच ह्मणुनि त्यातें नरवर ॥ अमूपा अन्नाच्या सहित बळि एकेक घरचा ॥ प्रभातीं तो धाडी प्रतिदिनिं तया राय आमुचा ॥ १ ॥

॥ आर्या ॥

आली पाळी गेहावर आमुच्या आज गे ह्मणुनि मातें॥रडतों आम्ही सर्वहि संकट सांगूनि काय फल तूतें ॥ १ ॥ बोले कुंति द्विजासी स्वस्थ असा मारवीन भीमातें॥सांगुनि, विप्र म्हणे श्रम आह्मांस्तव तव सुतासि कां मातें ॥ २ ॥

श्लोक वसंततिलका.

शंका नको वदत कुंति द्विजोत्तमाला ॥ मारीयले मम सुतें बहु राक्षसांला ॥ त्याला बकास वधणें नच हो कठीण ॥ कोठें परी न वद हें वधवृत्त जाण ॥ १ ॥

## ॥ ओवी ॥

येतां पांडव भिक्षेहून ॥ कुंती बोले भीमालागुन ॥ संकटीं हा विप्र दारुण ॥ सर्व वृत्त कथीतसे ॥ १ ॥

## सा० प० काय वचन:—

याचि गृहावरी आलि बकपाळी ॥ घोर संकट यावरी ओढवलें ॥ ३ ॥ बकासूरहातें सोडवी यातें ॥ येणें आह्मांसी आजवरी पाळीलें ॥ ४ ॥ उत्तीर्ण होई ; मातावचन हें ॥ मानउनी विष्णुदासें वंदीलें ॥ ५ ॥

## पद राग भूपकल्याण ताल त्रिवट.

मान्य करुनी मातावचन भीम त्वरें नीघाला ॥ गाडा अन्नें भरुनी वर स्वयें बळी बैसला ॥ ध्रु० ॥ बकआरण्यीं येउन ॥ गर्जुन बोले त्यालागून॥दावाया तुज यमसदन ॥ त्वरें काळ हा रे आला ॥१॥

## पद राग झिंझोटी ताल धमार.

ऐकुनि भीम हाकेला धाउनि बकासूर आला ॥ ध्रु० ॥ अन्नासह ह्मणे बली भक्षिसि मुकसि प्राणाला ॥ १ ॥ ऐसें वदुनी क्रोधें भीमा मुष्टिघाय दिला ॥ २ ॥ वृक्ष हाणी परि न गणी भीम असुराला ॥३॥ विष्णुदास ह्मणे भीमें असुरा पाडीला ॥ ४ ॥

## सा० प० क्रोध येऊनि:—

न करि गडबड ह्मणुनि भीमें असुर करिं धरुन ॥ म्हणे यांतिल घास न मिळे तूजलागून ॥ भीम धरुं धांवतां राक्षस फेंकि पाषाण ॥ मल्लयुद्धें भीम त्यातें पाडि क्षिति धरुन ॥ चाल ॥ बकासुरा आपटून त्याचे प्राण हरिलें ॥ ३ ॥ बकासुर परिवार आला शरण भीमातें ॥ न वधुं भाक घेउन सोडिलें त्यांतें ॥ फेंकितां बकशव येउन पडे वेशींतें ॥ भीम येउनि कळवि सारें वृत्त मातेतें ॥ चाल ॥ ब्राह्मणातें न कथि कोणा भीम हें बोले ॥ ४ ॥

## ॥ ओव्या ॥

प्रात:काळीं राज्यालागून ॥ बकवधाचें वृत्त कळून॥राय आणवी बोलाऊन ॥ पाळी ज्यावरी त्या द्विजा ॥ १ ॥ रायें पुसतां विप्राला-

गुन ॥ कोणीं हरिलें बकप्राण ॥ सांगे महापुरुष एक येउन ॥ वद्नु नां त्यातें गुप्त हो ॥ २ ॥ आश्चर्य करी नृपवर ॥ विप्रें येऊन गृहीं सत्वर॥ वंदूनीया पंडूकुमर ॥ जहालें वृत्त कथीतसे ॥ ३ ॥

---

## द्रौपदीस्वयंवर.

### सारिकाछंद ताल धुमाळी.

पुढें कोणे एके दीनीं ॥ एक विप्र धर्माप्रति येउनि ॥ रात्रीं राहाव यालागूनीं ॥ ह्मणे स्थान मिळेल कीं ॥ १ ॥ धर्म त्यातें ठेउन घेत ॥ करिती भोजन द्विजासहित ॥ जिष्णू विप्रा काय पुसत ॥ चरण चुरीत असतां ॥ १ ॥ कोठुनि झालें हो आगमन ॥ कोण्या ठायीं पुढें गमन॥ काय हेतू मनीं धरून ॥ कृपा करुनी मज कथा ॥ ३ ॥ विप्र ह्मणे पृषदपुत्र ॥ द्रुपद याची कन्या पात्र ॥ लग्ना झाली चारुगात्र ॥ अयोनिसंभव सुंदरी ॥ ४ ॥ तिचें आहे स्वयंवर ॥ देइल. बहु धन नृपवर ॥ होइल माझें दरिद्र दूर ॥ ह्मणूनि तिकडे जात हो ॥ ५ ॥

### ॥ आर्या ॥

धर्म म्हणे विप्रातें सांगा मज याज्ञसेनिचें जनन ॥ झालें कसें द्विज ह्मणे परिसा एकाग्र चित्त देऊन ॥

### पद राग कमोदकल्याण ताल धुमाळी.

विप्रें कथा पांडवांसी कथिली ॥ द्रौपदि कैशी झाली ॥ ध्रु० ॥ द्रोणें पांडवसाह्य द्रुपदा हरिलें ॥ मन बहु खिन्न झालें ॥ फिरतां गंगातिरीं ऋषिस पाहिलें ॥ रायें त्यांतें स्तविलें ॥ अमूप धन मग त्यांलागी दिधलें ॥ ऋषि मनिं बहु तोषले ॥ ह्मणती कथा आपण जें मनिं आणिलें ॥ चा० ॥ पुरविन इच्छा आपुली ॥ १ ॥

### ॥ ओवी ॥

याज झाले प्रसन्न पाहून ॥ राय मनीं आनंदून ॥ माग ह्मणतां इच्छित दान ॥ काय त्यांतें बोलत ॥ १ ॥

**मा० प० विप्रें कथा:—**

द्रोणा वाधि ऐसा होवो कुमर ॥ आणिक कन्या सुंदर ॥ पाणि जिस वरील तो अर्जुन वीर ॥ आहे मनिं हें फार ॥ सांगति मुनि रायाला सुविचार ॥ हवन करी सत्वर ॥ होइल सफळ मनोरथ साचार ॥चा०॥ रायें सिद्धता केली ॥ २ ॥ मुनिसाह्यें होतां पूर्ण हवन ॥ निघे कुंडांतून ॥ किरीट कुंडलसह धृष्टद्युम्न ॥ रथ कवचासह पूर्ण ॥ निघे सुंदर कृष्णा वेदींतून ॥ कन्या अति लावण्य ॥ तों झाली वाणी स्वर्गांतून॥चा०॥ क्षत्रियांतक अवतरली ॥३॥ जिष्णुस कन्या द्यावि रायमानिं होतें ॥ जिवंत कीं न कळे तें ॥ असल्या येतिल स्वयंवराला ते ॥ दुर्घट करी पणातें ॥ आले बहु देशींचे नृप तेथें ॥ श्रीपतिसह यादव ते ॥ कौरव सर्व वीर मिळतिल तेथें ॥ चा० ॥ लग्न सप्तमि फाल्गुन शुक्लीं ॥ ४ ॥

**॥ आर्या ॥**

विप्र ह्मणे कुंतीतें मज सह घेऊनि या द्रुपदनगरीं ॥ तव सुत पराक्रमी त्यां कां नाहीं लाधणार ती नवरी ॥ १ ॥

**॥ ओवी ॥**

कुंती कथीत धर्मासी ॥ चला जाऊं पांचालपुरासी ॥ बक वधिला या ठायासी ॥ कळेल वृत्त हें शत्रूतें ॥ १ ॥

**पद राग कालंगडा ताल त्रिवट.**

विप्रवाक्य पांडवांनीं मान्य करून ॥ याज्ञसेनीच्या स्वयंवरा जात माते घेऊन ॥ ध्रु० ॥ भीम स्कंधीं घेऊनीया कुंतीमातेला ॥ बंधूसह सर्व वनीं मार्गें चालला ॥ जळीं क्रीडत अंगारक पुढें देखीला ॥ चा० ॥ रागाउनीया पाहूनी तो आला धाऊन ॥ १ ॥

**घनाक्षरी.**

ह्मणे पाहुनि निर्जन वन ॥ क्रीडा करितों काल जाणुन ॥ अन्य मार्गें करा गमन ॥ नातर मुकाल प्राणांसी ॥

**॥ कटाव ॥**

अंगारकगर्वोक्ती ती न साहे त्या जिष्णूला ॥ध्रु०॥ न मानती पा-

हुन वचनाला ॥ वदे अंगारक किरीटीला ॥ त्रास दिला बहु तुह्मी मजला॥यमपुरीं धाडितों तुह्मांला॥अर्जुन तों त्या काय बोलला॥भ्रष्टा भ्रष्टविलें गंगेला ॥ त्वरें निघुन जा स्वस्थानाला॥नाहीं तरि मुकसिल प्राणाला ॥ अंगारकपर्ण तो कोपला ॥ रथारूढ हो ये युद्धाला ॥ करीत बहु शरसंधानाला ॥ अर्जुन मारावया धांवला ॥ पाहुनि सर्व स्त्रियांसहीत ॥ यक्षस्त्री ती कुंभिनि येत ॥ धर्मा विनवुनि चरणीं लोळत ॥ चा० ॥ उपजुनी दया मानसीं वदे धर्म काय जिष्णूला ॥ १ ॥

## आर्या.

दे प्राणदान बोले तैसें सौभाग्य यांस जिष्णु असें ॥ मान्य करी वच मग तो स्वकथा गंधर्व त्यांस सांगतसे ॥ १ ॥

## सारिकाछंद ताल धुमाळी.

कुबेरमित्र मी रे विजया ॥ ॥ आलों मद्वनिं क्रीडावया ॥ अपराधी तुज शरण सखया ॥ मैत्री करी मजसवें ॥ १ ॥ नारदें कथिलें होतें भविष्य ॥ कीं कुरूकुळिं पांच पुरुष ॥ अवतरूनि भूभार निःशेष ॥ हरण करितिल सत्य ते ॥ २ ॥ चित्ररथ ह्मणती हो मजला ॥ कृपा करूनि अग्नेयास्त्राला ॥ द्या चाक्षुशिविद्या तुह्मला ॥ फार दुर्लभ ती देतों ॥ ३ ॥ ही विद्या परम गहन ॥ सोम दे विश्वावसूलासुन ॥ त्याचा मी हो मित्र ह्मणून ॥ तेणें दिधली मजप्रती ॥ ४ ॥ जिष्णू वदे गंधर्वास ॥ परम श्रेष्ट अग्नेयास्त्रास ॥ अग्नीवेशें दिलें द्रोणास ॥ प्राप्त मज त्यापासुन ॥ ५ ॥ एकमेकांच्या विद्या शिकुन ॥ तैसे इंद्रवज्रापासून ॥ सुरयक्षवाह अश्व सुगुण ॥ बहूत दिधले अर्जुना ॥ ६ ॥

## घनाक्षरी.

पुढें मार्गें जातां व्यास ॥ पाहुनि पांडव नमित त्यास ॥ तेणें कुशल पुसुनि त्यांस ॥ म्हणे कोठें निघाला ॥ १ ॥

## ॥ गीत ॥

पांचालपुरा स्वयंवराला ॥ द्रौपादिइच्छा असे अह्मांला ॥ जातों आह्मी कृपाकराला ॥ ठेवा मस्तकीं ॥ १ ॥ द्रौपादि पाचांची हो गृहणी ॥ असे ऐसा शाप ह्मणूनी ॥ घालिल माळ तुम्हांलागूनी ॥ ह्मणती व्यास चला॥ २ ॥

## पद राग धनाश्री ताल धुमाळी.

काय करिति कुंतीबाळ रे ॥ ज्यासि कृपाळ गोपाळ तो रक्षक भक्तपाळ रे ॥ ध्रु० ॥ पांचालपुराप्रति अवलोकिती ॥ अगणित नृपशिबिरें सुंदर तीं ॥ देशोदेशिचे जन बहु येती ॥ नगरी शोभित रे ॥ १ ॥ दळसह कौरवथाट पाहुनी ॥ पांडव नगरामाजि जाउनी ॥ कुलालगृहीं कुंतीस ठेउनी ॥ प्रभातिं स्वयंबरगृहीं जाउनीं ॥ बसती गुप्तचि रे ॥२॥

॥ ओवी ॥

सभास्थानीं द्रुपद येऊन ॥ सकल नृपांतें विलोकून ॥ दुःखित मानसीं होऊन ॥ ऐका काय वदतसे ॥ १ ॥

## श्लोक असंबाधा.

होतें माझ्या कीं मनिं मम दुहिता धन्या ॥ जिष्णूलागीं योग्य न नृपकुमरा अन्या ॥ द्यावी ऐसें तो परि न कळत हें ठाया ॥ कोण्या गेला ताद्विण मम पण हा वाया ॥ १ ॥

॥ कटाव ॥

जाउनिया धृष्टद्युम्नें शृंगारुनि कृष्णा आणिली ॥ ध्रु० ॥ सभामंडपीं सर्व थाटली ॥ देशोदेशिंच्या रायें भरली ॥ ऋषीमंडळी सर्व पातली ॥ कौरव यादव सर्व मंडळी ॥ अनुक्रमें रांगेनें बसली ॥ आला श्रीपती सहित तो हली ॥ पांच केसरी गुप्त द्विजवळीं॥बैसति गर्दी फाराचे जहाली ॥ जाया आंत न वाट राहिली ॥ तो शोभित बैसुनि अंबारीं ॥ बंधुसह सभें येत सुंदरी॥दण दण धों धों वाजत भेरी ॥ वाद्यघोष होतसे बहू परि ॥ नाचाति वारांगना सुंदरी ॥ जन शृंगारित सौध गोपुरीं ॥ बघुनि आनंदित थाट अंतरीं ॥ काय वर्णु कृष्णास्वरूपासी ॥ देवअंगना दिसती दासी ॥ शामवर्ण सुंदरी सभेसी ॥ पाहुनि जन चकीत मानसीं ॥ भाग्यवान ह्मणती तो ज्यासी ॥ घालि माळ ही बहु गुणराशी ॥ चा० ॥ करिं धरूनी धृष्टद्युम्नें भगिनीला मंडपिं नेली॥१॥

## पद राग भूप ताल त्रिवट.

धृष्टद्युम्न द्रौपदीचा धरूनीया सव्य हस्त॥नेऊनी सभेंत सर्व नृप तीस
र ॥ ध्रु० ॥ दुर्योधन दुःशासन विविंशती विकर्ण ॥ प्रमूख
राष्ट्राचे तैसा कर्ण ॥ शकुनी सौबळ बृहद्बल वृषक

गांधार जाण ॥ चा० ॥ मणिमान भोज अश्वत्थामा दंडधार हा बृहत ॥ १ ॥ बार्धक्षेमी जयत्सेन सूशर्मा सहदेव वीर ॥ सूनामा सूकेतू विराट सूत शंख आणि उत्तर ॥ सूवर्चा सूचित्र नील सूर्यध्वज वृक वीर॥चा०॥ रोचमान सत्यधृती अंशूमान बळीवंत ॥ २ ॥ पौंडूक समुद्रसेन पुत्र तैसा चंद्रसेन ॥ जलसंघ वासूदेव विदंड दंड श्रेणीमान ॥ तांम्रलिप्तक भगदत्त कालिंग शल्य चेकीतान ॥ चा० ॥ रुक्मांगद रुक्मरथ भूरीश्रवा सोमदत्त ॥ ३ ॥ शलभूरी सूदक्षीण बृहद्बल उशीनर ॥ सूशर्म शीबीराजेंद्र कांबोज नृपवर ॥ बळीराम कृष्ण सांब चारुदेष्ण गदाक्रूर ॥ चा० ॥ सात्यकि उद्धव अनीरुद्ध यादव हे आहेत ॥ ४ ॥ शंकू कंक पृथूसेन कृतवर्मा विदूरथ ॥ समीक पृथू चंद्रहास्य अशावह भगीरथ श्रूतायू बृहदक्षेत्र उशिनर जयद्रथ ॥ चा० ॥ बाल्हिक उलुख मेघसंधी चित्रांगद महामत्त ॥ ५ ॥ दुर्विषह सूकूमार वत्सराज नृपनलि॥ मतिमान नृप बोले यंत्र भेदी जो नृपाळ ॥ त्यासीच ही याज्ञसेनी घालील त्वरेनें माळ ॥ चा० ॥ विष्णुदास कांहीं नृप वर्णी तों कर्ण उठत ॥ ६ ॥

### पद राग बागेसरी ताल धुमाळी.

त्वरें मग गर्वें कर्ण उठला ॥ काय वदे धृष्टद्युम्नाला ॥ ध्रु० ॥ माळ आणी माझिच राणी ॥ द्रौपदि जाणी ज्ञानखाणी समज पण हरिला ॥ १ ॥ दशवदनापरि धनु उचलाया करी ॥ मर्मभेदक नोवरी शब्दें मनीं खोंचला ॥ २ ॥

### पद राग झिंझोटी ताल दीपचंदी.

कर्ण जरी यंत्र भेदील तरि मी न वरिन बाई यातें ॥ ध्रु० द्रौपदी बोले हा कुलहीन ॥ न माळ घालिन बाई मी कथितें ॥ १ ॥

### पद राग छायानट ताल त्रिवट.

द्रुपद सभेंत वदे काय तेव्हां ॥ ध्रु० ॥ भार्गवें निःक्षत्रिय धरा केली आतां पण कोण हरिल नृप ह्मणे हाय ! हाय ! ॥ १ ॥

### सा० प० काय करिति कुंतीबाळ:—

ऐकुनि द्रुपदाची ही उक्ती ॥ अर्जुन वंदुनिया धर्माप्रति ॥ मनीं स्मरु-

नेया श्रीलक्ष्मीपति ॥ भीम जिष्णु मंडपीं विराजती ॥ दचकति भूपाळ रे ॥ ३ ॥

॥ ओव्या ॥

विप्रवेषें भीमार्जुन ॥ उभे पाहुनि जिंकाया पण॥हसून सर्व राजे ब्राह्मण ॥ ह्मणती ज्ञानशुन्य त्यां ॥ १ ॥ कोणी ह्मणती ईशकरणी ॥ अगास्ति वामन आणा मनीं ॥ द्विज भार्गव ज्ञानखाणी ॥ काय लहान पराक्रमी ॥ २ ॥ तों विजयें पण जिंकिला ॥ कृष्णा कंठीं घालित माला ॥ किन्नरसुरगण आनंदला ॥ पुष्पें वर्षतीं त्यावरी ॥ ३ ॥

**मा० प० द्रुपद सभेंत:—**

सेनापतिस ह्मणे रक्षि ब्राह्मणांतें करितिल कौरव खल यांतें अपाय ॥ २ ॥

**पद राग झिंजोटी ताल त्रिवट.**

नीतिहनि गर्वे कौरव वदती ॥ ध्रु० ॥ अवचित पण जिंकिला ह्मणून ॥ कन्या विप्रासी देती ॥ १ ॥ नृपयशकीर्ती यांतचि जाती ॥ हरुनि नेउं नोवरीप्रती ॥ २ ॥

**मा० प० काय करिती कुंतीबाळ:—**

धर्मालागी बोले अर्जुन ॥ द्रौपदि रक्षा नकुळा घेऊन ॥ सिद्ध युद्धा भीमासह आपण ॥ विष्णुदास ह्मणे कौरव कोपुन॥करिती काय रे॥४॥

**मा० प० नीतीहीन:—**

द्रुपदा वधून कन्या हरून ॥ विप्रा पचूं न दे ती ॥३॥ जात सभेंतुनि बहुतचि कोपुनि ॥ बाणवृष्टी करीती ॥ ४ ॥

**पद राग भैरव ताल धुमाळी.**

मग भीम कोपून ॥ वेगें वृक्ष उपडून ॥ स्कंधीं घेउनिया मारुं धावला ॥१॥ वृक्षतळिंचे ब्राम्हण॥पडले खालीं ढासळुन॥नाना तऱ्हें बोलती भीमाला ॥ २ ॥ भीम किंवा हनुमान॥कोणी ह्मणे धरी मौन ॥ द्रुप[illegible] येथें दडला ॥ ३ ॥ धनंजय कोपून ॥ हातीं घेउनी बा-

॥ ४ ॥

॥ आर्या. ॥

रे तंव रामा ज्याच्या करिं बाण तोच अर्जून ॥ वृक्ष स्कंधीं
हो वडिल तो तयाहून ॥ १ ॥ अवचित बहु भाग्यानें पु-
दास पाहिले अपुले ॥ हा! हा! दुष्ट कुरूनीं कितितरि यांचे
केले ॥ २ ॥

मा० प० नीतिहीनः—

ा सैनेसह धाउन ॥ मारा ह्मणे विप्रांप्रती ॥ ५ ॥ भीम
॥ कौरवीं आकांत होत ॥ कर्णा पुढें पहाती ॥ ६ ॥
अर्जन ॥ करी शरपर्जन्य ॥ कर्णमति चकित हो ती ॥७॥

मा० प० त्वरें मग गर्वे कर्णः—

किंवा जिष्णुहस्तलाघव॥हें सांग कोणीं शिकविलें तुजला॥२॥

मा० प० मग भीम कोपूनः—

ीलागून ॥ बोले युद्ध सोडून ॥ भलतें पुसशी हें काय मज-
॥ द्रोणदत्त विद्या जाण ॥ दावितों तुजलागून ॥ ऐकुनी हें
फिरला ॥ ६ ॥ इकडे शल्यालागून ॥ भीमें वृक्षें हणून ॥
याशीं सिद्ध जहाला ॥ ७ ॥ शल्यें शूळ मारीला ॥ भीमें
ला ॥ वक्षस्थळीं देत कोपें लाथेला ॥८॥ भीम धर्मा पुसत ॥
या त्वरित ॥ तेणें सोडी ह्मणतां त्यास सोडिला॥९॥मग कौरव
र्व एकवटून ॥ एक योजनावरि तळ दिधला ॥ १० ॥

॥ ओव्या ॥

ी जन एकमेकांत ॥ पांडव हेची होय निश्चित ॥ लाक्षागृहांतू-
त ॥ वाचले सुकृत द्रुपदाचें ॥ १ ॥ इकडे वीर भीमार्जुन ॥
ष्णेस घेऊन ॥ कुलालशाळेजवळ येऊन ॥ बोलती काय
२ ॥

॥ गीत ॥

उत्तम भिक्षा आणिली ॥ बहू प्रयत्नें साध्य जाहली ॥ घ्या बा-
न वदली ॥ माता पुत्रांतें ॥ १ ॥ येउनिया बाहेर पहात ॥

द्रौपदीस, ऐकुन वृत्तांत ॥ ह्मणे बोलले काय अनुचित ॥ अर्जुनपत्नी ती ॥ २ ॥

**घनाक्षरी.**

मातेलागि वदे अर्जुन ॥ नोहे मिथ्या तुझें वचन ॥ आहे तिजसिं वरप्रदान ॥ वरिसि पांच वरां हें ॥ १ ॥ कृष्ण आणि संकर्षण येउनिं कुंति करिति नमन ॥ पांडवांलागी भेटून ॥ वदाति त्यांस काय तें ॥२॥ झाले श्रम बहु तुह्मांस ॥ नोवरि सत्य ही पांचांस॥होइल त्वरित शत्रुनाश॥ देउनि वर निघाले ॥ ३ ॥

**पद राग भैरव ताल एका.**

इकडे धृष्टद्युम्न चिंतातुर हेरां आणुनि काय कथितसे ॥ ध्रु० ॥ द्वीजरूपें पण हरुनि॥नेली भगिनी कुलालसदनीं॥कोण याती शोध करुनि कळवि मज असें ॥ १ ॥

**॥ ओवी ॥**

हेर जाउनि जों पहात ॥ तों युद्धावीण शब्द न आंत ॥ बोलती न कोणीहि पांचांत ॥ येउनि कळवीत धृष्टद्युम्ना ॥ १ ॥

**मा० प० द्रुपद सभेंत:—**

द्रौपदी जिंकूनी पण नेली कोणीं चिंतें मन व्याप्त त्वरें शोधा जाय ॥ २ ॥

**मा० प० इकडे धृष्टद्युम्न:—**

रायासी पुत्र कथित ॥ हेरें कथिलें मजासि वृत्त ॥ युद्धभाषणीं सदा रत वाटे ते पांडवसे ॥ २ ॥

**मा० प० द्रुपद सभेंत:—**

घेउनि सर्व पुरोहित आणी मानें त्यां बहूत धृष्टद्युम्ना कथि राय ॥ ४ ॥

**घनाक्षरी.**

कुलालशाळे धृष्टद्युम्न॥येउनि पांडवां नमून॥राय निरोप त्यां सांगून॥ [illegible]नि चालिला ॥ १ ॥ पांच पंडूकुमर वीर ॥ कुंतीसहित चा- [illegible]हा चालले ॥ २ ॥

॥ ओंव्या ॥

अनेक वस्तू नानापरी ॥ मांडिल्या होत्या मार्गावरी ॥ सुंदर धृष्टद्युम्नें जरी ॥ कौतुकें पाहती ते हत्यारें ॥ १ ॥ वृत्त कळतां हें द्रुपदासी ॥ समजे चतुर काय मानसीं ॥ सत्य क्षत्रिय हे गुणराशी ॥ भूभार हराया पातले ॥ २ ॥ गौरवें सर्वां सभे नेत ॥ भद्रासनीं त्यां बैसवीत ॥ ह्मणे झालों आनंदित॥पाहूनिया तुह्मांसी ॥ ३ ॥ गौरव करी राजपत्नी ॥ कुंतीस नेत अंतःसदनीं ॥ वस्त्राभरणें बहु देऊनी॥चरण नमिती जाहली ॥ ४ ॥ सुहृद आणि पांडवांसहित ॥ नृप आनंदें भोजन करित ॥ तांबूल देऊनि कुशलवृत्त ॥ काय पुसत धर्मातें ॥ ५ ॥

**पद राग यमन ताल त्रिवट.**

पुसत काय द्रुपद पांडवांसी॥बहु आदरें धरुनी विनयासी ॥ध्रु०॥ कोठिल नृपवर कोण याति नामें तैसी कृपा करुनि सांगा आह्मासी॥ १ ॥

**पद राग बिहाग ताल त्रिवट.**

द्रुपदा धर्म कथीत ॥ रमाकांत हो सहाय जया तो ॥ ध्रु० ॥ पंडुनृपति हस्तनापुरीचे ॥ ऐका नामें सुत आह्मी त्यांचे ॥ भीमार्जुनसहदेव हे साचे ॥ मी धर्म नकुल हो तो ॥ १ ॥

**मा० प० पुसत काय:—**

खल कौरव यासी परोपरी मारू ह्मणे नृपसुत धृष्टद्युम्न रायासी ॥ २ ॥

**मा० प० द्रुपदा धर्म:—**

धर्म ह्मणे ऐके द्रुपदाला ॥ मातावचनें तव कन्येला ॥ पांच वर आह्मि पण जरि हरिला ॥ एक्या विजयें तो ॥ २ ॥

॥ गीत ॥

वदता कां तुह्मि असें विपरित ॥ धर्मालागी द्रुपद बोलत ॥ आले तव हरि व्यास सभेंत ॥ राया पुसत तयां ॥ १ ॥ ऐके राया वदला व्यास॥ तव कन्ये पांचदां शिवास ॥ वर मागतां तूं पांचांस ॥ वरिशि असें वदला ॥ २ ॥ न धरि विपरित शंका कांहीं ॥ कन्या अर्पी तूं पांचांही ॥ मानउनी त्या सत्वर बाही ॥ राज पुरोहीता ॥ २ ॥

॥ ओव्या ॥

लग्न झालें पांच वरांशीं॥ राय करी सोहाळ्यासी ॥ अमूप धन देउनि विप्रांसी ॥ आनंद करी अपार ॥ १ ॥ इतुक्यामाजी नारदमुनी ॥ देता झाला नियम करूनी ॥ द्रौपदि एकेकाची पत्नी ॥ दोन महिने बारा दिवस ॥ २ ॥ वस्त्राभरणें दे सर्वांसी॥ गज अश्व धनराशी ॥ पांडव जाती तुष्ट मानसीं ॥ कृष्णेसहित गजपुरा ॥ ३ ॥

## द्रौपदीवस्त्रहरण.

पद राग यमन ताल धुमाळी.

काय झालें पुढतीं महाभारतीं सभापर्वअंतीं ॥ कपटद्यूतपणिं जिंकील्यावरी पांडवांसी ॥ कौरवांनीं ॥ १ ॥ भिष्म द्रोण कर्णसहित कौरव राजे असंख्यात पांडवांतें सभेंत ॥ अति अन्यायें जिंकिति पणीं त्यांसह संपत्तीसी ॥ पापखाणी ॥ २ ॥ स्वघातक मतीहीन खल कुटिल दुर्जन सदा अभिमानीं मग्न ॥ अनर्थकारक काय बोलत तेंव्हां विदुरासी ॥ अज्ञानी ॥ ३ ॥

॥ आर्या ॥

स्मरण न ज्या मरणाचें दुर्योधन वदत काय विदुरासी ॥ पणिं जित आणि सभेसी कृष्णादासी विटंबु जा तिजसी ॥ १ ॥

पद राग [illegible] एका.

[illegible]लु ताल [illegible]

तेंव्हां परम सुज्ञ [illegible] सर्वज्ञ विदुर काय बो[illegible] ॥ जें ऐकुनि सु[illegible] [illegible]ज्ञानी सर्व मनिं आनंदले ॥ ध्रु० ॥ दुर्योधना ऐसें न वद यांत [illegible] काय अपवित्रा वदासि वाणि पापखाणी ॥ कौरवराज्य राजासहित नाश यांत जाणी ॥ चाल ॥ विपरित कर्मानें कैक नाशा पावले ॥ १ ॥

॥ ओव्या ॥

मग विदुरावरी क्रोधाऊन ॥ प्रातिकामी सूता आणुन ॥ वदे त्यास दुर्योधन ॥ आणी सभेंत पांचाळी ॥ १ ॥ भीड न धरी आतां तिची ॥

पणीं जित ती सत्य आमुची ॥ भीती न धरी या पांचांची ॥ धाव वेगें सेवका ॥ १ ॥

**श्लोक वसंततिलका.**

तो प्रातिकामि अवरोधनिं येउनीया॥ बोले भयें द्रुपदजेप्रति वंदुनीया ॥ तूझ्यासहीत हरिलें पणिं पांडवांसी ॥ दुर्योधनें हटकिलें चल गे सभेसी ॥ १ ॥

**पद राग सिंधकाफी ताल एका.**

असें विपरित ऐकुनी ॥ द्रौपदी दचकली मनीं॥मूर्छित होऊनीं पुन्हां सावध पुन्हां पडत मेदिनीं ॥ध्रु०॥ भासे किं खोचली सुरि उरीं ॥ कीं वीज कोसळे अंगावरी ॥ बोल ते वज्रघातापरी ॥ दुःखित फार अंतरीं ॥ धरुनि धीर मनिं परी ॥ बोलत काय सुंदरी ॥ चाल ॥ सूता सत्य होय विटंबीतां मज कौरववंशहानी ॥ १ ॥ पणीं धर्मा जिंकिलें॥ परि मीं पांचां वरिलें ॥ नारदें दिवस वाटिले ॥ भीमाचे दिन हे चालले ॥ पणीं मज न जिंकिलें ॥ असत्य सर्व चाललें ॥ चाल ॥ भीष्म द्रोण सभेंत नेणें रजस्वला रीति ही न हीं जनीं ॥२॥

**॥ ओंवी ॥**

सूत येउनी दुर्योधनाला ॥ ह्मणे द्रौपदी रजस्वला ॥ कैशी आणूं तिज सभेला ॥ दुःश्चिन्ह भासे मजलागीं ॥ १ ॥

**॥ आर्या ॥**

धिक्कारुनि सूताला बोले दुःशासनासि तूं जाय ॥ द्रौपदि ओढुनि आणी पणिं जित ती भिड तिची मला काय ॥ १ ॥ दुर्योधनापरिस खल दुःशासन दुष्ट पातला सदनीं ॥ उठ निघ द्रौपादि बोले किति करिशी बाहणे न मी मानी ॥ २ ॥

**पद राग भीमपलासी ताल धुमाळी.**

अगे चल त्वरें दासी वहात सभेसी सुयोधन तुजला ॥ पणीं जिंकिलें द्रौपदि तुजसह आह्मीं पांडवांला ॥ ध्रु० ॥ सोडुनि पांडवआस धरी सुयोधनास भोगी तूं राज्यसुखाला ॥ हतभागी अज्ञान पांडव आह्मांपुढें दीन भोगूं देत कष्ट त्यांला ॥ तूं सुकुमार वनवासीं दुःख फार

सोडि गे पांच वरांला ॥चाल॥ पांचांसी तूं एकली विपरित नाडलीस किति हे कष्ट तुजला ॥ १ ॥

**पद राग बाहिरवी ताल एका.**

असे दुःशासनाचे शब्द ऐकतां द्रौपदी काय बोले शिव शिव !! या काय अधर्मासि आरंभीलें ॥ ध्रु० ॥ अहा !! देवरा अवधारी सभे नेतां कैशि तरी ॥ ज्येष्ठ सहोदराची नारी तुझां गांधारीपरी ॥ तूंचि माझा कैवारी आलें विघ्न हें निवारी ॥चाल॥ पितियासम तूंची मज ह्मणानि पद धरीलें ॥ १ ॥ हें जरि वाटे अवघड तूज शस्त्रे वधुनि टाकी मज ॥ जगीं कीर्ति मिळेल तूज रक्षितां हि माझि लाज ॥ नाहीं नाहीं त्राता आज येथें तूजवीण मज ॥चा०॥ जोडुनि हस्त पदर पसरी चरण नमीयेले ॥ २ ॥

**॥ आर्या ॥**

निर्दय ताडी लत्ते रडत पळत जाय ती गृहामाजी ॥ दुःशासन धरूनि वदे कोठें गेल्याहि धरिल हा गाजी ॥ १ ॥

**मा० प० अगे चल त्वरें:—**

ओढुन कबरी दुष्टें पाडिली क्षितीवरी श्रीहरीची बहिण ॥ ह्मणे रडातिस कां गे काय न्युन सांगे देऊं तुजलागून ॥ सुयोधन वीर सर्व राजराजेंद्र वरि तूं तयालागुन ॥ चाल ॥ बिदिंतुनि निर्दय दर दर ओढित घेउनि तिजसि चालला ॥ २ ॥

**पद राग भीमपलासी ताल त्रिवट.**

द्रौपदि बोले दुःशासना ओढूं नको मज धरून केशीं ॥ ध्रु० ॥ क्षण धीर धर सावरूंदे चिर ॥ तुटले अलंकार कैशि दया न तुंसी ॥ १ ॥ थांब एक क्षण कासाविस प्राण ॥ तहानें शोषला जाण दीन नमीत तूंसी ॥ २ ॥ द्रोणगुरूचि आण सोडी मजला-गून ॥ मानीतां न भाषण नेत ओढीत तीसी ॥ ३ ॥

**मा० प० अगे चल त्वरें:—**

णित ओढित पाहूनीया तिज सभेंत दुष्टां बहु आनंद झाला ॥
गे ही पांचाळी किती अकरताळी लोळत कैशि त्रिदिला॥

कपटें मीस करि क्षणामध्यें घाबरी॥ काय न शक्य हिजला ॥ चाल ॥ पांच वरीं वरिली आहे परि पूरेल नीच हि कैकांला ॥ ३ ॥

**मा० प० काय झालें:—**

द्रौपदी लावण्यखाणी जिच्या त्या तेजाहुनी ॥ उणा वासरमणी रडत सभास्थानीं ॥ मनीं दचका बसला तेव्हां सूज्ञांसी ॥ पाहूनी ॥ ४ ॥ छळितांचि पांचाळी ब्रह्मांड डळमळी ॥ झाली एक आरोळी ॥ काय अनर्थ ओढवला अशी सर्वांची ॥ भीऊनी ॥ ५ ॥ कौरवेश आनंदीत होउनि मदें उन्मत्त ॥ कर्ण द्रौपदीसी वदत ऐक गे सुंदरी ॥ तूं ज्ञानी ॥ ६ ॥

**॥ आर्या ॥**

कर्ण ह्मणे द्रौपदि गे दुर्योधनअंकिं तूं त्वरें बैस ॥ सोडीं पांडव-आशा भोगी सुख कौरवेश वरि तूंस ॥ १ ॥

**मा० प० असें विपरित:—**

कर्णशब्द हे खोचले ॥ सतिस शोकें व्यापिलें ॥ पांडव तिनें जों पाहिले अधोवदन बैसले ॥ शरिर धरणिं टाकिलें ॥ भीमें गदे पडताळिले॥ ॥ चाल ॥ अमर्यादित भीम क्रोधाउनी बोलत तेक्षणीं ॥ ३ ॥

**पद राग यमनकल्याण ताल त्रिवट.**

काय धर्मा अधर्म हा पाहतोसी ॥ हा भीम असतां सभेंत कौरव विडंबिती पांचालीसी ॥ ध्रु० ॥ गदा सावरित क्रोधें उठला कौरवअंत करायासी ॥ १ ॥

**मा० प० काय झालें:—**

भीमा धर्म बोले पणीं आह्मां जिंकिलें ॥ वचन तें मोडिलें दूषण लागुनि स्वकुलासी ॥ हो सत्य हानी ॥ ४ ॥ चळति मेरू मांदार दि-शा सोडिल मित्र ॥ घडेल हेंही दुष्कर ॥ परि न सोडुं सत्यासी ॥ सज्ञानी ॥ ५ ॥

**मा० प० काय धर्मा:—**

भीम ह्मणे मीं विनविलें नारदबोधस्मरण दिलें न मानुन मुढा

कां खेळलासी ॥ २ ॥ मस्तकीं गदा घालुन दावीतों यमसदम कारण तूंची या विटंबनेसी ॥ ३ ॥

मा० प० काय झालें:—

अवश्य म्हणतां धर्मे ॥ उचलीली गदा भीमें ॥ धाउनी तों पार्थानें॥गदाहस्त आवरूनि वदे भमिासी ॥ विनवूनी ॥ ६ ॥

॥ आर्या. ॥

अर्जुन बोले भीमा आह्मां पंडूसमान हा धर्म ॥ होणार तें चुकेना अवरी कोपा करी न हें कर्म ॥ १ ॥ दिसतें हें सर्व मृषा मृगजलवत् व्यर्थ ऐक सत्य खरें ॥ हरिदासां नोपेक्षी मग ही करितील काय नीच खरें ॥ २ ॥

॥ ओवी ॥

पार्थवचनातें मानून ॥ धर्मरायातें वंदून ॥ बैसे परी क्रोधैंकरुन ॥ तप्तहोउन अग्नीपरी ॥ १ ॥

मा० प० अगे चल त्वरें:—

झाली असतां मूर्छित केश धरुनी ओढति वदत काय तिजला ॥ कपटी जारीणी भ्रष्टे पंचवरांशीं तूं रत करिशि कां रुदनाला ॥ पणीं जित तव वर तुजसह मग आह्मां लाविशी कां तिष्टायाला ॥ चाल ॥ न होतां विटंबना वरी सुयोधना ऐसें दुःशासन वदे तिजला ॥ ४ ॥

मा० प० असें विपरित ऐकुनी:—

भीष्म द्रोणा लक्षुनी ॥ द्रौपदी बोले ते क्षणीं ॥ सत्य कथावें सुज्ञांनीं ॥ जिंकिलें मजासि कां पणीं ॥ काय ही विपारित करणी ॥ आपण सभेते असूनी ॥ चाल ॥ वदा तुम्ही सत्य काय हा अनर्थ बोले तों भीम कोपुनी ॥ ४ ॥

पद राग जिल्हाकाफी ताल धुमाळी.

अहो करावया विटंबना ॥ सभेसि आणिली पांडव ललना ॥ पगिमा पाढिल्या आख्याना ॥ ध्रु० ॥ भिष्म वदे महासती धर्म बोले पणिं शक्य न धर्मगती तुज कथना ॥ १ ॥ मग

बोल द्रोण त्यासी भीड कायसी ॥ राया कां न बोधिसी ऐकुनि हे राग आला विकर्णा ॥ २ ॥

पद राग मल्हार ताल त्रिवट.

गर्जूनीया सभेंत काय विकर्ण बोलला ॥ परिसुनि पांचाळीवचनाला सूज्ञ भीड न ज्याला ॥ ध्रु० ॥ द्रौपदी जे जीत ह्मणती ॥ जळो त्यांची रसना मती ॥ घोर रौरवनर्कीं गती सत्यची त्यांला ॥१॥ अजित ही याज्ञसेनी ॥ त्रिवार वदे निष्टुर वाणी ॥ सत्य साधू यांत कोणी ॥ न निवारायाला ॥२॥ कुलक्षया कारण॥दुष्ट शकुनी आणि कर्ण ॥ तदानुमतें दुर्योधन ॥ हा खुळावला ॥३॥ पांचाळीसी हे गांजीत ॥ कुरुकुल येणें अंत ॥ होईल सत्यची ॥ विष्णुदास वदला ॥ ४ ॥

पद राग भीमपलासी ताल त्रिवट.

[illegible] ऐकुनि काय वदला कर्ण क्रोधें बहुमानी॥ध्रु०॥ कौर[illegible]दी ही जित असुनि ॥ ह्मणसी असत्य ह्मणूनी॥ मारि[illegible]ारिस दुःख होईल सोडिला ह्मणुनी ॥ १ ॥ मूर्खा व्यर्थ डबडसी ॥ श्रेष्ठ वडिलां निंदीसी ॥ काय योग्य न वाटे तुजसी ॥ काय व्यर्थ सत्यपणीं जिंकिली आम्हीं तिजलागूनी ॥ २ ॥ करी दुःशासना नग्न ॥ ऐसें ऐकुनि पांडव दीन ॥ बसती वस्त्राभरणें टाकून ॥ विष्णुदास ह्मणे दुर्योधन काय वदला ते क्षणीं ॥ ३ ॥

पद राग नाट्य ताल दीपचंदी.

अगे द्रौपदी पहा हा नृप श्रेष्ठ दुर्योधन ॥ ध्रु० ॥ जानू उघडि करून बैस अंकीं पट्टराणी तूज करीन ॥ १ ॥ ऐसें ऐकुन भीम फार क्रोधाऊन वदत प्रतिज्ञावचन ॥ २ ॥

पद राग भूपकल्याण ताल त्रिवट.

अरे दुर्योधना मी भीम या गदेंकरूनी फोडुनि तव मांडी घेइन प्राण ॥ ध्रु० ॥ हीच प्रतिज्ञा न घडे माझ्यानीं ॥ तरी प्रसवें शिणविलि कुंतीजननी ॥ आणिन सोमवंशा उणेपण ॥ १ ॥

मा० प० असे दुःशासनाचेः—

अरे खला दुर्योधना होवो कुष्ट झडो रसना ॥ भीम गदा मर्मस्थाना

पडुनि हरिल पंचप्राणा।तुझां अनुयासह जाणे घोर यमयातना ॥
॥ चाल ॥ विष्णुदास ह्मणे अनर्थ कौरवांते ॥ ३ ॥

**मा० प० अगे द्रौपदी**

ऐकुनी कृष्णावचन वदे सुयोधन कांपा : कर्ण ॥ ३ ॥ रागें
दु:शासना वदत क्रोधाउन करि त्वरें हिस न ॥ ४ ॥

**॥ ओवी ॥**

होउनि कृष्णा अती दीन ॥ उपाय नाहीं ह्मणून ॥ आळवी
गोविंदालागून ॥ आर्तस्वरें संकटीं ॥ १ ॥

**पद राग झिंझोटी ताल ट.**

करुणा करा मुरारी ॥ दासीसंकट वारी ॥ पाव बा हरी॥धांवे
पावे झडकरी॥मजला न पाहे दुरी॥ध्रु०॥द्रौपदि बा सभेंत आणुनि
दुर्जन फेडी निरी ॥ मजलान० ॥१॥ मम वर ... ंत
पाहे न अंत तरी ॥ मजलान० ॥ २ ॥ ... री कोपें कर ... दन ॥ पां ॥ किती करिसी ॥ विष्णुदास वदे

**मा० प० अगे चल त्वरें:—**

दु:शासन वदे सति करितां नग्न करिसी कांगे ...
होसी नग्न तैसेंच हें सभास्थान लाज तुज एथें कोठुन ...
ठकपण पातिव्रतेसमान जारिणी रडुन भेकुन ॥ चाल ॥
दीनपालक कां न ये दासीकाजाला ॥ ५ ॥

**पद राग खमाज ताल त्रिवट.**

दासी संकट भारी अन्य कोण निवारी॥तुजवाचूनी हरी ॥ करुणा
करा मुरारी ॥ तूंचा माझा कैवारी ॥ दीनपालक हरी ॥ अनाथास
तारी ॥ ध्रु० ॥ भगीनीस करूं नग्न पाहती हे दुर्जन ॥ जाऊं कोण
शरण ॥ करील लज्जारक्षण ॥ पांडवांचा सहाकारी ॥ २ ॥

**पद राग पिलु ताल दीपचंदी.**

अरे माधवा धाव येई रे ॥ राखी माझी बहिणीची लाज ॥ ध्रु० ॥
दीनपालक हे ब्रीदची गाजे ॥ करिशी सदा भक्तकाज ॥ १ ॥ काय
वर्णावे म्यां तुज पामरें ॥ शेष थकित वाटे लाज ॥ २ ॥ दीन चरणीं
लीन विष्णुदासातें ॥ त्वरें प्रेमामृत पाज ॥ ३ ॥

### सारिकाछंद ताल धुमाळी.

ऐकुनि भगिनीचा हा धांवा ॥ कृपा उपजुनी रमाधवा ॥ येत स-भेंत गुप्त तेधवां ॥ लज्जा राखित भगिनीची ॥ १ ॥ वस्त्रे फेडित जों दुःशासन आंत अनंत साड्या उत्पन्न ॥ वस्त्रढीग पडे नगासमान ॥ पाहुनि जन चक्कीत ॥ २ ॥ फेडितां वस्त्रें दुःशासन ॥ उभा चक्कीत थकून ॥ तों रागाउन भीमसेन ॥ काय वदत तयासी ॥ ३ ॥

### पद राग मालकंस ताल धंमार.

ऐक रे दुःशासना हा भीम करितों काय पण यासी ॥ ध्रु० ॥ मम प्रिया कच त्वां ओढिले ज्या हस्तें छेदिन सत्य रे त्यासी ॥ शिणलीस द्रौपदि कष्ट भोगुन परी सत्य सांगतों तुजसी ॥ चा० ॥ या अधम वक्षस्थळशोणित करूनि पाना बांधिन कबरीसी ॥ १ ॥

---

## पांडवांचा वनवास.

### पद राग काफीजिल्हा ताल धुमाळी.

ऐका सभापर्वअंतीं दुष्टीं कपटद्यूतानें जिंकिल्यावरी पांडवांसी कौ-रवांनीं ॥ ध्रु० ॥ दुर्योधन दुःशासन ॥ कौरव ते सर्व मिळून ॥ देति त्रास पांडवांलागून ॥ दुष्ट वचनें त्यां बोलून ॥ धौम्यमुनी द्रौपदी जाण ॥ निघती ते नगरांतून ॥ घोर वनीं ॥ १ ॥

### ॥ अभंग ॥

पांडव जाती ऐकुनि वनांत ॥ अकांत झाला गजपूरांत ॥ अति बिदिनें होउनि दीन ॥ त्यागुनि सदनें नगरजिन ॥ धर्मा ! धर्मा ! शोकें वदती॥काय सांगा अमुची गती ॥ तुह्मांवीण न राहूं येथें ॥ खल आह्मां गांजीतिल ते ॥ विष्णुदास ह्मणे वनांत ॥आले जन ते बहु धांवत ॥१॥

### श्लोक वसंततिलका.

देखूनि पौरममता मग पांडवांनीं ॥ केला निवास तयिं जान्हविसं-निधानीं ॥ सांगूनि चार सुविचार त्वरें तयांसी ॥ बोले युधिष्ठिर चला आपुल्या गृहांसी ॥ १ ॥

### श्लोक दोधक.

सोडुनि तूज न जाउं कदापी ॥ सांगसि तूं जरि फार तथापी ॥ येउं तुझ्यासह त्रास न देऊं ॥ मेळऊं रानफळें वनिं खाऊं ॥ १ ॥

### ॥ ओवी ॥

विप्रआग्रह देखून ॥ चिंता पडे धर्मालागून ॥ ह्मणे कैसें यांचें पोषण ॥ होईल वनीं मम हस्तें ॥ १ ॥

### पद राग आनंदभैरवी ताल एका.

तेव्हां धौम्य पुरोहीत काय वदत धर्मरायासी ॥ संकटीं स्मरा न दुज्या हरिविणें कोणासि ॥ ध्रु० ॥ ब्राह्मणांचें पोषणार्थ करि तूं सूर्य-आराधन ॥ प्रसन्न होउनि सूर्य पूरवील अमुप अन्न ॥ धर्में स्तवितां सूर्य स्थालि दिधलि प्रसन्न होऊन ॥ चाल ॥ पुजितां जास मनेप्सीत अन्न पुरवि त्यासी ॥ १ ॥

### ॥ आर्या ॥

ती रविदत्त स्थाली पुरवित इच्छेनुरूप अन्नासी ॥ होउनि तृप्त ब्राह्मण शापिति कौरव खलांसि दुष्टांसी ॥ १ ॥

### पद राग देस ताल त्रिवट.

प्रवेशत पांडव काम्यकवनीं सदा रत दास हरीभजनीं ॥ ध्रु० ॥ स्थालींतुनि अन्न न अपेक्षितां निघे द्रौपदी जेविल्यावरी ॥ स्थालि धुऊनी ठेविल्यावरि ॥ सूर्यउदयवीना ॥ नोहे कांहिं प्राप्त पुन्हां तींतूनी ॥ १ ॥

### ॥ ओवी ॥

तंव इकडे कौरवेश्वर ॥ चिंतेमाजी पडे दुःस्तर ॥ ह्मणे विदुरा कांहीं सत्वर ॥ उपाय ॥ सांगे मम दुःखा ॥ १ ॥

### पद राग बिहाग ताल धुमाळी.

कौरवकुल दुर्जनाचें मुळ विषवल्ली धृतराष्ट्र ॥ अतिशय नष्ट वदे दाप भोगीत सो कष्ट ॥ ध्रु० ॥ विदुरा सूज्ञ तूं सर्वज्ञ पडलों चिंतेंत ॥ मनांत ॥ पांडवक्रोधाग्नित जळ-

तिल मम पुत्र हे भासत ॥ वांचावि यांतुनि करी कृपेनें पुत्रांचें हीत ॥चा०॥ह्मणे विदुर तंव धृतराष्ट्राला ऐक माझी गोष्ट ॥ १ ॥

पद राग खमाज ताल त्रिवट.

सत्यप्रियभाषणीं मधुरावाणी काय ॥ विदुर सूज्ञ सर्वज्ञ बोलला ॥ ध्रु० ॥ पुत्रभद्र इच्छिसी जरी तरि ॥ घालि नेउनि धर्मचरणावरी ॥ कृपाकर ठेवावि पुत्रांवरी ॥ ऐकुनि कोप आला अंधाला ॥ २ ॥

मा० प० कौरवकुल:—

विदुरा सत्यचि तूं हितकारी सदा पांडवांचा॥पराक्रम वर्णिशी निशिदिनीं तूं त्यां पांचांचा ॥ हितशत्रू वाटशी गुप्त तूं माझ्या पुत्रांचा ॥ दाऊं नको मज वदन त्वरें जा सेवक हो त्यांचा ॥ विदुरासी बहुत्रास येउनी तेव्हां अंधाचा ॥ पुण्यशलि भेटीसि चाललउनि चरणांचा ॥ चाल ॥ काम्यकवानीं येतांचि पडली पांडवांची गा रडा २ ॥

मा० प० प्रेशत:—

विदुर आला जाणूनि न ह्मणती जाऊं खेळायातें द्यूत ॥ पांचांनीं विदुरास वंदुनी आसनिं बैसउनी ॥ पुसत काय इच्छीत आपलें मनीं ॥ २ ॥

मा० प० सत्यप्रीय:—

बहु मीं बोधिलें धृतराष्ट्रासी ॥ परी मानि न मम वचनासी ॥ न चुके क्षय कौरवकुलासी ॥ वाटत सत्यचि हें हो मजला ॥ २ ॥

॥ ओवी ॥

इकडे रागाऊन विदुर ॥ गेला पाहूनि कुरुवर ॥ होऊनिया चिंतातुर ॥ बोलत काय संजया ॥ १ ॥

॥ आर्या ॥

घातक आम्हां होइल जर विदुर मिळेल धर्मरायाला ॥ बोले अंध तरी तूं आणी जा परत संजया त्याला ॥ १ ॥

पद राग सोरट ताल धुमाळी.

संजय तो तात्काल निघाला ॥ काम्यकवनामाजीं आला ॥ पांडव

पाहुनि नमिती त्याला ॥ तो विदुरा बोले ॥ १ ॥ धृतराष्ट्रें मज पाठविलें ॥ विनउनि तुह्मां बाहीलें ॥ तव विरहें त्या दुःख जाहलें ॥ फारचि रे सखया ॥ २ ॥ ऐकुनि ऐशा वृत्तातें ॥ दुःख होऊनी विदुरातें ॥ पुण्यशील तो नागपुरातें ॥ आला मग परत ॥ ३ ॥

**कटाव.**

संजयासि धृतराष्ट्रानें धाडुनिया विदुरा आणिला ॥ ध्रु० ॥ सुयोधना ही वार्ता कळुन ॥ मनामध्यें अतिदुःखित होउन ॥ ह्मणे विदुर पांडवांलागुन ॥ आणविलि तो मन वळवून ॥ ताताचें, हा घातचि पूर्ण ॥ शकुनि वदे मग तयालागुन ॥ पुन्हां धाडुं वनिं द्यूत खेळुन ॥ अथवा अटवीमाजी गाठुन ॥ चला टाकुं त्यां ठार मारुन ॥ सुयोधन दल सिद्ध करीत ॥ तों तेथें श्री [illegible] ॥ कुरुनाथा उपदेश करीत ॥ ह्मणे तुझा हा पुत्र नि[illegible]उनि सूर्य पू[illegible] कारण वा खाचित ॥ व्यासा मग तो अंध वदत ॥ सुतमोहें मी झाल[illegible] व्याप्त ॥ मुनि कुरुनाथालागी बोलत ॥ मोह नोहे तव समूळ घात ॥ पावन ॥ इंद्र आणि सुरभीवृत्त ॥ धृतराष्ट्रासी क[illegible]थन करीत ॥ जरि तव सुत तूं भद्र इच्छित ॥ असोशिल तरि कार सख्य निच्छित ॥ पांडवांसवें ऐसें सांगत ॥ अंध वदे तंव व्यासालागुन ॥ करा बोध पुत्रांतें जाउन ॥ वदे व्यास मैत्रेय येउन ॥ करिल बोध तब सुतांलागुन ॥ वदुनि असें हो अंतरधान ॥ अवचित करि मैत्रेय आगमन ॥ रायें आदरें त्या सत्कारून ॥ पांडववार्ता तयालागुन ॥ पुसतां मुनि तो बोले वचन ॥ काम्यकवनिं अतिदुःखेंकरून ॥ करिती पांडव कालक्रमण ॥ छळिलें बहु तव पुत्रें त्यांला ॥ असे श्रीहरी सहाय त्यांला ॥ तेणें भीमें किरमिर वधिला ॥ परोपरी कथि सुयोधनाला ॥ परि तो न उत्तर दे त्याला ॥ गर्वें थोपटीत मांडीला ॥ पाहुनि ऋषि हें बहू कोपला ॥ सुयोधना शापिता जाहला ॥ मारिल भीम गदाघायाला ॥ मांडीवरि तव मारिल तुजला ॥ ऐसें वदुनी गुप्त जाहला ॥ चा० ॥ मुनि मैत्रेयाच्या शापें धृतराष्ट्र करित चिंतेला ॥ १ ॥

**पद राग धनाश्री ताल धुमाळी.**

महा संकटिं पांडव स्मरती यादवरायातें ॥ ध्रु० ॥ यादवसह वानिं उग्रसेन ॥ अक्रुर दळसह रेवतिरमण

॥ चा० ॥ शिखंडि कृष्णाबंधू ते ॥ १ ॥ पाहुनि त्यांतें हरि गहिवरला ॥ अर्जुनें केलें शांतवनाला ॥ प्रायश्चित्त ह्मणे देउं कुरूंला ॥ चा० ॥ भेटे बहिणीतें ॥ २ ॥ पांडव करिती सर्वां नमन ॥ द्रुपदजेस वदत श्रीकृष्ण॥कष्ट झाले माये तुजलागुन ॥ सत्यचि कौरवक्षकरून ॥चा०॥ भिजविन क्षितीतें ॥ ३ ॥

## राग झिंजोटी ताल त्रिवट.

दयाघना माझी लाज सर्व तुजलारे ॥ पुरविशि वेळोवेळीं येउन भक्तकाजा रे ॥ १ ॥ धर्म ह्मणे झाल्या उपकारराशी हो ॥ पुरे न ही सर्व धरणि त्या ल्याह्यासी हो ॥ २ ॥ द्रौपादि पंचपुत्र आणुनि धृष्टद्युम्नें हो ॥ नामें सांगूनी घालीत पांडवचरणीं हो ॥३॥ द्रौपदि कृष्णासी पाहूनी गहिवरली हो ॥ दुःखें सद्गदीत होउनि चरणिं लोळली हो ॥४॥ तंव तो वदे ऐके मी कौरवस्त्रीयांतें ॥ रडविन दुःखें बसविन बाळे सत्य राज्यीं तूंतें ॥ ४ ॥ धर्माप्रती हरी वदे द्यूतामाजीं घात ॥ ठावें असूनीया केलें कैसें विपरीत ॥ ५ ॥ जिंकीयेलें दुष्टांनीं ऐकुन द्वारकेस॥ आलों त्वरेनें भेटाया सर्वां तुह्मांस ॥ ६ ॥

## सारिकाछंद ताल धुमाळी.

धर्म वदे श्रीहरीसी ॥ कोठें होतां त्या समयासी ॥ तो वदे शाल्व वधायासी ॥ गेलों होतों तातडीं ॥ १ ॥ शाल्वाख्यान त्यास कथून ॥ अभिमन्यू सुभद्रे घेऊन ॥ येई मग तो द्वारकेलागुन ॥ धृष्टद्युम्न तो काय करी ॥ २ ॥ नकुलस्त्री त्या धृष्टकेतूतें ॥ नेत आपुल्या तो राज्यातें ॥ दुर्घट करी प्रतिज्ञेतें ॥ कीं मारीन द्रोणासी ॥ ३ ॥ शिखंडी करि प्रतिज्ञेतें ॥ कीं मारीन मी गांगेयातें ॥ इकडे पांडव द्वैतवनातें ॥ येउनी भेटती सिद्ध ऋषी ॥ ४ ॥

## ॥ अभंग ॥

पांडव आले द्वैतवनीं॥ रहात ईशातें स्तवूनी ॥ सिद्धचारणिं त्यां पाहूनी ॥ मानें सर्वां पूजित वनीं ॥ मार्कंडेय तेथें आले ॥ नमुनि धर्में त्या पूजीलें ॥ ह्मणे तुह्मां पत्नीसहित॥दुःखी पाहूनी वनांत॥कळवळे मन बहूत ॥ रामस्थिती हो स्मरत ॥ दैव कोणा न ग्राशीत ॥ सुखी व्हाल म्हणे त्वरीत ॥ १ ॥

॥ ओवी ॥

धौम्यासह पांडवास ॥ भेटून ऋषी स्वस्थानास ॥ जातीं पुढें कृष्णा धर्मास ॥ वदत काय एक दिनीं ॥ १ ॥

घनाक्षरी.

किती दिधला कुरूंनि त्रास ॥ पदोपदीं हो आह्मांस ॥ राग कैचा न तुह्मांस ॥ येत आश्चर्य वाटतें ॥ १ ॥ ह्मणे धर्म सत्य त्यजुन ॥ क्रोध न करावा सूज्ञें जाण ॥ ऐकूनि भीमें हें भाषण॥वदत काय धर्मातें ॥२॥

## किरातार्जुनयुद्ध आणि पाशुपतास्त्रप्राप्ति.

पद राग मल्हार ताल दीपचंदी.

वनवासा त्रासूनीया वदे काय तो भीम धर्माप्रती॥होई जें भाषण प्रीयकर अन्य बंधु कुंति द्रौपदिप्रती ॥ ध्रु० ॥ कपटद्यूत खेळूनी अधम शत्रूंनीं आह्मांस जिंकियलें ॥ त्यांशीं सत्यवर्तन काय युद्ध करूनी राज्य घेऊं आपुलें ॥ बलहीना परी वनीं ऐसें हें फिरणें क्षत्रियां न चांगलें ॥चा०॥ कपटरूपें देवादीक हीं वागती आमूचि काय क्षिती ॥ १ ॥

पद राग भूपकल्याण ताल एक्का.

धर्में विपरित बंधुवचन ऐकुनी ॥ शांतवीत मग तयां बोध करूनी ॥ ध्रु० ॥ नकुल सहदेवा भीमा अर्जुना ॥ बा रे दुष्ट हेतु आणु नये मना ॥ पाळावें वीरांनीं सत्यवचना ॥चा०॥ चालविण्याचि लाज आहे हरीलागुनी ॥ १ ॥

मा० प० वनवासा त्रासूनीः—

शत्रूअंत झाल्यावरी विपत्ती कष्ट कांहिं नसे आह्मांला ॥ कांहिं वाट पहावी तरी चतुर्दश वर्षें आहेत नियमाला ॥ जाहलीया काल तोंवरी आमूचा शेष हेतूच राहीला ॥ चा० ॥ न सोसे दुःख हें बाहुबलें आजी मिळऊं राज्याप्रती ॥ २ ॥

मा० प० धर्मे विपरितः—

... तिनें नाश जाहला ॥ संकटींही मी न सोडि सत्याला ॥
... तह्मांला॥चा०॥वाट पाहुं कांहीं काल अर्जुनी॥२॥

**मा० प० वनवासा त्रामूनी:—**

ाचरणाची केवळ करितिल विप्रचि ते स्तूती ॥ जरी ब्राह्मण
तरीच योग्य रे असती ही रीती ॥ पुढें आज्ञात वास
ंणें बहुत कष्टगतीं ॥ चा० ॥ मित्रां साह्य युद्ध शत्रुशीं करणें
वदती ॥ ३ ॥

**मा० प० धर्मं विपरित:—**

णसी तें सत्य जरि असे ॥ स्वस्थ मानसिं मम राहणें नसे॥
आह्मां कोणिही नसे॥चा०॥घोर हीच चिंता वाटते मनीं॥३॥
जलसंध आणि कर्ण ॥ आश्वत्थामा भिष्म शल्य सुयोधन ॥
जे शस्त्रिअस्त्रीं नीपुण॥चा०॥युद्ध करितिल ते प्राण देउनी॥४॥
ीं तें पूर्ण महारथी ॥ जर्जर युद्धीं काळास करिती ॥ यास यु-
वे कोणती ॥ चाल ॥ भीमा चिंता हें वाटे ऐकुनी ॥ ५ ॥

**पद्द राग ललत ताल त्रिवट.**

सत्यवतीनंदन तों संकट जाणूनी पांडवांसी ॥ धीर देत धर्मा
० ॥ भिष्म द्रोण कृप कर्ण अश्वत्थामा दु:शासन ॥ भय वाटे
असती दुर्योधना हे ह्मणून ॥ समरिं पराभव त्यांचा करण्या
ा तूज साधन ॥ धैर्य धरी घे हे मंत्र विद्या प्रतीश्रुतीसी ॥
या विद्यें होइल इंद्रादिक सूरगण तुज दर्शन ॥ तप करितां
ाप्त अस्त्रें होतील दिव्य जाण ॥ दुर्घट अस्त्रें प्राप्तीसाठीं
लोकपालांपासुन ॥ झाला या वनिं वास बहू तूं जाय तुजा
२ ॥

**॥ ओवी ॥**

ाउन व्यास निघाला ॥ विधिसह मंत्र अर्जुनाला ॥ सांगूनि
तपाला ॥ इंद्रकील पर्वतीं ॥ १ ॥

**॥ कटाव ॥**

ळनागें येउनिया अर्जुन करि घोर तपाला ॥ ध्रु० ॥ धर्मासह
ारून ॥ विप्राशिर्वादातें घेउन ॥ निघे पांचालीस विचारून ॥
मग पंचभूतांसी ॥ रक्षा सुर हो तुह्मि जिष्णूसी ॥ अश्वासुनि

[redacted]

तो निघे तीजसी ॥ इकडे सरस्वतीतटासी ॥ पांडव जाती रहावयासी ॥ गंधमादन जिष्णु नगासी ॥ उल्लंघूनि ये हिमालयासी ॥ इंद्रकील पर्वतीं तयासी ॥ मघवा आला भेटायासी ॥ पुसूनि मानस सांगत त्यासी ॥ तपें करी प्रसन्न हरासी ॥ चा० ॥ तुष्ट तो होऊनीया देइल तुज पाशुपताला ॥ १ ॥

### श्लोक चामर.

सव्यसाचिच्या तपेंकरून धुंद त्या दिशा ॥ लोपली रविप्रभा कठीण पाहुनी अशा ॥ बोळे सर्व तापसी मुनी मिळून शंकरा ॥ प्रार्थिती कृपा-करूनि वाचवीच पामरां ॥ १ ॥

### पद राग यमन ताल धुमाळी.

नकरा चिंता ऋषिजन स्वयें जाउन मीं तेथें ॥ पुरवितों त्याच्या मनोरथातें जा स्वस्थळातें ॥ १ ॥ ऋषि बोळउनी पूर्ण तप होतां अर्जू-नाचें ॥ अस्त्र द्यावें ह्मणे पाहूनि सामर्थ्य त्याचें ॥ २ ॥ शंकर किरात वेशें ये इंद्रकीलसानूस ॥ वेष पालटउनि घे सर्वे गण गिरिजेस ॥३॥ दनु-पुत्र मुकनामा दैत्य पाठवी वराहवेषीत ॥ अर्जुन त्वरें बाण मारून त्यास मारीत ॥४॥ किरात बोले कां त्वां माझि पारध वधीली ॥ अर्जुन ह्मणे प्रथम लक्षीलि ह्मणुन मीं वधिली ॥ ५ ॥

### पद राग बिहागडा ताल एका.

छी छी हें वर्तन काय योग्य तापसासी ॥ मृगया हिंसा योग्य आह्मां किरातांसी ॥ ध्रु० ॥ पारधीस माझ्या बाण मारूनि कसा घेसि प्राण ॥ साही आतां माझे बाण पाहतों सामर्थ्यासी ॥ १ ॥

### पद राग दरबारीकानडा ताल धमार.

कोण तूं किरात दुष्टा आलासी या वनीं ॥ अर्जून मी भीडे माझि-समरंगणीं ॥ ध्रु० ॥ तापसवानीं येथें तूं स्त्री समवेत ॥ मम पारधी वधीशी निर्भयमनीं ॥ १ ॥ साही म्हणे मम बाण अर्जुनें मांडुनी ठाण ॥ अघटित शर क्रोधें सोडिले शिवानीं ॥२॥ शस्त्रें अस्त्रें जीं जीं येत शिव सर्व स्वहा करित ॥ पाहूनी चाकित बहू अर्जून मनीं ॥ ३ ॥ रिता जिष्णतेण शंका मनीं येऊन ॥ ह्मणे इंद्र किं गौरिरमण शंका

येत मनीं ॥ ४ ॥ कोपें धनूतें ऊगारी मारितां ते शिवशिरीं ॥ तोंहि भग्न झाल्यावरी धावे वृक्ष घेऊनी ॥ ५ ॥

## घनाक्षरी.

मारितां वृक्षघाय थकुन ॥ पर्वत फेकितां करी चूर्ण ॥ १ ... न अ- टोपे जाणून ॥ मल्लयुद्ध करीत ॥ १ ॥ देति सबळें मुष्टिघाय करित हाय ! हाय ! ॥ न चले थकुनी उपाय ॥ जिष्णु झाला ...नि ॥ २ ॥ शीव येउनि त्याजवळी ॥ कृपाकरें मुख कुर्वाळी ॥ काय इच्छे तुझि या वेळीं ॥ माग तुजसि देइन ॥ ३ ॥ त्रिकाल लिंगपूजाव्रत ॥ असे माझें हो नेमस्त ॥ शेवटिं हाच मम हेत कृपाकरूनि पूरवा ॥ ४ ॥ पूजासाहित्य शिव देत ॥ जिष्णु लिंगार्चन करित ॥ बिल्वदळ जें शिवा हात ॥ किरातशिरीं तें पडे ॥ ५ ॥ पाहुनि ऐसें आश्चर्ययुक्त ॥ ...त न हा भोलानाथ ॥ जाणुनि चरणांतें नमीत ॥ स्तुती करित अ- ...६ ॥ गौरीसह शिव दर्शन ॥ ह्मणे त्वरें विजया देउन ॥ इच्छि- ...य मनांतून ॥ माग त्वरें मजासि तें ॥ ७ ॥

## ॥ कटाव ॥

पाशूपत अर्जुन मागे विनयें त्या पशूपतीसी ॥ ध्रु० ॥ प्रसन्न होउनि भोलानाथें ॥ पाशूपत दिधलें विजयातें ॥ समंत्र ब्रह्मशिरोअस्त्र तें ॥ देउनि सांगे काय तयातें ॥ सोडी पाहुनिया योत्ध्यातें ॥ पात्र ना तरी ब्रह्मांडातें ॥ करिल त्वरें हें संहारातें ॥ आणिक वदला काय तयातें ॥ नर तूं आणि हरि नारायण ॥ बद्रिकाश्रमीं तप दारूण ॥ करूनि झाला जागीं अवतीर्ण ॥ सकल जगाचें करिता पालन ॥ भात्यासह तव धनुष्य बाण ॥ गिळिले होते मायेंकरून ॥ घे हें देतों आनंदून ॥ सदा पावसिल यश कल्याण ॥ कृतज्ञ अर्जुन बहु होऊन ॥ वंदित शिव शंकरालागुन ॥ जात त्यास तो वर देऊन ॥ आले तों भेटाया सुरगण ॥चा०॥ आनंदुनि देते झाले त्यासी मग बहु अस्त्रांसी ॥ १ ॥

## पद राग बिहाग ताल त्रिवट.

यमधर्मे दंड अनिवार्य दिला ॥ मंत्रासह वरूण देत पाशाला ॥ अंतर्ध्यानाख्यास्त्र कुबेर देत ॥ सर्व सूर विजया अशिर्वादीत ॥ इंद्र त्यातें स्वर्गीं येई ह्मणत ॥ देइन तेथें अस्त्रें तुज बहूत ॥ रथासह धाडीन मात-

लीस ॥ त्याशीं वत्सा यावें अमरपूरीस ॥ बोळवीलें विजयें स्वजनें सर्वांसी ॥ जाती देवगंधर्व स्वर्गासी ॥ १ ॥

## स्वर्गलोकीं अर्जुनाचें गमन आणि उर्वशीशाप.

### पद राग भूप ताल त्रिवट.

आला रथसह मातली ॥ विजया न्यावया अमरपुरीसी ॥ ध्रु० ॥ इंद्रकीलनगीं रथ येतां बैसुन विजय त्यांत ॥ वंदूनीया नगनाथा निघे सुर ... ॥ १ ॥ भेटत पंथीं सूर्यचंद्रां पुण्यशील जन जे पात्रा ॥ मानातें पदीं नक्षत्रा ... ध्यानि वंदी तयांसी ॥ २ ॥ ऐरावत द्वारीं झुले इंद्रप्रासादा पाहीलें ॥ मन बहू ... झालें कळलें हें इंद्रासी ॥ ३ ॥ बहु मानें आणि सभेसी प्रेमें अंकीं बसवी त्यासी ॥ अवघ्राणी मस्तकासी पार नसे मोदासी ॥ ४ ॥

### पद राग काफी ताल त्रिवट.

अर्जुन इंद्रसभें आला ॥ ध्रु० ॥ पाहुनि देव त्याला ह्मणती शोभला सुत इंद्राला ॥ कारित आनंदाला ॥ १ ॥

### पद राग बिहाग ताल दीपचंदी.

आनंदें अप्सरा नाचताती ॥ सभेमाजी गाती स्तुती करीती ॥ वीणा टाळ मृदंग वाजविती ॥ सप्त स्वर गंधर्व आलापिती ॥ २ ॥

### ख्याल राग यमन, ध्रुवपदाचा ताल त्रिवट व कडवीं एक्का.

देवादिदेव शचीरमण काय वर्णूं शोभा अहा ! ती ॥ ध्रु० ॥ उर्वशि रंभादि मेनिका नृत्य गाउनि स्तुति कारिताती ॥१॥ भेटला आजी तुह्मासि तुमचा सुत आनंद न माये चित्तीं ॥ २ ॥

### पद राग सूधकल्याण ताल त्रिवट.

इंद्र कीरीटीप्रति काय बोलला हो ॥ प्रेमपाझर अंतःकरणीं येऊनी-हो ॥ध्रु०॥ मुख कुर्वाळूनी बोले पुत्रा बा रे श्रमलासी ॥ घेई प्रसन्न्नी देतों समंत्र अस्त्रांसी ॥ मंत्र विधीयुक्त सांगुने सिद्ध करुनी देता हो ॥ १ ॥

### मा० प० अर्जुन इंद्रसभें:—

उर्वशीगायनें तल्लीन ॥ अर्जुनमन इंद्रें जाणुन ॥ चित्रसेना कथी सभें आणुन ॥ २ ॥ गाननृत्य शिकवि जिष्णूसी ॥ ऐकुनि आज्ञेसी शिकवी तयासी ॥ लज्जित अप्सरा जें ऐकुन मानसीं ॥ ३ ॥

### ॥ ओवी ॥

एके दिनीं अप्सरानृत्य ॥ अर्जुनें पाहुनी सभेंत ॥ झाला वाटूनि कामें व्याप्त ॥ मघवा सांगे चित्रसेना ॥ १ ॥

### मा० प० अर्जुन इंद्रसभें:—

त्वरें जाउनी उर्वशीस ॥ आज रात्रीस जिष्णुशय्येस ॥जाय तीयेस सांग आज्ञेला ॥ ४ ॥ येऊनीया चित्रसेन तिजला ॥ इंद्रआज्ञेला सांगता जाहला ॥ आनंद अप्सरेला होउनी सिद्ध झाली ॥ ५ ॥

### गद्य अलैयाबिलावल ध्रुवपदाचा ताल एका.

मानूनीया इंद्रआज्ञे आनंदीत मनें नटली ॥ त्वरें रूपवती अती उर्वशी निशीं नीघाली॥ध्रु०॥ आकृति अतिरमणीय गौरवर्ण गजशुंडावत् गोंडस हस्त रक्त पाद न[illegible]तिक उच्च सरल भ्रुकुटि धनुवत् आकर्ण नेत्र कज्जल-रक्त बिंब[illegible] द[illegible]यावत् कुर[illegible] उच्च उरस्थल सिंहक[illegible] [illegible]ली ॥ १ ॥ कर्णीं नासिकीं रत्नजडित मौक्तिक[illegible] ॥ [illegible]पें मूद राखडि चंद्रकोर जडित भालीं कुंकुमतिलक[illegible] ॥ [illegible] मेखला अगणित हस्तपादभूषणें रुळत पायीं पैंजण रत्नमु[illegible]गुलीं कंचूकी चिर ल्याली ॥ २ ॥ स्थीर स्थीर चमकत हंसगति [illegible]चल कामयुक्त दृष्टी अल्पहास्य अलक उरस्थितचिर सावरीत मदनें व्याप्त संगमोत्सुक रतिसदृश मूर्ति मनोहर अभिसारिका तरुणी अर्जुन-स्थितअंतरंगी ठुमकत त्वरें पातली ॥ ३ ॥

### पद राग काफीजिल्हा ताल त्रिवट.

एकाएकी अपरात्रीं आगमन उर्वशीचें पाहुनीया चकीत मन अर्जुनाचें झालें ॥ ध्रु० ॥ आसन देऊनी पुसत माये आजी कां हो येणें केलें काय संकट सांगा तुह्मा कोणीं पीडीयेलें ॥ पुरविन इच्छित सांगा मज काय मनामाजी आहे अपरात्रीं कोमल अंगीं श्रम तुह्मा झाले ॥

धन्य भाग्य माये माझें पुत्रा प्रेमें दर्शन दीलें वंदूनीया चरण तीजि उपचार दिले ॥ चाल ॥ वारंवार माय माय शब्द ऐकुन कीरीटीचे हिरमुष्टीत तेव्हां झालें मन उर्वशीचें ॥ १ ॥

### पद राग सिंधकाफी ताल एका.

वदे खिन्नमनें उर्वशी काय अर्जुनासी ॥ध्रु०॥ त्रिभुवनिं अभागी न दुजा तुजसम या सुरूपखाणी ॥ लावण्य मी कामें व्याप्त न कळे हें तुजसी ॥ १ ॥ लुब्ध तुझावरि होऊन धरूनि रतीइच्छेसी ॥ आलें असतां काय माय शब्दें मज बहासी ॥ २ ॥

### पद राग कल्याण ताल एका.

वीरा अर्जुना ओळख मी उर्वशी न वद माय मसी ॥ इंद्रआज्ञें चित्रसेनें धाडिलें या स्थळासी ॥ ध्रु० ॥ आणिक लुब्ध मी तूझ्या स्वरूपासी ॥ पाहुनि तेजोराशी ॥ प्रिया होउनी संगइच्छा मजसि ॥ आलें या ठायासी ॥ नको अव्हेरूं निष्ठूर मानसीं ॥ पदीं लीन दासी ॥ ॥ चाल ॥ स्त्रीइच्छाभंगपाप लागेल हें तुजसी ॥ १ ॥

### मा० प० एकाएकी अर:--

[illegible] माझी सुतीप[illegible]स तू मा[illegible] [illegible]सी ॥ [illegible] सोडी दुष्ट इच्छा अनूचित योग्य न हें तुजसी ॥ कुलवती आ[illegible]तू काय कामें मोहलिसी ॥ पूर्वज माझे जे स्वर्गीमाजी चिर वास टाळ रती ॥ संग त्यांशीं तुझा तूं ह्मणुनी मातेपरी सती ॥ चाल ॥ ऐसें ऐकुनि निष्ठुर वचन मन कोपें उर्वशीचें ॥ २ ॥

### मा० प० वीरा अर्जुना:--

स्वर्गीं श्रेष्ठ जे तपें पुरूवंशी ॥ रमविती आह्मांसि ॥ नाहीं दोष वा यांत लेश त्यांसि ॥ संग करी मजशिं ॥ इंद्रआज्ञेनें आलें या स्थळासि॥ ह्मणे शापितें तूसी ॥ चाल ॥ एक वर्ष नट आणि षंढ जगीं होसी ॥ २ ॥

### मा० प० वदे खिन:--

[illegible]नी उर्वशी गेलि स्वस्थानासी ॥ विष्णुदास ह्मणे चिंता लागे

**॥ ओव्या ॥**

दुःखें शाप उर्वशी देत ॥ अर्जुन इंद्रालागी कथित ॥ इंद्र त्यातें शांतवीत ॥ पुढील वृत्त सांगूनी ॥ १ ॥ एक वर्ष आज्ञातवासीं ॥ क्रमणें असे हो तुह्मांसी ॥ धरून रहा षंढरूपासी ॥गुप्त जगीं अर्जुना ॥ २ ॥ सकल अस्त्रें संपादून ॥ राहे पंच वर्षे अर्जुन ॥ स्वर्गी, धृतराष्ट्रा हें कळुन ॥ दुःखी होत अपार ॥ ३ ॥ एके दिनीं लोमेशमुनी ॥ फिरत ये इंद्रसभेलागुनी ॥ शक्रा अशिर्वाद देऊनी ॥ मनीं होत चकित ॥ ४ ॥

**पद राग कालंगडा ताल दीपचंदी.**

इंद्रा बोलले काय लोमेशऋषी ॥ पुण्यशील तपोनीधी तेजोराशी ॥ ध्रु० ॥ पूजादीक करूनि इंद्रें ऋषीलागि स्तविलें ॥ विजया इंद्रासनिं बघुनि ऋषी चकित जाहले ॥ काय हेतुनें ह्मणे यासि अर्धासन दीधलें ॥ चा० ॥ एकुनि ऋषी प्रश्न सांगे मघवा काय त्यासी ॥ १ ॥

**दा० प० अर्जुन इंद्रसभेंः--**

मानुं नये ऋषी मानव यातें ॥ नरनारायण हे कृष्णार्जुन ॥ ज्यांनीं तपाचरण केलें बद्रिकिं ते ॥ ६ ॥ मम पुत्र हा हो तपें श्रेष्ठ ॥ योद्धा सूभट रणिं न दावि पाठ ॥ भोगिले येणें वनीं बहुतचि कष्ट ॥ ७ ॥ जाउनीया सांगा धर्मरायासी ॥ अर्जुन मजपाशीं कुशल स्वर्गासी ॥ आहे, अस्त्रें दिलीं मीं अनंत त्यासी ॥ ८ ॥ अल्पकाळें येईल भेटीलागुन ॥ आपण जाउन धर्माहातून ॥ विजयप्राप्त्यर्थ करवा तिर्थाटन ॥ ९ ॥

---

## पांडवांची तीर्थयात्रा आणि भीमगर्वपरिहार.

**सारिकाछंद ताल धुमाळी.**

इकडे वनिं बृहदश्वऋषी ॥ येउन भेटले धर्मरायासी ॥ तंव तो वदे काय ऋषीसी ॥ मजसम दुःखी अन्य नसे ॥ ऋषी सांगे युधिष्टिरासी ॥ निषधपती नल कथानकासी ॥ ह्मणे दुःख जैसें तयासी ॥

झालें तैसें तुज नसे ॥ २ ॥ एकाकी तो काननांत ॥ बंधू तूझे तुजसमवेत ॥ विप्र तैसे असंख्यात ॥ पाठीराखा तूज हरी ॥ ३ ॥

॥ गीत ॥

पार्थस्मरण तो युधिष्ठिराला ॥ होउनि करित बहु दुःखाला ॥ ब्रह्मसूत तंव तिथें पातला ॥ पूजित धर्म तया ॥ १ ॥ तीर्थयात्राफल आह्मांतें ॥ सांगा ह्मणतां धर्में त्यातें ॥ पुलस्ति वर्णित त्या महिम्यातें ॥ सांगे नारद ॥ २ ॥

॥ ओवी. ॥

पुढें धौम्यासह राया ॥ जात वनीं अरण्य पहाया ॥ राहतां वस्तीस एके ठाया ॥ ऋषी काय कथीत त्या ॥ १ ॥

मा० प० तेव्हां धौम्य पुरोहीत:—

आतां ऐके हीं तीर्थें ज्यांच्या स्मरणें दोष जाती ॥ मग करितां त्यांचि यात्रा फलप्राप्ति तरी कीती ॥ सांगुनि बहुत महिमा ऋषी स्वस्थळासि जाती ॥ चा० ॥ तों तेथें स्वर्गाहून येत लोमेश ऋषी ॥ २ ॥

॥ आर्या. ॥

पाहुनि लोमेशातें पूजुनि त्या पुसत बंधुवृत्ताला ॥ बोले मुनि मग त्यांतें ऐका देऊनि सर्व चित्ताला ॥ १ ॥

मा० प० इंद्रा बोलले काय:—

आहे परम सुखी धर्मा जिष्णु इंद्रपुरींत ॥ शस्त्रें अस्त्रें दिधलिं इंद्रें तयालागी बहुत ॥ येइल तूज भेटावया कांहीं कालें त्वरीत ॥ चा० ॥ तीर्थयात्रे न्याया तूज शक्रें कथिलें मजसी ॥ २ ॥

कटाव.

ऐकूनि ऋषीवचनाला पांडव ते काय करीती ॥ ध्रु० धर्मराय सेवकांस सांगत ॥ जातों आम्ही यात्रा कारित ॥ गजपुरा जा तुह्मी परत ॥ पुढें वनीं हो कष्ट अपरमित ॥ रहा स्वस्थ हस्तनापुरींत ॥ ऐकुनि सेवक धर्मा वंदित ॥ निघुनि नागपुरासी जात ॥ इकडे पांडव शुचिर्भूत ॥ विप्रऋषीसह यात्रे निघत ॥ नैमिष्यारण्यांतूनी जात ॥

स्नानादी गोमतींत करित ॥ कन्यातीर्थ गौतमीस पहात ॥ प्रयागीं विधिनें कर्म करीत॥ पुढें अगस्तीआश्रमिं जात ॥ चातुर्मास्य तेथें रहात॥ क्रमणुके लोमेश कथीत ॥ आतापीवातापी अद्भूत ॥ कथा, प्रयागमहात्म्य सांगत ॥ चा० ॥ नंदा अपरनंदा वंदूनि पुढें चालती ॥ १ ॥

॥ अभंग ॥

तीर्थयात्रा करितां कष्ट पांडवांसी ॥ संकट देवासी वेळोवेळीं ॥ १ ॥ हेमकूटगिरी कष्टानें चढती ॥ मक्षिका डसती त्यांस फार ॥ २ ॥ वायूच्या वेगानें होत वृक्षपात ॥ मनीं भयाभीत होती सर्व ॥ ३ ॥ कर्मूणूकेलागी शृंगाचें आख्यान ॥ करीत कथन ऋषी धर्मा ॥ ४ ॥ आर्ष्टिषेण याचें आश्रमीं भार्गव ॥ आख्यान पांडव ऐकताती ॥ ५ ॥ विष्णुदास ह्मणे पहातां पर्शराम ॥ पांडव नमन करीती त्या ॥ ६ ॥

पद राग कालंगडा ताल एका.

बहू तीर्थें धर्मासी घडवीत पुण्यऋषी ॥ तोथील महिमा सांगुनि पुनित करी त्यासी ॥ ध्रु० ॥ भार्गवाज्ञा घेऊन करित दक्षिणें गमन ॥ गोदे मार्गीं वंदुन उदधि पहात दक्षिण ॥ अगस्ति नारि तीर्थी स्नानें करूनि येत पावन ॥ चा० ॥ सूपरक्षेत्रासि ॥ १ ॥ पीततीर्थ पाहुनी प्रभास क्षेत्रासी आले॥द्वादश दीन तपें तेथें बहूत पुण्य जोडिलें ॥ तेथें हरि त्यां भेटले नाहीं जिष्णु पाहिलें ॥ चा० ॥ पुसत तयांसी ॥ २ ॥ शोकें विव्हल धर्म ह्मणे अर्जुन स्वर्गालागुन ॥ अस्त्रप्राप्तिस्तव गेला रुदत करी कथन ॥ हरीनें करूनि शांतवन यादवसह नीघुन ॥ चा० ॥ जात द्वारकेसी ॥ ३ ॥ पुढें पयोष्णि वंदून सूर्यरणीं येउन ॥ ऐकत सुकन्या, मांधाताचरित्रें परम पावन ॥ जंतु शिबि अष्टावक्र चरित जात ऐकुन ॥ चा० ॥ सावित्रीवनासी ॥ ४ ॥

॥ अभंग ॥

गंगासंगमासी स्नानाते करूनी ॥ भारद्वाज मुनी वंदीयेला ॥ १ ॥ मैनाकाहुनी ते कष्टें पुढें जाती ॥ गंगाप्रवाह ते सात जेथें ॥ २ ॥ पुढें पहाती तो मार्ग हो कठीण ॥ मनुष्यगमन नसे तेथें ॥ ३ ॥ विष्णुदास ह्मणे धर्म सांगे भीमा ॥ रक्षी प्रीय रामा द्रौपदीतें ॥ ४ ॥

### पद राग यमन ताल धुमाळी.

भीमधर्मादी पांडव कृष्णेसह जात ॥ थकतां बंधु विप्र तो भीम वाहुनी नेत ॥ १ ॥ हळुं हळुं ते गंधमादन उल्लंघीत ॥ नरकासुरचरित्र लोमेश त्यांतें कथीत ॥ २ ॥ पर्दी चालतां द्रौपादि श्रमें मुर्छित होत ॥ सावध करुनि धर्म तो भीमा काय बोलत ॥ ३ ॥ घटोत्कचाचें स्मरण आतां त्वरें करुनी ॥ आम्हांवी येथें नेइल सर्वांपुढें वाहुनी ॥ ४ ॥ स्मरता येउनि ने त्यांसि बद्रिकाश्रमासी ॥ पुढें जान्हवीतीरातें सर्वें जात रहावयासी ॥ ५ ॥ एके दिवशीं झंझावातें झाला अकांत ॥ सहस्रदल स्वर्णकमलें गंगेमधुनि वहात ॥ ६ ॥ पाहुनि द्रौपदी प्रेमें भीमा काय ह्मणत ॥ ऐशीं कमलें पुजावें धर्मीं मज हें वाटत ॥ ७ ॥ पुरविन प्रिये हेत ह्मणुनि भीम शोधूं तीं जात ॥ रक्षाया सर्वां कोणि न ह्मणुनि चिंता करीत ॥ ८ ॥ शोधित वनीं पुष्प गंधानुरोधें जात ॥ गर्जतां वनीं मारुती जाणी भीम आला वनांत ॥ ९ ॥

### पद राग ललत ताल त्रिवट.

मारुतिच्या ध्याना भीमशब्दें विघ्न जाहलें ॥ ध्रु० ॥ बलें गर्वी भीम जाणूनी हें हनुमान ॥ अशक्त वृद्धरूप धरुन ॥ मार्गावरि आडवें पडले ॥ १ ॥

### पद राग मालकंस ताल धमार.

भीम काय बोलला ॥ महाबळकट वीर सुभट प्रीयं जो हरिला ॥ ध्रु० ॥ मर्कटा उठ मार्ग सोडी भीम हा आला ॥ नाहिं तरि फेकितां सद्य मुकसि प्राणाला ॥ १ ॥

### मा० प० मारुतिच्या ध्याना:—

वार्धक्यें थकलों हनुमान ॥ ह्मणे पुच्छ मज उचलें न ॥ जावें त्वां ओलांडून ॥ किंवा ओढी मार्गावरिलें ॥ २ ॥

### मा० प० भीम काय:—

गां हाले न किंचीत ॥ लाजुनीया ह्मणे सांगा

**मा० प० मारुतिच्या ध्याना:—**

भीमा गर्वरहित ॥ पाहुनि बोले हनूमंत ॥ रामदास अंजनिसूत ॥ प्रेमें दोघे भेटले ॥ ३ ॥

**मा० प० भीम काय:—**

राम अवतारिं जें त्वद्रुप दावि मज सखया ॥ दीनबंधु शरण पाहुनि दावि स्वरूपाला ॥ ३ ॥

**मा० प० मारुतिच्या ध्याना:—**

भयें काळा सुटे कंप ॥ ऐसें पाहुनि विराट रूप ॥ भीम आनंदे अमूप ॥ पुढें कपि काय बोले ॥ ४ ॥ तव शत्रूंचा होउनि अंत ॥ सुखी व्हाल तुह्मी त्वरीत ॥ मी ही सहाय तुम्हां निश्चित ॥ वचन ऐसें दीधलें ॥ ५ ॥ स्वर्णकमलें स्थान ॥ सांग कोठें मजलागून ॥ ऐकुनि ऐसें भीमवचन ॥ कपिनें मार्गा दावीले ॥ ६ ॥ प्रेमें दोघेही भेटती ॥ भीमें वंदूनी मारुती ॥ स्वर्णकमलें आणाया तीं ॥ निघे विष्णुदास बोले ॥ ७ ॥

**घनाक्षरी.**

भीम पुढें वनीं पहात ॥ तपोवनांतिल नदींत ॥ स्वर्णकमलें सुशोभीत ॥ कुबेरदूत रक्षित त्यां ॥ १ ॥ भीमें कमलें तोडूं जात ॥ यक्ष त्यास काय वदत ॥ कमलें देव ऋषिस जात ॥ तोडि न जाय माघारा ॥ २ ॥ माझें नांव भिमसेन ॥ धर्मपूजे कमलें जाण ॥ नेतों आड मजलागून ॥ याल तरी मराल ॥ ३ ॥ येतां यक्ष अंगावरी ॥ भीम बहुतां संहारी ॥ कांहीं पळुनि कुबेरनगरीं ॥ सांगती वृत्त तयातें ॥ ४ ॥ स्नान करुनि भीमसेन ॥ बहुत कमलें तोडून ॥ निघे परत तों तिथून ॥ इकडे काय वर्तलें ॥ ५ ॥ उशिर भीमा यावयासी ॥ धर्म चिंता करि मानसीं ॥ निघत तेथुन जावयासी ॥ भीम तों मार्गीं भेटला ॥ ६ ॥ द्रौपदीस कमलें देत ॥ आनंदें धर्मा ती पुजीत॥पुढें अनेक तीर्थें करित ॥ मार्ग क्रमित चालले ॥ ७ ॥ इच्छित मनीं कुबेरस्थान ॥ पहावें निघति ते ह्मणून ॥ तों हो वाणि स्वर्गांतून ॥ फिरा इथुन माघारे ॥ ८ ॥

**॥ साकया ॥**

घटोत्कच तो आज्ञा घेउनि जाई स्वराज्यातें ॥ नाहित पांडव आ-

श्रमिं ऐशा पाहुनिया संधीतें॥१॥ जटासूर तो ब्राह्मणवेषें आश्रमिं गुप्तचि आला ॥ शस्त्रें अस्त्रें पंडुसुतांचीं आणि सती द्रौपदिला ॥ २ ॥ घेउनि जातां मार्गीं भेटे भमिसेन असुरातें ॥ मारुनि त्यातें आनंदानें येत सर्व आश्रमिं ते ॥ १ ॥

**पद राग काफी ताल त्रिवट.**

बद्रिकाश्रमीं पुढें जाती ॥ अटवि श्वेतनगा पाहुनी आनंदती ॥ कांहीं काल सर्व तेथेंच रहाती ॥ १ ॥ गुहां दरे खोरीं गंधमादनीं ॥ वृक्ष पक्षी नाना धातू रत्नखाणी ॥ जाती आर्ष्टिषेणाश्रमीं देखुनी ॥ २ ॥ कांहीं काल रहाती आश्रमीं येउनी॥देती अशिर्वाद सर्वांलागी मुनी ॥ पाहे तों धर्म चमत्कार एके दिनीं ॥ ३ ॥

**॥ ओवी ॥**

झंझावातें एके दिनीं॥बिचित्र फलपुष्पें नदींतुनी ॥ येती वहात हें धर्में पाहुनी ॥ पुसे भीमा कोठुन येती ॥ १ ॥

**मा० प० बद्रिकाश्रमीं:--**

गदा घेउनीया भीम जात ॥ शोधित वनांत राक्षस आड येत ॥ क्रूर उन्मत्त तयांतें मारित ॥ ३ ॥ कळलें हें वृत्त मणीमानासी ॥ येतां तयासी यमसदनासी ॥ धाडी तंव धर्म शोधूं ये भीमासी ॥ ४ ॥ दूतमुखें कुबेरा हें कळलें॥सैन्यसह आले पांडवां पाहीलें ॥ आनंदुनी मनीं काय त्यास बोले ॥ ५ ॥

**कटाव.**

पांडवांसी पाहुनि चित्तीं धनपाल मनीं तोषला ॥ध्रु०॥ प्रेमें भेटे तो सर्वांतें॥ सांगे अर्जुन क्षेम वृत्त तें॥ आहे सुखी ह्मणे इंद्रपुरीतें ॥ आनंदीत देखुनि पूर्वज तें॥येइल सत्वर तुझ्या भेटितें ॥ ह्मणे मित्र तो मणीमान॥ मेला म्हणुनी खेद मनीं न ॥ माना शाप तयालागुन ॥ होता कीं तूं पावसि मरण ॥ पंडूसुत भीमाचे हातुन ॥ प्रसन्न होउन तुह्मांलागुन ॥ देतों वर कीं असुरांपासुन ॥ अणूमात्रही भय वाटे न ॥ चा० ॥ पुसुनिया मग सर्वांतें कुबेर जाय अलकेला ॥ १ ॥

**मा० प० तेव्हां धौम्य:—**

आर्ष्टिषेणपुजन मग धौम्य करवी धर्मकरीं ॥ धरुनि हस्तदाखवीत

त्यास मंद्राचलावरी ॥ पाहुनि सप्तऋषीस्थानें धर्म वंदन करी ॥चा० ॥ मेरुतुंगिं नारायणपद दावि त्यासी ॥ ३ ॥

॥ ओवी ॥

इतुक्यामाजीं अस्त्रसहीत ॥ विजय येउनी धर्मा भेटत ॥ सुयोधना कळुन सर्व वृत्त ॥ मनीं फार दुःखित हो ॥ १ ॥

# दुर्वासभोजन.

॥ अभंग ॥

दूतमुखें ऐशी ऐकुनी या वार्ता ॥ सूर्य सहायकर्ता पांडवांचा ॥१॥
आहे तेणें दिली त्यास एक स्थाली ॥ जी दे योग्य काळीं अन्नामूप ॥२॥
तैसेंच जिष्णूसी अस्त्रें प्राप्त झालीं ॥ सुरांनीं दीधली आनंदूनी ॥ ३ ॥
कळानि सुयोधना मनीं खिन्न झाला ॥ इतुक्यांत आला तो दुर्वास ॥४॥

अंजनीगीत.

सुयोधनें उत्थापुनि मुनिला ॥ पुजनें स्तवनें प्रसन्न केला ॥ होउनि तोषित मुनी बोलिला॥इच्छित वर मागे ॥१॥ ऋषीश्वरा हें मजला द्यावें॥ काम्यकवनिं शिष्यांसह जावें ॥ अपरात्रीं भोजन मागावें ॥ पांडवांपाशीं ॥ २ ॥ सूर्यस्थालिचा असे हा गुण ॥ कृष्णा जेविल्यावरी अन्न ॥ कदा न मिळे स्थालींतून ॥ ह्मणूनि निशिं जावें ॥ ३ ॥

॥ आर्या ॥

अन्न न मिळतां देवा शापुनिया भस्मची करा त्यांसी ॥ सांगुनि ऐसें मुनिला दिधला धाडूनि काम्यकवनासी ॥ १ ॥

पद राग कालंगडा ताल दीपचंदी.

हरीदासांचा छल जे करूं इच्छीती ॥ अंतीं पश्चातापातें पावताती ॥ १ ॥ सुयोधनवचन मान्य करुनी ऋषी ॥ आले शिष्यांसहित काम्यकवनासी ॥ २ ॥ अपरात्रीं पाहुनि पांडव नमिती त्यांसी ॥ वदत दसिभर उपवासी ऋषी ॥ ३ ॥ कृपा करुनी भोजन द्यावें आह्मां स-

वांसी ॥ कालातिक्रम झाला सर्व जातों स्थानासी ॥ ४ ॥ ह्मणे धर्म राय या करुनि स्नानासी ॥ कळुनि वृत द्रौपदि चिंतीत मानसीं ॥ ५ ॥ राहे उभी येऊनीया वृंदावनीं॥संकटीं स्तवीत हरी दीन होउनी ॥ ६ ॥

### पद राग पिलु ताल एका.

या हो भागिनीचा ऐकुनि धावा ॥ त्वरेनें यावें तुह्मी माधवा केशवा ॥ देवादिदेवा तुज बाहे संकटीं ही लीन यादवा श्रीधवा ॥धृ०॥ तुझे दासानूदास आह्मी दीन ॥ शरण जावें कोणास तुह्मावीण ॥ कोण येइल मम करुणा ऐकून ॥ चा० ॥ अभिमान धरवा माधवा ॥ १ ॥ नाहीं घडली तवसेवा ममहातून ॥ भोळा भाव अमूचा जाणून ॥ धावे वाट ही पाहे तव बहिण ॥ चाल ॥ भक्तकाम पूरवा या देवा ॥ २ ॥ ऋषी येतिल ते आतां स्नानें करुन ॥ घालुं कोठिल मी अन्न तया जाण ॥ शापितिल ते आह्मां न मिळतां अन्न ॥ चाल ॥ तारि यांतुनि हे देवा रमाधवा ॥ ३ ॥ सर्व भक्तांची भीड तुला फार ॥ त्यांत आम्ही हीं सहा पामर ॥ विष्णुदास तव चरणिं किंकर ॥ चाल ॥ बट्टा बृदा नसावा यादवा ॥ ४ ॥

॥ ओंवी ॥

जरी अळवी शब्दें दीन॥न ये पाहून जगजीवन ॥ मनीं बहू दुःखित होउन ॥ काय त्यातें वदत ॥ १ ॥

### पद राग झिंझोटी ताल एका.

दीनानाथाचा नाथ हें बृद तूझें रक्षि आह्मां मूरहरी ॥ धृ० ॥ द्रौपदि लघ स्मरुनि पाय ॥ येउनि झडकरी ॥ दासि दीन संकटांत ॥ काढी बाहेरी तरी ॥ १ ॥ राजसुयज्ञांत मला ॥ सावराया कंचुकिला॥ चतुर्भूज करुनि मला ॥ जगीं केली थोरी हरी ॥ २ ॥ फेडितां दुःशासनें वसन ॥ बहिण होइल सभेंत नग्न ॥ केली वस्त्रें पुरऊन ॥ कीर्ति [illegible] ॥ ३ ॥ न हो प्राप्त स्थालितून ॥ रात्रिमाजी किमपि [illegible] येतिल स्नानें करून ॥ वाढूं काय त्यांसी तरी ॥ ४ ॥ [illegible] गनिकरुणा येऊन ॥ विष्णुदास ह्मणे काय॥

**पद राग झिंजोटी ताल त्रिवट.**

कोमल करुणास्वर भागिनीचा ॥ पडतां श्रीहरिचे कानीं ॥ हडबडुनी पोटांत हरीच्या निघे अन्नपात्रा त्यजुनी ॥ १ ॥

**श्लोक शिखरिणी.**

न घे ग्रासा टाकी त्वरित उठला पात्र त्यजुनी ॥ पुसे तों भैमी त्या वदत कुणि गांजीत भागिनी ॥ निघे जाया शौरी खगपतिवरी तो अरुढला ॥ त्वरेनें भक्तांच्या दुरितदहनातें उतरला ॥ १ ॥

**मा० प० कोमल करुणाः—**

सावध हो द्रौपदि मी आलों ॥ वदे हरी तिजलागूनी ॥ उशीर झाला क्षमा करी मज पाहे रागातें त्यजुनी ॥ २ ॥

**॥ अभंग ॥**

पडले हरिशब्द द्रौपदीचे कानीं ॥ घालीत चरणीं दृढ मीठी ॥ १ ॥
मुखीचा तो घाम पदरें पुसीला ॥ ह्मणे श्रम झाले बंधूराया ॥ २ ॥
कुर्वंडी करीतें प्राणाचीच जाण ॥ संकटीं धाऊन आलासी तूं ॥ ३ ॥
विष्णुदास ह्मणे पाहूनी हरीला ॥ कृष्णेलागी आला गहिवर ॥ ४ ॥

**मा० प० कोमल करुणाः—**

तुजला संकट काय सांग मज निवारीन मी एक क्षणीं ॥ न जेवितां उपवासी आलों देइ खावयालागूनी ॥ ३ ॥

**॥ अभंग ॥**

र सहस्र शिष्यांस ॥ घेउनि आला तो दुर्वास ॥ १ ॥ मध्यरात्रीं भो[illegible]ास ॥ मागें घाली संकटास ॥ २ ॥ अशा वेळीं तूजवीण ॥ असे त्राता आह्मां कोण ॥ ३ ॥ नाहीं सत्य देवा अन्न ॥ देउं तूज तरि कोठून ॥ ४ ॥ वारी संकट हें आलें ॥ विष्णुदास ऐसें बोले ॥ ५ ॥

**मा० प० कोमल करुणाः—**

ह्मणे द्रौपदी पाहे स्थालित ॥ मम प्रारब्धें मिळे तरी ॥ स्थांत पाहतां तीस एकचीं पान भाजिचें सांपडत ॥ ४ ॥

॥ ओवी ॥

स्नानास ऋषीतें जाउनी ॥ झाला बहू वेळ ह्मणूनी ॥ धर्म धाडी सहदेवालागुनी ॥ बोलवाया तयांतें ॥ १ ॥

पद राग बाहिरवी ताल दीपचंदी.

कृष्णलीलेनें त्या अद्भुत ॥ न जेवीतां ऋषी तृप्त होत ॥ १ ॥ ह्म- णती कैसें जावें त्या ठायां ॥ गेले श्रम आमुचे सर्व वाया ॥२॥ येऊनी वंदित कृष्णातें ॥ क्षमा करी ह्मणे अन्यायातें ॥ ३ ॥ देउनि वर बंधू- सह धर्मासी॥ऋषी मग स्वस्थानासी जाती॥४॥ हरी पांडवांते शांतवून॥ जाती मग द्वारकेलागून ॥ ५ ॥ चौदा वर्षे भोगुनि वनवास ॥ क्रमाया जाति अज्ञातवास ॥ ६ ॥ विष्णुदास ह्मणे हरिभक्तीचें ॥ ऐका महात्म्य श्रोते सर्व साचें ॥ ७ ॥

---

# वत्सलाहरण आणि परिणय.

पद राग छायानट ताल धुमाळी.

अद्भुत रसयुक्त तें जनांसी ॥ दावाया हो चारित्र ॥ ध्रु० ॥ रचिलें हें वत्सलाहरण आणि विवाह काव्य रुचिर ॥ १ ॥

पद राग कालंगडा ताल धुमाळी.

एकदां पांडव असतां क्षेम नागपुरांत ॥ सुभद्रा माहेरिं येत ॥ १ ॥ एके दिनीं भोजनानंतर आनंदांत ॥ असतां तांबुल खात ॥ २ ॥ वसु- देव देवकि राम सुभद्रा कृष्णनाथ ॥ असती सर्वहि तेथ ॥ ३ ॥ बल- रामस्त्री तों रेवती वत्सला भूषणयुक्त ॥ सुभद्रे पूढें देत ॥ ४ ॥ घे- उनि वामांकीं वत्सला सव्यांकीं स्वसूत ॥ सर्वां काय वदत ॥ ५ हीच नोवरि करावी मन्यू हा मम हेत ॥ सर्वहि मान्य करीत ॥ ६ राजसुयज्ञमत्सरें पुढें कौरवांनीं ॥ कपटद्यूत करूनी ॥ ७ ॥ पांडव राज्यसंपदा घेती पणीं हिरूनी॥धाडित त्यांतें वनीं ॥ ८ ॥ कृष्णा पंच पुत्र ते द्रुपदपुरालागूनी ॥ पांडव देत लाऊनी ॥ ९ ॥ सुभद्रा मन्यूस तैसें विदुरगृहीं धाडूनी ॥ जाती सर्वहि वनीं ॥ १० ॥

॥ ओव्या ॥

पुढें कांहीं कालेंकरूनी ॥ वत्सला उपवर रूपखाणी ॥ होतां रेवती रामालागुनी ॥ बोले काय सुंदरी ॥ १ ॥ कन्या वाग्निश्चयेंकरून ॥ दिधली होती मन्यूलागून ॥ परी दुर्दैवी पांडव दीन ॥ भटकत फिरती वनांतरी ॥ २ ॥ तरी सुयोधनसुत लक्ष्मण ॥ वर सुतेलागी योजुन ॥ पत्र धाडा कुरुनाथालागुन ॥ न कळवितां हरीसी ॥ ३ ॥

श्लोक मालिनी.

श्रवण करुनि रामें बोल ते स्वप्रियेचे ॥ त्वरित लिहुनि धाडी कौरवां पत्र साचें ॥ तव सुत सुगुणी त्या लक्ष्मणा द्यावि कन्या ॥ मम मनिं कुरुनाथा वत्सला योग्य नान्या ॥ १ ॥

श्लोक द्रुतविलंबित.

लिखित सेवक घेउनि पातला ॥ बघुनिया कुरुनाथ अनंदला ॥ शकुनि धाडुन देत इलीकडे ॥ ठरविण्या तिथिनिश्चय तो पुढें ॥ १ ॥

॥ कटाव ॥

कुंकुममंडित तीं लिखितें पाठविलीं बलरामानें ॥ ध्रु० ॥ मुहुर्त माघ शुद्ध पंचमीला ॥ ठरविति परि न सांगतिं हरिला ॥ करिति उभयतां सिद्धतेला ॥ लिहिलीं पत्रें मग सर्वांला ॥ भीष्म द्रोण आणि बहुत ऋषींला ॥ तैसें लिहिलें कीं विदुराला ॥ मम कन्या उपवर वत्सला ॥ देऊं करुनी लक्ष्मणाला ॥ माघ शुद्ध हो पंचमीला ॥ तिथिनिश्चय तो आहे ठरला ॥ तरि घेउनिया सुभद्रेला॥ मन्यूसह तुह्मि या कार्याला॥पत्र देउनी विदुरा दूतें ॥ जावया निघे द्वारकेतें ॥ भेटे मार्गिं सुभद्रा त्यातें॥ पूजित असतां अश्वत्थातें ॥ पुसे काय ओळखुनी त्यातें ॥ कोण्या कार्या आलास येथें ॥ सांगे तो मग सर्व वृत्त तें ॥ चाल ॥ चकीत मानसीं झाली सांगतां वृत्त दूतानें ॥ १ ॥

पद राग अहंग ताल दीपचंदी.

वत्सलापरिणयवृत्त सुभद्रा ऐकूनी ॥ शोकें काय वदत मनीं खिन्न होऊनी ॥ ध्रु० ॥ असुनि ठरली मम पुत्रा नोवरि ती ॥ देत दादा सुयोधनसुता द्रव्या भूलूनी ॥ चाल ॥ होत सत्य आमूची ही फजीती

सर्व जनीं ॥ १ ॥ तूंही कसा वळलासी बा हरी ॥ त्यजिलें जरी आह्म दीनांलागीं सर्व यादवांमीं ॥ चाल ॥ भक्तपाला संकटीं आहा ! आम्हीं असूनी ॥ २ ॥ आजवरी अभिमानचि आमुचा ॥ असुनी कैसें सो-डीसी तूं आतां निष्ठुर मनीं ॥ चाल ॥ कळुनी वृत्त होइल कीं देवा आ-मुचें हसें जनीं ॥ ३ ॥ झाली मानहानी जीवित ठेऊनी ॥ काय फळ धरणीलागीं पडे शोकें बोलूनी ॥ चाल ॥ इतुक्यामाजी मन्यु येत त्वरेनें त्या स्थानीं ॥ ४ ॥

॥ आर्या ॥

येउनि अश्वत्थतळीं कार्ष्णी मुर्छीत देखुनी माते॥सावध करूनि बोले वद संकट काय गे तुला मातें ॥ १॥

पद राग काफी ताल त्रिवट.

माय ह्मणे अभीमन्यु ऐक रे मुला ॥ धु० ॥ जी तुजला नोवरि ठरलि होति वत्सला ॥ पांडव झाले दीन ह्मणुनि लक्ष्मणाला ॥ देति नगीं अपमान आमुचा जहाला ॥ १ ॥ हरिमतावांचूनि रामें निश्चय केला ॥ माघशुक्ल पंचमिचा मुहुर्त योजिला ॥ गेलें गेलें हातिचें रत्न आजि वत्सला ॥ २ ॥

पद राग नाट्य ताल धंमार.

सूभद्रे माते ऐक हरि तो साह्य आह्मांला ॥ बलिभद्रा यादवसह जिंकिन कौरवांला ॥ १ ॥ वत्सला नोवरि हरुनि माते वरिन तीजला॥ पहा धनंजयसुताविक्रमातें सोडि चिंतेला ॥ २ ॥ चल क्षुधा लागलि गृहीं माते जेऊं घाल मला ॥ गृहिं येउन मातेसह विदुरासंगें जेवला ॥ ३ ॥

पद राग जोगी ताल धुमाळी.

बोले प्रेमानें विदुर मन्युसुभद्रेतें ॥ ध्रु० ॥ आलें पत्र आजि रामा-कडुनी कीं यावें तुह्मांस घेउनी ॥ लग्ना द्वारकेलागूनी ॥ अवधि आठ [illegible] ॥ १ ॥ देतों तुह्मांस सिद्ध करूनी ॥ रहिवर जावें त्वरें-
[illegible]गाहनी ॥ वऱ्हाडासवें लग्नातें ॥ २ ॥ न
समारंभ जाऊनी ॥ मातिकुल दिन
णातें ॥ ३ ॥ वंदुनि विदुरातें दो-

घांनीं ॥ कृष्णअर्जुना मनीं स्मरूनी ॥ रथीं उभयतां बैसूनी॥ आडमार्गे चालति ते ॥ ४ ॥

॥ ओंवी. ॥

मार्ग क्रमिती तीन दीन ॥ पुढें लागे निबिड वन॥नाहीं मार्ग आया पाहून ॥ काय करी सौभद्र ॥ १ ॥

पद राग देस ताल एका.

अभिमन्यु मातेसह आला निबिड काननीं ॥ मार्ग पुढें न पाहुनी काय करित कल्याणी ॥ ध्रु० ॥ बाण त्वरें सोडूनी ॥ बहुत वृक्ष छेदूनी ॥ तीन योजनें मार्ग करूनी ॥ जात रथ घेउनी ॥ १ ॥

पद राग काफीजिल्हा ताल दीपचंदी.

गडबड ऐकूनी त्वरें आले धावूनी ॥ रजनीचर त्या स्थानीं ॥ सारथीहीन रथ पाहूनी ॥ १ ॥ क्रोधें धाउनि येत शस्त्रें अगणीत॥ घेउनी हातीं पाहूनी ॥ माता पुत्रा वदे भीऊनी ॥ २ ॥

मा० प० माय ह्मणे:—

बाळा पाहे पर्वतपरी क्रूर राक्षस॥कोण निवारील आजि या संकटास ॥ नोहे लग्न विघ्न आलें उभय प्राणांस ॥ ऐकुनि ऐसें मन्यु शांतवीत मातेला ॥ ३ ॥

मा० प० गडबड ऐकूनीः—

वृक्ष शिळां हातीं घेऊनी माराया ॥ उचलीले ज्यांनीं हस्त ॥ एक्या बाणें कार्ण्णी छेदीत ॥ ३ ॥ येतां कांहीं रथावरी धावूनी ॥ पाडी त्या लोल करूनी ॥ एक तीव्र बाण मारूनी ॥ ४ ॥ भिउनि कांहीं पळती तृण धरूनि दातीं ॥ येती रडत धावूनी ॥ घटोत्कच होता ज्या स्थानीं ॥ ५ ॥ गडबड ऐकूनी पाहे जों उठूनी ॥ घटोत्कच निद्रेतूनी ॥ सांगति वृत्त हेर त्यालागूनी ॥ ६ ॥ एक स्त्री सहवीर ॥ रथीं बैसुनी फार ॥ छेदूनि वन बहू वीर ॥ मारीले हो चला सत्वर ॥ ७ ॥

पद राग सोरट ताल धुमाळी.

घटोत्कचास ऐकुन कोप आला ॥ धृतकवचास्त्रें येउन भेटे मातेला ॥ १ ॥

**मा० प० गडबड ऐकूनीः—**

संग्रामासी सिद्ध पाहूनिया पुत्रा ॥ कोण शत्रू आला पुसत ॥ घटोत्कच तीस काय कथीत ॥ ८ ॥

**मा० प० घटोत्कचास ऐकूनः—**

कोणी वीर नेणे परी धरणी भार ॥ हारावया वाटे झाला कृष्णअवतार ॥ २ ॥ हरी आह्मां साह्य आहे परोपरी ॥ जिंकावया त्यास जातों माते लवकरी ॥ ३ ॥

**मा० प० गडबड ऐकूनीः—**

हिडंबी बोले पुत्रा तव युद्धीं विपरीत ॥ झाल्या कैसें होइल श्रूत सांगे कांहीं खूण या स्थानांत ॥ ९ ॥

**मा० प० घटोत्कचास ऐकुनः—**

हा पुढिल ताडवृक्ष मोडेल जरी ॥ तरी संकट जाण मजलागी समरीं ॥ ४ ॥ सांगूनिया ऐसें येत वनांतरीं ॥ शत्रूसी पाहूनी घोर गर्जना करी ॥ ५ ॥

**मा० प० अभिमन्यु मातेसहः—**

शत्रु सरले मानुनी मनीं ॥ राहत स्थीर जों त्या स्थानीं ॥ शिळा प्रचंड आलि वरुनि ॥ निवारी बाणेंकरूनी ॥ २ ॥ आले क्रूर तों धाऊनी ॥ आरडत राक्षस पाहूनी ॥ बैसे रथीं सावरूनी ॥ धनुस बाण जोडुनी ॥ ३ ॥ माते सावध रहा ह्मणत ॥ यांस मारितों क्षणांत ॥ घटोत्कच तों ये त्वरीत ॥ वर्षाव करित स्यंदनीं ॥ ४ ॥

**मा० प० घटोत्कचास ऐकुनः—**

वृक्ष फेकी तोही अभीमन्यु छेदीत ॥ अनिवार बाण घटोत्कच प्रेरीत ॥ ६ ॥ एकही न पोचूं देतां रथापर्यंत ॥ मध्येंच मन्यु सर्व वेगें तोडीत ॥ ७ ॥ शाबास शाबास घटोत्कच म्हणत ॥ मिळुनी राक्षस सर्व गर्दी करीत ॥ ८ ॥ घटोत्कचबाणें मन्यु मूर्छित होत ॥ पाहूनी सुभद्रा बहू शोक करीत ॥ ९ ॥

**मा० प० माय ह्मणेः—**

राजवरी॥ निवारील अन्य कोण तुजविणें

री ॥ काय करूं एकली मी या वनांतरीं ॥ सद्गदीत होउनि सती
ार्थि अंबेला ॥ ३ ॥

पद राग बिहाग ताल त्रिवट.

जगदंबे पाव गे ॥ भक्तवत्सल तूं असूरनिधनी ॥ ध्रु० ॥ माहीं
ुजविण आह्मांलागुनी ॥ संकटहर्ती अन्यहि कोणी ॥ प्रार्थीतें तुज
ीन होउनी ॥ अंबीके धांव गे ॥ १ ॥

॥ ओवी ॥

ऐकूनि सुभद्रेचें स्तवन ॥ देवी तेथें प्रगट होउन ॥ काय संकट
ुजलागून ॥ सांग ह्मणे निवारितें ॥ १ ॥

मा० प० जगदंबे पाव गेः—

ुमरीं देवी मम नंदना ॥ लागुनि शर ये तया मूर्छना ॥ उठउनि करि
ाम पूर्ण कामना ॥ तुजला मी नमितें गे ॥ २ ॥

॥ ओवी ॥

सुधापात्रांतरीं देवी ॥ सुभद्रेचा हस्त बुडवी ॥ पुत्रमुखा ह्मणे लावी॥
होईल सावध निश्चित ॥ १ ॥

घनाक्षरी.

घालितां मुखीं अमृतहस्त ॥ अभीमन्यु सावध होत ॥ सज्ज होउनी
त्वरीत ॥ इंद्रअस्त्र प्रेरिलें ॥ १ ॥ येतां पाहुनि इंद्रअस्त्र ॥ घटोत्कच
भग्न करित ॥ परी शकल तें किंचीत ॥ लागुनि पडे मूर्छित ॥ २ ॥

॥ ओवी ॥

होतां सर्व शत्रूअंत ॥ सुभद्रामन्यू सारसीं येत ॥ स्नानें करूनी फ-
लाहार करीत ॥ तों इकडे काय वर्तलें ॥ १ ॥

पद राग भूपकल्याण ताल अर्धधमार.

पाहुनि भूमिस ताड वृक्ष उन्मळुनि पडला ॥ पुत्रघात हिडिंबि जा-
णुनि आलि वनाला ॥ १ ॥ मांडिवरी घेउनि पुत्रा करित शोकासी ॥
ह्मणे वीरा भीमकुमरा रणीं पडलासी ॥ २ ॥ असुनि विक्रमि बालहस्तें

कसा मेलासी ॥ ऐकुनी हें शोक होइल पंडुकुमरांसी ॥ ३ ॥ पांडवांचा साह्यकारी पुढें तूं ऐसी ॥ भाक अनृत करुनि स्वर्गीं गेलासी कैसी ॥ ४ ॥ कोठुनी आलासि काळा वदे मन्यूसी ॥ हरीभक्त पांडवांचा वैरि मज दिसशी ॥ ५ ॥

**मा० प० माय ह्मणे:—**

हिडंबीशोक ऐकुनि माय वदे मन्युसी ॥ शोध करी बाळा वीर वाटे हा मजसी ॥ पांडवांचा आप्त कोणी पूस जा तिजसी ॥ सुह्रद आमुचा असेल तरि हा घात जाहला ॥ ४ ॥

**मा० प० अभिमन्यु मातेसह:—**

रथ संनिध नेऊनी ॥ पुसे राक्षसीलागूनी ॥ कोण भीमार्जून वनीं ॥ वह्रासी कां त्यांलागुनी ॥५॥ काय त्यांचें तुझें नातें ॥ सांग त्वरितचि तूं मातें ॥ कथिशि जरी अनृतातें ॥ मारिन बोले कोपुनी ॥ ६ ॥

**मा० प० पाहुनि भूमिस:—**

अरे पोरा अरे दुष्टा उभयनरर्डींचा ॥ घोट घेतें सांग आदि वृत्तांत रे तुमचा ॥ ६ ॥

**मा० प० अभिमन्यु मातेसह:—**

मी गे होय विजयपुत्र ॥ माय माझि ही पवित्र ॥ भीमधर्मादीक छात्र ॥ पितृव्य माझे गे जाणी ॥ ७ ॥

**मा० प० पाहुनि भूमिस:—**

ऐकुनि वृत्त आनंदीत हिडंबि भेटीसी ॥ धाउनि येतां बोले मन्यु तूं कोण सांग मसी ॥ ७ ॥

**॥ ओवी ॥**

शपथ देऊनिया कोण ॥ त्वरें सांग मजलागून ॥ नाहीं तरी बाणें करुन ॥ धाडीन तूंतें यमधामा ॥ १ ॥

**मा० प० पाहुनि भूमिस:—**

[illegible] आमाच ता हिडंबि ह्मणाती मला ॥ घटोत्कच हा पुत्र मा-

र्गी जो मेला ॥ ८ ॥ वधुनि बंधुस देशि उत्तर काय धर्मासी ॥
होइल ऐकुनी हें किती रे त्यासी ॥ ९ ॥

॥ साक्या ॥

ुडंबीचें वचन ऐकतां मातेसी सुत बोले ॥ बंधू माझा असुनी या
धर्में युद्धीं वधिलें ॥ १ ॥ ज्या हस्तें त्वां मला उठविलें माते त्या
ं ॥ उठउनि काकीलागि भेटवी याला आनंदानें ॥ २ ॥

॥ ओव्या ॥

ुभद्रा वदे हिडंबीसी ॥ याची भीती वाटे मजसी ॥ दडपून धरी
तें त्यासी ॥ हिडंबी पुत्रा धरीत ॥ १ ॥ घालितां हस्तमुखांत ॥
होऊनि त्वरीत ॥ युद्धासी जों सिद्ध होत ॥ हिडंबी काय
ाया ॥ २ ॥

मा० प० पाहुनि भूमिस:--

ुत्रा कोणासह युद्ध तूं करिशी ॥ काकि तुझि ही बंधु हा रे भेट तूं
॥ १० ॥ आनंदीत ऐकुनी मनीं वृत्त तो झाला ॥ वंदुनीया सु-
बंधु भेटला ॥ ११ ॥

मा० प० घटोत्कचास ऐकुन:—

सुभद्रेसि आडमार्गानें वनीं ॥ जातां कोठें सांगा त्वरें मज-
नी ॥ १० ॥

पद राग परज ताल त्रिवट.

ुभद्रा काय वदली ॥ ध्रु० ॥ घटोत्कचा रे बळिरामकन्या वत्सला
मन्यूसी प्रथम निश्चित असुनी आतां सुयोधनसुता योजीली ॥१॥
हरूनी सत्वर असुरविवाह करूं जातां विघ्नें या हानि जहाली॥२॥
र मुहूर्त कैंची कार्यसिद्धी होईल ही द्वारका बहु दूर राहिली ॥३॥

मा० प० घटोत्कचास ऐकून:--

ा चार दीन अवधी मुहुर्ताला ॥ राक्षसीकपटें नेइन कार्यसिद्धी
॥ ११ ॥ चला रहा एक दीन माझे गृहाला ॥ क्षणांत पोहोंचविन
द्वारकेला ॥ १२ ॥ बलीवाक्य मानऊनी मग सतीला ॥ जानी

सर्व मिळूनीया त्याच्या सदनाला ॥ १३ ॥ ऊपचार दे पुसे पांडववृत्ता-ला ॥ दुःखीत सुभद्रा सर्व सांगत त्याला ॥ १४ ॥

**मा० प० सुभद्रा कायः—**

कपटद्यूत वस्त्राहरणादिक दुःखें सांगुनी बहू गहिवरली ॥ ४ ॥ सांग ह्मणे दुर्दिन जाउनीया हे पुढें पाऊं काय सुख कधीं काळीं ॥ ५ ॥

**मा० प० घटोत्कचास ऐकुनः—**

घटोत्कच ह्मणे दुष्ट कौरवांला ॥ कां नाहीं मारिलें त्या वेळींच बोला ॥ १५ ॥ कळविलें असतें त्या समयीं मला ॥ रगडिलें असतें घालू-नीया दाढेला ॥ १६ ॥

**मा० प० सुभद्रा कायः—**

विक्रमी वीर ते सर्व आहेत परी त्रयोदश वर्षे वचनीं गुंतलीं ॥ ६ ॥ पण तो संपल्यावरी राज्यप्राप्तिस्तव जिंकू विष्णुदास ह्मणे सति वदली॥७॥

**॥ ओव्या ॥**

कुशलवृत्त झाल्यावरी ॥ ह्मणे सुभद्रा कार्य करी ॥ चिंता आहे मनां-तरीं ॥ माझ्या बाळा अपार ॥ १ ॥

**॥ कटाव ॥**

ऐकुनी सुभद्रावचन घटोत्कच काय करीत ॥ ध्रु० ॥ ह्मणे रहा तूं येथें स्वस्थ ॥ मेले मम दल रणांगणांत ॥ कारितां बाहतों मामा त्वरित॥ कार्य सिद्धीलागी मदत ॥ त्वरें करूनि पर्वतीं जात ॥ जांगिल मामा दलसह बाहत ॥ एक सहस्र ये असुरांसहित ॥ कां; बाहिलें हेडंबिस पुसत ॥ सर्व वृत्त हेडंबी कथित ॥ चाल ॥ घेउनिया मन्युसुभद्रे दल-सह द्वारके येत ॥ १ ॥

**घनाक्षरी.**

घटोत्कच सुभद्रेस ॥ ह्मणे कैचें नोवरीस ॥ हरूं पुसल्यावीण ह-रिस ॥ तैशी जाया अडचण ॥ १ ॥ द्वारकेभोंवतीं सुदर्शन ॥ येरी म्हणे हरिची आण ॥ घाली जाय वेगेंकरून ॥ पत्र दे हें हरीसी ॥२॥

**ाल कटाव पुढें चालूः—**

[illegible] नगरीं वेश घेउन ॥ श्रीहरीसी

पत्र देउन ॥ वृत्त सर्व मग तयालागुन ॥ सांगत; हरी मग पत्र वाचुन॥ मन्युसुभद्रे तेथें ठेऊन ॥ म्हणे हरुनि न्या कन्येलागुन ॥ कांहीं तरि हो कपट करून ॥ सहाय आहे मी तुह्मांलागुन ॥ सुभद्रेस येउनी त्व॰ रीत ॥ वृत्त सर्व ते दोघे सांगत ॥ लाउं लग्न येथेंच निश्चित ॥ चाल॥ सांगे मज काय त्वरीत तुज हवें तें साहित्य॥ऐकुनी सुभद्रावचन० ॥२॥

॥ ओवी ॥

सुभद्रा घटोत्कचालागुन ॥ वदे वस्त्रपात्र धान्य ॥ दागिनेही तैसें धन ॥ सर्व कांहीं पाहिजे ॥ १ ॥

मा० कटाव पुढें चालूः—

वदे जांगळी घटोत्कचासी ॥ मार्गामार्जीं वऱ्हाड्यांसी ॥ विघ्न करूं या कौरवांसी ॥ मारुनि आणूं साहित्यासी ॥ तंव तो बोले काय तयासी ॥ भिष्म द्रोण हे ततूसहायासी ॥ अनुचित कर्में फजीतीसी ॥ पावसील रागतों तूजसी॥युक्ती मायावी बहु खाशी ॥ एक कोस द्वारकेपासुन ॥ मायेचा बाजार करून ॥ जिन्नसपान्नस राक्षस होउन ॥ रामाचीं आज्ञा त्यां सांगुन ॥ द्यावें नवें वऱ्हाड्यांलागुन॥घ्यावें जुनें तयांपासुन ॥ युक्ती मामा पसंत पडुन ॥ चाल ॥ जाती ते सर्व हराया धनधान्यादिक साहित्य ॥ ऐकुनी० ॥ ३ ॥

पद राग कालंगडा ताल धुमाळी.

मायेचा बाजार राक्षसी मायेचा बाजार ॥ ध्रु० ॥ शोभे कमी अमरावती ॥ दुकानें थाटली सर्व तीं ॥ शेट महाजन अनेक जाती ॥ सर्वहि होती निशाचर ॥ १ ॥ जिन्नस झाले नक्तंचर ॥ कांहीं होती दुकानदार ॥ कोतवालही चावडिवर ॥ झाले कांहीं चौकीदार ॥ २ ॥

पद राग जोगी ताल धुमाळी.

आले हस्तनापुराहून कौरववऱ्हाड हो ॥ ध्रु० ॥ सुयोधन तो थाटमाटसह नगरासंनिध आला ॥ मायेचा बाजार पाहुनी आश्चर्या पावला ॥ १ ॥ मायावी अधिकारी तेथिल भेटीकारितां आला ॥ ह्मणे रामें पेंठ वसविली देतों नवें जुन्याला ॥ २ ॥ राजा देइल सर्वांहि मोल आमुच्या हो जिनसांचें ॥ आह्मास आज्ञा कीं करावे पूर्ण मनोरथ तुमचे

॥ ३ ॥ स्तुति रामाची गाउनि सर्वहि उचलिति नवें हवे तें ॥ जुनें टाकिती त्यांच्या पदरीं पावति संतोषातें ॥ ४ ॥

**पद राग कालंगडा ताल धुमाळी.**

घेती नवें सर्व देऊन जुनें त्यांसी ॥ ध्रु० ॥ अलंकार बहु मौल्यवान॥ घेती मायावी देऊन ॥ वस्त्रेपात्रें देती छान ॥ आवडुनि मायावी त्यांसी ॥ १ ॥ हत्ती घोडे बहु सुंदर ॥ बदलति स्त्रिया वेडे जार ॥ पालख्या मेणे अमुल्य फार ॥ बदलुनि घेती नव्यांसी ॥२॥ लेउनि नव्या चिजा थाटानें ॥ निघती रमत रमत रस्त्यानें ॥ धाडिति निरोप तो बहुमानें ॥ दूतांसह बलरामासी ॥ ३ ॥

**॥ ओव्या ॥**

सीमांतपूजा करावयास ॥ घेऊनि सर्व यादवांस ॥ न घेतां श्रीकृष्णास ॥ राम आला भेटीसी ॥ १ ॥ हरी म्हणे बरवें झालें॥ कार्यसाधू आह्मी मोकळे ॥ मनामाजी आनंदले ॥ इकडे काय वर्ते तों ॥ २ ॥ सर्व वऱ्हाडी नगरांत ॥ नेऊनि राम उतरवीत ॥ इकडे घटोत्कच मामासहीत ॥ स्त्रीरूपें जा रेवतीकडे ॥ ३ ॥

**॥ गीत ॥**

पाहुनि सुरूप दोन स्त्रियांतें ॥ चाकित रेवति मानसीं ते ॥ मानें उत्थापून तयांतें ॥ कोण तुह्मी पुसत ॥ १ ॥ भानुमतिच्या आम्ही दासी ॥ जडित भूषणें नोवरीसी ॥ न्यूनाधिक ती करावयासी ॥ क्षणभर मुलीस द्या ॥ २ ॥ मंजु भाषणें तीस मोहुन ॥ निघती नोवरीलागि घेऊन ॥ त्वरें सुभद्रेसंनिध येउन ॥ ह्मणती कार्य करा ॥ ३ ॥

**॥ ओवी ॥**

इकडे श्रीकृष्णमंदिरीं ॥ नारदमुनी काय करी ॥ अवचित मध्यें टाळी मारी ॥ पाहूनी कृष्ण चाकित ॥ १ ॥ कृष्ण पुसे मुनिवर्या ॥ पिटली टाळी तुह्मी कासया ॥ तंव तो वदे सुरवर्या ॥ सौभद्रवत्सला लग्न झालें ॥ २ ॥

**॥ आर्या ॥**

प्रवेश घेऊन ॥ येउन रेवतिपाशीं

खाया मागे तिलाहि विनवून ॥ १ ॥ नेतांचि पाकशाळीं गपगप तें सर्व अन्न भाक्षियलें ॥ होउनि चक्कित जननी लग्ना तिज मग सभेंत आडियलें ॥ २ ॥

पद राग पिलु ताल त्रिवट.

लग्नमंडपीं जिकडे तिकडे नरनारींची गर्दी झाली ॥ ध्रु० ॥ सज्ज करूनिया नोवरिलागीं वरापुढें जों उभी केली ॥ १ ॥ न कळत कोणां चिमटे घेउनि भयंकर दावित वाकोली ॥ २ ॥ भिउनी वर कांपत मोठ्यानें रडत रडत फोडी किंकाळी ॥ ३ ॥ नव्हे नोवरी भूत ह्मणत हें माराया जों धांवे मंडळी ॥ ४ ॥ मायावी सर्वहि जिन्नस ते राक्षस होउनि करिति धुमाळी ॥ ५ ॥ मानहानि बहु होउनिया कुरुमंडळि चोहींकडे फांकली ॥ ६ ॥ विष्णुदास म्हणे हरिचि कपटकृति बलरामाला सर्वहि कळली ॥ ७ ॥

॥ ओंव्या ॥

पुढें राम हरीकडे जात ॥ काय घोर हा अनर्थ ह्मणत ॥ नोवरी नेली झाला घात ॥ पुढें काय करावें ॥ १ ॥ हसूनीया हरी वदत ॥ अघटित आहे ईशसूत्र ॥ सौभद्र झाला जामात ॥ नारदमुखें ऐकतों ॥ २ ॥

पद राग बाहिरवी ताल दीपचंदी.

बलराम वदे कृष्णासी ॥ कृष्ण तूझें हें कळलें मजसी ॥ ध्रु० ॥ असो आतां जाउनी त्यांसी ॥ त्वरें आणी या ठायासी ॥ १ ॥ यादवांसह जाऊनी हरिनें ॥ सुभद्रामन्यु आणीलीं मानें ॥ २ ॥ आनंदानें सोहळा करीत ॥ गज अश्व अमुप धन देत ॥ हरीइच्छा म्हणे विष्णुदास ॥ बहु आश्चर्यें जाय तडीस ॥ ४ ॥

---

# विराटपर्वांतील कीचकवध.

पद राग पिलु ताल दीपचंदी.

वनपर्व संपल्या पुढें सभाजन आयका काय केलें पांडवांनीं ॥ध्रु०॥

अज्ञात वास क्रमावा कोठें ह्मणुनी ॥ चिंतीत सर्वही मनीं ॥ १ जुनें धौम्यपुरोहीता संकट सांगती ॥ विष्णुदासचरण नमुनी ॥ २ ॥

### श्लोक वसंततिलका.

तो सूज्ञ धौम्य वदला मग पांडवांला ॥ आहेत यक्षवर योग्याह्नि गोपनाला ॥ जावें विराटसदनींच रहावयाला ॥ अज्ञासवासिं नच याल प्रसिद्धतेला ॥ १ ॥

### ॥ कटाव ॥

पंडूसुत धौम्यविचारें स्वनामें पालटती तीं ॥ ध्रु० ॥ धर्म ह्मणे होइन कंकभट ॥ नाम बल्लव घे भीम अचाट॥जिष्णु नाम घेतसे बृहन्नड॥ नामें ग्रांथिक नकुळ मी प्रगट॥तंतिपाळ सहदेव हो बळकट ॥ चा० ॥ द्रौपदी ती सुरूपखाणी सैरंध्री नामा घेती ॥ १ ॥ कंक ह्मणे मी राया तोषविन ॥ करूनि युता समयोचित भाषण ॥ बल्लव ह्मणे मी पाक करीन ॥ वदे बृहन्नड गानें रंजविन ॥ ग्रंथिक बोले अश्वां फेरिन ॥ चा० ॥ तंतिपाळ वदला धौम्या जाणे गोरक्षणरीती ॥ २ ॥ सैरंध्री वदली आतिसूज्ञ॥राजपत्निची सेवा करिन ॥ ऐसा विचार करूनि पूर्ण ॥ मत्स्यपुरासंनीध स्मशान ॥ शस्त्रें मंत्र शमिवृक्षीं ठेउन ॥चा०॥ दुर्गांतरिं प्रवेश करुनी दुर्गेचें दर्शन घेती ॥ ३ ॥

### पद राग गौरी ताळ धुमाळी.

हे दुर्गे माय भवानी भगवती प्रणवरूपिणी ॥ आह्मि दीन पंडुनंदन लागतों चरणीं ॥ ध्रु० ॥ आजवरी बहुतां तारिलें ह्मणुनि हे चरण आजि धरिलें ॥ आह्मां नसे दुजें कोणी तुझे तारक पद स्मरणीं ॥ १ ॥

### श्लोक वसंततिलका.

देवी ह्मणे कितितरी तुह्मि दीन झालां ॥ झालें प्रसन्न अजि ऐकुनिया स्तुतीला ॥ दायाद नाश तव होइल अब्दअंतीं ॥ सिंहासनीं अरूढ व्हाल करा न खंती ॥ १ ॥

### ॥ ओवी ॥

पांडवीं करून देवीस नमना ॥ एकेक आले राजसदना ॥ करून विराटराया वंदना ॥ नम्रपणें बोलती ॥ १ ॥

॥ दिंडी ॥

नमन करुनी रायास कंक बोले ॥ पांडवांच्या आश्रयीं जन्म गेले ॥ जाणतों मी शास्त्रादि द्युतकलेशी॥कृपा करुनी मज देइ आश्रयासी॥१॥

॥ ओवी ॥

विराट ह्मणे कंकासी ॥ मी पूर्ण जाणतों तुजसी ॥ श्रमलासि रहा मजपाशीं ॥ कांहीं तुजसी न्यून नसे ॥ १ ॥

पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

प्रबल बल्लव येत राजसभेतें पाहुनी त्या सर्वां सुटे कापरें ॥ ध्रु० ॥ दर्वि हातीं करुनी नमन नृपातें काय कथीत त्वरें ॥ १ ॥ पांडवाश्रयीं होतों पाक उत्तम करितों मल्लयुद्ध जाणे बरें ॥ २ ॥

॥ ओवी. ॥

नृप ह्मणे बल्लवा चतुरा ॥ करूं जाणशी पाक बरा ॥ तरी राहे आमुच्या घरां ॥ पाकसिद्धी करुनी ॥ १ ॥

पद राग कालंगडा ताल धुमाळी.

उर्वशिशापें बृहनडा होत अर्जुन ॥ ध्रु० ॥ कुंकुम भाळीं चंचल नयन ॥ त्यामध्यें रसिक रेखि अंजन ॥ थाटे कुरल केश सावरून लेउनि उत्तम भूषण ॥१॥ भूषणें रूपें मुख सुंदर॥गौरवर्ण अति सुकुमार ॥ चमकत पदीं तोरड्या गजर गजगामीन ॥२॥ ऐसी अतिसुंदर तेजाळ ॥ ठुमकत आली सभेजवळ ॥ पाहुनि चकित तो भूपाल पुसे तूं कोण॥३॥

॥ आर्या ॥

माझें नांव बृहनड धर्माश्रायें नृत्य गान शिकवाया ॥ होतों सारथ्यांदिक जाणे ठेवी अतां मला राया ॥ १ ॥

सारिकाछंद ताल धुमाळी.

ऐसें ऐकुनिया रायानें ॥ ठेवी बृहनडे बहुमानें ॥ ह्मणे उत्तरे शिकवित जाणे ॥ नाटकशाळा तव हातीं ॥ १ ॥ तों नकुळ ये चाबुक घेउन ॥ रायासी करुनिया वंदन ॥ ह्मणे मम नाम ग्रंथिक जाण ॥

अश्वारोहण करूं जाणे ॥ २ ॥ बहु अश्वांकरवीं चमत्कार ॥ करविन राया तुला सादर ॥ पांडवाश्रयीं होतों आजवर ॥ तुझी सेवा करूं आलों ॥ ३ ॥ ऐकुनि ऐशा उत्तराला ॥ रायें गौरवूनि ठेवीला ॥ अ-श्वशालेवरी नेमिला ॥ स्तुती करूनी अपार ॥ ४ ॥

**श्लोक चामर.**

नमूनि मत्स्यराजया कनिष्ठ माद्रिसूत तो ॥ वदे मी तंतिपाळ धेनु रक्षणासि जाणतों ॥बहूत दीन धर्मआश्रयासि काळ कंटिला ॥ करूनि गौरवासि आश्रयासि त्यासि ठेविला ॥ १ ॥

**पद राग यमन ताल त्रिवट.**

द्रौपदी वदे काय ॥ ध्रु० ॥ साधारण वेषें सुदेष्णेकडे येउनी जगन्माय ॥ १ ॥ हातीं फणी पाहूनि सुदेष्णा बोले ही दासी होय ॥२॥ पाहुनि रूप चकित नगरीजन ह्मणति हाय! हाय! ॥३॥ द्रौपदीची दासी मी आजवर होतें आतां तुमची होय ॥ ४ ॥

**॥ ओवी ॥**

सुदेष्णा वदे काय तिजसी ॥ मम वर गे लंपट तुजशीं ॥ झाला तरी भुलुन रूपासी ॥ काय करूं सांग मज ॥१॥

**मा० प० द्रौपदी वदे:—**

पंचगंधर्वस्त्री मी कधिं उच्छिष्ट आणि दुजें न सेवी पाय ॥ ५ ॥ जो स्पर्श करिल मातें त्यातें गंधर्व करातिल अपाय ॥ ६ ॥ हें इतुकें वर्जुन मी करीन सांगाल जें जें काय ॥ ७ ॥ विष्णुदास ह्मणे ठेवित तिजसी राणी विराटराय ॥ ८ ॥

**॥ साक्या ॥**

विराटगृहिं प्रतिवार्षिक उत्साहाला आरंभ झाला ॥ गुणि गायक लोकांचा तेथें मेळा मोठा जमला ॥ १ ॥ बृहन्नडा शीक्षित स्वकुमरी आणवी राय सभेला॥नृत्यगायनादिकें करूनिया जनमन रंजविण्याला॥ २॥

**ध्रुपद राग सोनी चौताल.**

तविते ॥ ध्रु० ॥ प्रजेप्रती पालि-

ता निती संपत्ति किति न हो गणति वीर सुमाति परचमुप्रति पराभवीते ॥ १ ॥

### राग झिंजोटी ताल त्रिवट.

प्रभुराया रे कीर्तिनें भरलें त्रिभुवन तुझ्या दीनपालकारे ॥ ध्रु० ॥ सभासुशोभित इंद्रसभेवत् वंदीत मी तव पाया रे ॥ १ ॥ वेदशास्त्रवेत्ते शूर सभेतें शत्रू वंदित तव पाय रे ॥ २ ॥ विद्यानिधि गुण जाणत आपण शक्य न स्तवन कराया रे ॥ ३ ॥ धन सुत संपत्ति पावो वृद्धीप्रति विष्णुदासा गुण गाया रे ॥ ४ ॥

### पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

आनंदलें मन माझें पाहुनिया सभेतें बाई गे ॥ नृपचरणाप्रति नमितें बाई गे॥ध्रु०॥ धीर समरिं तूं वीर प्रतापी पर वीर पाहुनि परते बाई गे ॥ १ ॥ कीर्तिचंद्र तव मज न वर्णवे परि यथामाति कथितें बाई गे ॥ २ ॥रसिक सभाजन पाहुनि आपण नृत्य गायन करितें बाई गे ॥३॥ विष्णुदास गुण सभेंत नृपति हर्षें स्तविती फारची बाई गे ॥ ४ ॥

### पद राग छयानट ताल धमार.

आज सुदिन सत्य आहे प्रभूमन झालें समाधान पाहूनी सभाजन॥ध्रु०॥ गंधर्वी गायन नृत्य श्रुत नित्य सभेंत ॥ मज अल्पही न येत परी ध्यावें मानूनी ॥ १ ॥

### पद राग गौरी ताल त्रिवट.

झालें आज सार्थक या शिकण्याचें ॥ध्रु०॥ गायननृत्यें रंजविलें मन मीं या सभाजनांचें ॥ १ ॥

### ॥ कटाव ॥

पांडवांसि ओळखण्याला कुरुंनीं मग काय केलें ॥ ध्रु० ॥ विराट गृहीं उत्साह आरंभिति ॥ देशोदेशिचे मल्लहि येती ॥ दोंडपट्टा कुस्त्या करिती॥कळुनि कुरुंना शंका ये ती॥पांडव कोठें जाणुं पाप मती॥ पाहिलवान धाडिती जिमूती ॥ वंदी येउनि मत्स्यनृपाप्रती ॥ पांडवप्रातिमा ब्रिदें पायीं हातीं ॥ वदे विराटा जिंकी मजप्रति ॥ नातर दे पत्रिका आजिंक ती ॥ चा० ॥ ऐकुन हें विराट राया संकट हो बहु ओढवलें

॥ १ ॥ कंक ह्मणे आणि बल्लवाप्रती ॥ तो येउनि वंदीत नृपाप्रति ॥ मल्लयुद्धं बल्लव आणि जिमुती ॥ फार वेळ दोघे ही झगडती ॥ बल्लवें पायीं धरुनि जिमूती ॥ आपटुन धाडी यमसदनाप्रति ॥ हर्षे गौरवि बल्लवा नृपति ॥ कळुनि कौरवां शंका येती॥ नव्हे बल्लव भीमच तो ह्मणती ॥ अतर्क्य आहे ईश्वरकृती॥अनेक पांडव क्षितिवरि असती॥चा०॥ सांगुनिया विदुरें त्यांच्या शंकेतें निवारियेलें ॥ २ ॥

॥ ओवी ॥

कांहीं दिन विराट सेवेंत॥पांडवांचे स्वस्थ जात ॥ तों कीचक एक दिन अवचित ॥ भगिनीमंदिरीं पातला ॥ १ ॥

पद राग यमनकल्याण ताल धुमाळी.

पाहुनि द्रौपदि कीचकमन चकित झालें ॥ ह्मणे भगिनी हें रत्न कोठुनि आणिलें ॥ ध्रु० ॥ मज पाहुनि वाटतें चंद्रतेज येथें समरस लें ॥ मदनें व्याप्त चित्त इजठायीं बसलें ॥ १ ॥ रूपलक्ष्मीपरी सेवा तुझी कां करी ॥ कथि मज ह्मणुनि तिचे पद धरिले ॥ २ ॥

पद राग कल्याण ताल एका.

बंधु न वद ऐसें कीचकास सुदेष्णा ह्मणे ॥ पांचगंधर्वस्त्री ती जाण मुकासिल प्राणें ॥ ध्रु० ॥ झडेल जीभ वाटे तीज ऐसें बोलल्या ॥ नेत्र जातिल सत्य वाटे वक्र पाहिल्या ॥ बा रे आतां कथुनि पहातें वेळ साधल्या ॥ मग ती सैरंध्रीस बोले माये ऐक गे ॥ १ ॥

पद राग पिलु ताल धुमाळी.

बोले सुदेष्णा सैरंध्री गे मम वचनातें मानी ॥ कीचकवचना देउनि माना वश होई त्या शयनीं ॥ ध्रु० ॥ रूप अति चोखट पाहुनि लंपट मम बंधू तुज झाला ॥ भूषणें घे नट राही त्यानिकट काय करिसि गंधर्वांला ॥ टाक मनिची अट न करी मी प्रगट त्यागी दासत्वाला ॥ सर्व अंगना तुझ्या वचनीं, तो प्राण देइल तव वचनीं ॥ १ ॥

॥ आर्या ॥

.. ...नक हे बंधुप्राण जाय खरा ॥ प्राणांतीं वश

॥ १ ॥

॥ ओवी ॥

सुदेष्णा ह्मणे बंधूलागुन ॥ तूंच विनवी तीज जाउन. ॥ आग्रहें जाईल तुझा प्राण ॥ सती आहे असाध्य ॥ १ ॥

पद राग झिंजोटी ताल त्रिवट.

करी एक भाषण सैरंध्री ॥ ध्रु० ॥ व्यर्थ तरुणपण न करील भूषण गंधर्व वधिन शिरीं ॥ १ ॥ माझ्या स्त्रिया ज्या दासि तुझ्या त्या आभरणें अपूर्व धरी ॥ २ ॥ माझ्या मंचक किती विलास अनेक रिती गंधर्वविवाह करी ॥ ३ ॥ मज रतिसुख दे राज्य तुझें हें कीचक पाय धरी ॥ ४ ॥

॥ आर्या ॥

सैरंध्री झिडकारी शिव ! शिव ! ! बोलूनि रडत आर्तस्वरें ॥ पळतां राजसभेला लागे पाठीस दुष्ट तो निकरें ॥ १ ॥

पद राग झिंजोटी ताल अर्धधमार.

तों नृपशालकें धाऊनी मारीतां पडली येऊनीया राजसभेतें ॥ रडत वदे मत्स्यराया सती उचित तरी काय हें राजनितीतें॥१॥तो ह्मणे स्त्रीचारित नेणवे कोणा ऐकूनी भीम दे पीळ मिशातें ॥ अवरि धर्म भीमा, द्रौपदीस बोले अनूचित हें कूलस्त्रियांतें ॥ २ ॥ नरूपाय होऊनीया सती मग स्तवुनि आळवीत दीन रवीतें ॥ धाडित सूर्य गुप्त दूत तो मग येऊनी लाथ मारी कीचकातें॥३॥घायाळ होऊनी मग त्वरित जाय निमूटपणें तो स्वसदनातें ॥ निशी प्राप्त झालीयावरी द्रौपदी होऊनी दुःखित बोले धर्मातें ॥ ४ ॥

पद राग पिलु ताल त्रिवट.

प्राणपती अहा ! ! कशि माझि गती ॥ ध्रु० ॥ पंडुस्नुषा पांचांची गृहणि परी दुर्घट किती विपत्ती ॥ १ ॥ कीचक मज ओढित मारित सभें तुह्मांपुढें नसे खंती ॥ २ ॥ काय शौर्यबळ जाळायाचें पांचांची एक मती ॥ ३ ॥ लज्जा स्त्रीईर्षेची जगांत कीं अधमांसही असती॥४॥

॥ आर्या ॥

धर्म ह्मणे कथि भीमा तो त्या नीचा वधील नेमानें ॥ बल्लव तेथें